# इतिहास

१९२८ सालच्या आरंभीं " विधवा कुमारी " प्रसिद्ध झाली. त्या कादंबरीचा लेखक या नात्यानें माझें नांव प्रसिद्ध झाल्यानंतर—किंबहुना त्यामुळेंच—त्या कादंबरीची दुसरी आवृत्ति निघणें बरेच दिवस अशक्य होऊन बसलें होतें. गेल्या १९३३ च्या जानेवारींत प्रस्तुत प्रकाशकांच्या उत्साहामुळें तिची दुसरी आवृत्ति प्रसिद्ध झाली. त्याचवेळीं हा उत्तरार्ध पुरा करण्याचें ठरलें होतें.

मधल्या कालांत " धांवता धोटा " ही अपुरी राहिलेली कादंबरी पुरी केली गेली आणि त्यानंतर हें काम हातीं घेतलें.

१९३२ सालांतील बडोद्याच्या साहित्य परिषदेच्या योगायोगानें मराठी लघुलेखन कलेचे जनक, सातारचे रहिवासी श्री. विनायकराव नाफड, यांचा परिचय झाला. माझें एकादें पुस्तक आपल्याकरवीं लघुलिपीनें लिहिलें जावें अशी पहिल्याच भेटीला त्यांनीं इच्छा प्रदर्शित केली—नव्हे माझ्या मागें सारखें टुमणें लावलें आणि त्याप्रमाणें अनाहुत येऊन हें पुस्तक लिहिण्याच्या कामाला सुरवात केली.

मराठी लघुलिपीनें लिहिलें गेलेलें मराठी भाषेंतील हें पहिलेंच पुस्तक आहे, असें येथें नमूद करून ठेवण्यास मला फार अभिमान वाटत आहे. आणि हा अभिमान मिळविण्याची संधी दिल्याबद्दल रा. विनायकराव नाफड यांचे जेवढे आभार मानावेत तेवढे थोडेच आहेत.

जें कार्य करण्यासाठीं मला महिनोंमहिने परिश्रम करावे लागले असते तें कार्य लघुलिपीमुळें अगदीं अल्पावधींत झालें कसें याचें माझें मलाच आश्चर्य

वाटलें. सबंध पुस्तक डिक्टेट करायला एकंदर कामाची वेळ ( Working hours ) हिशेबीं घेतली तर तेवीस तासापेक्षां जास्त काळ लागलेला नाहीं. तेही इतके जास्त लागण्यास माझेंच कार्यव्याप्तृत्व कारणीभूत होत होतें.

विनायकरावांसारखा लघुलेखक हाताशीं असल्यावर आणि मांडी मोडून ग्रंथ लेखन करण्याचें ठरविल्यावर विचारी लेखकाला एक कादंबरी लिहिण्यास आठ दिवसापेक्षां जास्त दिवस लागणार नाहींत, असें मी अनुभवानें म्हणूं शकतों. मात्र त्या विषयाचें चिंतन आणि मनन आधीं पूर्णत्वानें झालेलें असलें पाहिजे.

मराठी लघुलिपी अस्तित्वांत आली आहे कीं नाहीं याची बऱ्याच मराठी साहित्यिकांना अजून दादसुद्धां नाहीं. ' महाराष्ट्र साहित्य परिषद ' म्हणविणारी संस्था या अत्यंत महत्त्वाच्या कलेविषयीं कोणत्याही प्रकारची कळकळ दाखवित नाहीं. स्वत:च्या समाधानासाठीं नाफड यांनीं परिश्रमपूर्वक जें संशोधन चालविलें आहे त्याला सर्व साहित्यिकांनीं हातभार लावणें अवश्य आहे असें या कलेपायीं जो लेखनोत्साह वाटला त्यामुळें मला वाटत आहे. वर्तमानपत्रकारांना या कलेची जास्त आवश्यकता आहे पण ते अजून आपलें सांप्रदायिक तत्त्व सोडण्यास तयार नाहींत. त्यांच्या या औदासिन्यामुळें विनायकरावांसारख्या असामान्य शोधकाचें नांव लुप्त होऊं नये एवढ्याचसाठीं मी ही हकिकत येथें नमूद करून ठेवित आहे. लघुलिपीच्या सहाय्यामुळें मला जो लेखनानंद अनुभवितां आला त्याचे अंशभागीं माझे इतर व्यवसायबंधूही व्हावे एवढीच माझी इच्छा आहे.

माझी कोणतीही कादंबरी लिहिण्यासाठीं मी केव्हांही लेखणीला हात लावला नाहीं. या कादंबरीचा पूर्वार्ध " विधवा कुमारी " हें पुस्तकही माझे मित्र श्री. रघुवीर कृष्ण रेळे यांच्याकरवी लिहिलें गेलें आहे. टेलिग्रॉफिस्ट्स् स्क्रॅम्पस्‌मुळें स्वहस्तें अनिर्बंध लेखन करणें मला अशक्य झाल्यामुळें लेखकाची मदत घेऊन पहिली " विधवा कुमारी " लिहिली गेली होती. त्यावेळच्या कामाचे तास ( Working hours ) एकंदर सुमारें ६४ ते ६५ झाले होते. रेळे यांच्यासारखा शीघ्रगती लेखक मिळाल्यामुळेंच इतक्या थोड्या कामाच्या तासांत ती कादंबरी पुरी करतां आली होती. लघुलिपीमुळें तोच काळ जवळ जवळ $\frac{1}{3}$ झाला. मराठी भाषेची लेखनसमृद्धि होण्यासाठीं लघुलिपीची आवश्यकता किती आहे, हें एवढ्याच उदाहरणावरून प्रतीत होईल.

हाजीकासम वाडी, मुंबई<br>ता. २१–२–१९३४

**मा. वि. वरेरकर**

## लेखकाचीं इतर पुस्तकें.

### नाटकें

कुंजविहारी
संजीवनी
सरस्वती
वरवर्णिनी
चंद्रशेखर ( समर्थ भिकारी )
हाच मुलाचा बाप
लयाचा लय ( नरकेसरी )
संन्याशाचा संसार
सत्तेचे गुलाम
पतित पावन (तुरुंगाच्यादारांत)
नवा खेळ
करग्रहण
करीन ती पूर्व
सोन्याचा कळस
जागती ज्योत
स्वयं-सेवक
बिल्वमंगल
लढाईनंतर

### लघु नाटकें

पापी पुण्य
संसार
नामानिराळा
सदा बंदिवान

### कादंबऱ्या

चिमणी
विधवा कुमारी
धांवता धोटा
गोदू गोखले
कुलदैवत
परक्यासाठीं

# परत भेट

## प्रकरण पहिलें ........................ पुनः मायभूमी

हिंदुस्थानचा किनारा जसजसा जवळ येऊं लागला, तसतसें माझें मन आनंदानें उचंबळूं लागलें.

त्या दिवशीं बोट संध्याकाळीं सूर्यास्तानंतर आल्यामुळें वरच्या उतारूंना धक्क्यावर उतरतां आलें नाहीं. दुसऱ्या दिवशीं सकाळपर्यंत मुंबईच्या बंदरांत नुसतें तिष्ठत बसण्याची पाळी यावी, याचें मला फार कौतुक वाटलें. आज पांच वर्षांचा हिंदुस्थानचा वियोग, बोट बंदरांत येऊन पोहोंचलेली, समोर मुंबईचा धक्का दिसतो आहे, पण हिंदुस्थानच्या भूमीला मात्र पाय लावतां येऊं नये हा काय योगायोग, असें मला वाटूं लागलें. सारी रात्र मी धक्क्यावरील दिव्यांकडे पहात कठड्याला टेकून उभी राहिलें होतें. असें वाटे, कीं उडून जाऊन आपण मुंबईचा किनारा गांठावा.

माझें मलाच आश्चर्य वाटलें, कीं ज्यावेळीं मी मुंबईहून निघालें त्यावेळीं विलायतेहून परतसुद्धां येऊं नये, अशा प्रकारची एक वृत्ति माझे ठिकाणीं उत्पन्न झाली होती. विलायतेंत गेल्यानंतर निरनिराळ्या प्रकारचे अनुभव आले, त्या अनुभवानें

या वृत्तीलाही एक प्रकारची बळकटी येत होती. पण माहेरासाठीं आतुर होणाऱ्या एकाद्या सुनेची जी अवस्था असते, ती स्थिती दिवसेंदिवस मला विलायतेंत अनुभवाला येऊं लागली. जसजसा हिंदुस्थानचा वियोग जास्त जास्त वाढूं लागला, तसतसें हिंदुस्थानांत येण्यासाठीं मन कासावीस होऊं लागलें.

इच्छेप्रमाणें पुष्कळसा कार्यभाग हातून झाला, असें वाटत असल्यामुळें ज्यावेळीं मी परत मायभूमीला येण्यासाठीं तयार झालें, त्यावेळीं मात्र हिंदुस्थानच्या भूमीला पाय लावण्याची उत्कंठा अनावर होऊं लागली. तो चवदा दिवसांचा प्रवास मला इतका कंटाळवाणा वाटला, कीं त्याची कल्पनाच करणें जास्त चांगलें.

बराच वेळ कठड्याला टेकून, मुंबईच्या धक्क्यावर माझ्याकडे डोळे मिचकावून पाहणारे ते दिवे मी कितीतरी वेळां न्याहाळले होते. त्या दिव्यांच्या लुकलुकण्यांतून हिंदुस्थानचा लुकलुकता संदेश मला दिसून येत होता. "ये! ये! आतां किती दिवस बाहेर राहशील?" असें डोळे मिचकावून माझी मायभूमी मला म्हणते कीं काय, असें मला वाटत होतें. अंधारानें आवृत झालेला माझ्या मायभूमीचा तो प्रदेश पाहून मनांत निरनिराळ्या लाक्षणिक भावना उत्पन्न होत होत्या. माझ्या स्वतःच्या मनोवृत्तीप्रमाणें मी त्या भावनांना निरनिराळ्या प्रकारचें मनोमय स्वरूपही देत होतें.

उद्यां धक्क्याला बोट लागतांच पहिल्यांदा कोण कोण भेटेल, हा प्रश्नच सर्वांच्या आधीं मनांत येत असे. मी येणार, असें फक्त एक चंदूलाच पत्र लिहून कळविलें होतें. चंदूनें ताईंना आणि काकांनाही सांगितलें असेल कीं काय? कीं स्वतःच मला भेटण्याचा पहिला योगायोग साधायची स्वार्थी वृत्ति त्याच्या मनांत आहे?

सारींच माणसें भेटलीं तरी मला आनंद वाटेल, कीं एकटा चंदूच भेटला तर आनंद वाटेल?

मी मनाचें पृथःकरण करून पाहूं लागलें. प्रामाणिकपणें मला असें वाटत होतें, कीं मायभूमीवर पाय ठेवतांच चंदूखेरीज दुसरें कुणीही ओळखीचें माणूस भेटूं नये. पण जिव्हाळ्याच्या प्रत्येक माणसाला भेटण्याची किंमतही त्याचबरोबर तितकीच अनावर होत होती.

एक वेळ वाटे, कीं सर्वत्रांनाच भेटावें. ओळखी अनोळखीचीं सारी माणसें जितकीं जितकीं म्हणून भेटतील, तितकीं भेटलीं तर आपल्या आनंदाला पारावार रहाणार नाहीं, असेंही वाटत असे. अशा या परस्परविरोधी मनोवृत्तीच्या झगड्यांत विचार करीत असतां सारी रात्र केव्हां निघून गेली तें मला कळलेंसुद्धां नाहीं.

झुंजुमुंजू दिसूं लागतांच तोंड धुऊन मी पुन्हां येऊन कठड्यावर उभी राहिलें. बोटीवरच्या सर्व उतारूंची सामानसुमानाच्या आवराआवरीबद्दल मारे घाई चालली होती. मी माझें सामानसुमान आधींच तयार करून ठेऊन बाहेर आलें होतें, इतकी मला किनाऱ्यावर उतरण्याची उतावळी झाली होती.

पण माझ्या मनाप्रमाणें बोटीचा व्यवहार थोडाच चालणार होता! मला घाई झाली म्हणून बोटीवर शिडी कांहीं लौकर चढणार नव्हती. प्रत्येक वेळा ठरलेल्या होत्या आणि त्याप्रमाणेंच सर्व गोष्टी होणार होत्या.

माझा जीव अगदीं डोळ्यांत आला होता. बोट जसजशी धक्क्याजवळ येत होती, तसतशी मी अगदीं डोळे फाडफाडून पहात होतें. धक्क्यावर जमलेली गर्दी जरी मला स्पष्ट दिसत होती, तरी त्यांतून अचुक एकादें माणूस ओळखून काढणें अशक्य होतें. त्यांतही पांच वर्षें झालेलीं—कोण कोणाच्या चेहऱ्यांत काय काय फरक झाला, याचा अंदाज करणें सुसाध्य नव्हतें.

धक्क्याला बोट लागली. मी धक्क्यावर उतरलें. मी उतरतांच एक मोठ्या मिशांचा गृहस्थ माझ्यासमोर येऊन उभा राहिला. पहिल्यानें मी ओळखलें नाहीं. पण तो चंदूच होता. त्यानें मात्र मला ओळखलें. त्याच्याबरोबर एक तरूण मुलगी होती. तिलाही मी ओळखलें नाहीं. ज्यावेळीं चंदूनें आपली ओळख दिली त्याचवेळीं त्यानें लीलेचा मला परिचय करून दिला. मी ज्यावेळीं तिला पाहिली होती, त्यावेळीं ती एवढीशी चिमुरडी पोर होती. आतां ती चांगली जाणती बायको दिसत होती. मी तरी तिला कसें ओळखावें? मुलांपेक्षां मुलींत या मधल्या काळांतील वयांत जो फरक होतो तो साहजिक दृष्टीला न ओळखण्यासारखा असतो.

सर्वच चमत्कारिक वाटूं लागलें. चंदूलासुद्धां मी ओळखूं नये ना? पण ती त्याची मिशी—ती त्याची मिशी इतकी मोठी झाली होती, कीं एवढ्या मोठ्या मिशांचा मला मोठा गृहस्थ चंदू असेल अशी कल्पना माझ्या स्वप्नांतसुद्धां आली नसती. हिंदुस्थानचा किनारा सोडतांना ज्या नजरेनें मी त्याला पाहिलें होतें, त्या

नजरेला तो जेवढा दिसला होता, तेवढाच तो माझ्या मनःचक्षूंसमोर उभा रहात असे. त्याची आठवण होत असे, त्यावेळीं त्याच स्वरूपांत मी त्याला पहात असें. पांच वर्षांच्या वयोमानाची वाढ त्या स्वरूपांत मिळविण्याचें केव्हांच माझ्या ध्यानीं आलें नाहीं आणि म्हणूनच मी त्याला धक्क्यावर ओळखलें नाहीं.

मी ओळखलें नाहीं हें पाहून तो अगदीं पोट धरधरून हंसला आणि म्हणाला, " या माझ्या मिशा जिथं तिथं धक्का देताहेत. लहानपणच्या ओळखीची कितीतरी मित्रमंडळी आज मला ओळखेनाशी झाली आहे, ती या माझ्या मिशांमुळें. एवढया मिशा मला आल्या असतील ही जशी तुला कल्पना झाली नाहीं, तशीच त्यावेळीं मला नव्हती. या मिशा पाहून तुला जर माझी भीति वाटत असेल, तर उद्यांच्या उद्यां त्यांना छाट द्यायची माझी तयारी आहे. काकांचा अडथळा व्हायचा नाहींच–शिवाय ज्यांच्यासाठीं मिशा ठेवायच्या असं माझं जिव्हाळ्याचं कुणी राहिलं नाहीं."

मी म्हटलें, " त्याचा खल एव्हांच कशाला ? उद्यां एकदां मी चांगली डोळे भरून पाहून घेईन आणि मिशा काढल्या तर तूं बरा दिसतोस कीं मिशा असल्या तर भव्य दिसतोस, या दोहोंचा पडताळा घेऊन मग माझी सल्ला द्यायची ती देईन."

थोडावेळ थांबून मी म्हटलें, " काका आणि ताई आलीं नाहींत का ? "

तो म्हणाला, " दोघेंही आलीं आहेत पण ती बिन्हाडीं आहेत. इथं येण्यासाठीं ताई अगदीं उतावीळ झाली होती, पण काकांनीं तिला जाऊं नको म्हणून सांगितलं. ते म्हणाले, कीं धक्क्यावर उगीच चार लोकांदेखत मथूच्या गळीं पडशील आणि रडूं लागशील ! त्यापेक्षां जे कांहीं सोपस्कार व्हायचे ते इथं घरीं झालेलेच बरे."

आम्ही बोलत असतां लीला सारखी माझ्याकडे पहात होती. मी हळूच तिची पाठ थोपटून म्हटलें, " तुम्ही बऱ्याच मोठ्या झालांत कीं लीलाताई ? काय शाळेबिळेंत जातां कीं नाहीं, कीं संसारांत पडला आहांत ? "

थोड्याशा कुर्ऱ्यानें लीला म्हणाली, " तशी कांहीं मी अगदीं ही नाहीं. तुम्हांला तरी तसं कां वाटूं नये ? नानासाहेब मला शाळेंत घालतील असं कुणाला सांगितलं तर खरं वाटणार नाहीं. पण तसं झालं हें खरं. यंदाच मी मॅट्रिक होणार आणि कॉलेजांत जाऊं लागणार. आणखी ऐकलं कां मथूताई, मी संसारांत पडलें नाहीं बरं का ? "

लीलेचे ते उद्धटपणाचे उद्गार ऐकून मी आश्चर्यचकित झालें. नानासाहेबांच्या कडक कोरड्याखालीं ही मुलगी अगदीं मांजराहून मऊ कशी झाली नाहीं, याचेंच मला आश्चर्य वाटलें. त्याहीपेक्षां आश्चर्य वाटलें, तें तिचें लग्न झालें नाहीं याचें. पण या सर्व गोष्टीची फाड करून घेण्याची ती वेळ नव्हती. क्रमाक्रमानें सर्वच कांहीं कळणार होतें, मग एव्हांच उतावीळपणा कशाला करायचा असा विचार करून मी जास्त प्रश्न करण्याच्या भानगडींत पडलें नाहीं.

बऱ्याच मंडळीचा घोळका माझ्या स्वागतासाठीं धक्क्यावर येईल या कल्पनेनें मला जो संकोच वाटत होता तो हीं दोघेंच आल्यामुळें नाहींसा झाला. एकपरीनें मला समाधान वाटलें–पण तितकीच उत्कंठा साऱ्या मंडळीला पाहण्यासाठीं माझा जीव कासावीस करीत होती. ताईला भेटण्यासाठीं तर माझे पंचप्राण डोळ्यांत आले होते. पांच वर्षांत चंदू एवढा भव्य दिसूं लागला, लीला एवढी मोठी बाई दिसूं लागली, मग ताई आतां म्हातारी नाहीं ना दिसणार, या कल्पनेनें मला कसेंसेंच वाटूं लागलें. माझी ताई जेवढी होती तेवढीच दिसावी, तशीच असावी, आंत किंवा बाहेर तिच्यांत कोणताच फरक होऊं नये, असें मला वाटत होतें. पण काळाच्या तडाख्यानें होणारे फरक थांबवून ठेवणें माझ्या आवडीवर थोडेंच अवलंबून राहणार ?

गाडींत बसून आम्हीं घरीं आलों. चंदूचें बिऱ्हाड जरी एका प्रशस्त चाळींत होतें तरी ती चाळ अगदींच कांहीं खुराड्यांच्या खोलीची नव्हती. त्याची बिऱ्हाडाची जागा चांगल्या लहानशा घराइतकीच होती. त्याला त्यावेळीं फ्लॅट असें म्हणत असत.

दाराशीं ताई माझी मार्गप्रतिक्षा करीत उभी होती. जिना चढून मी वर येतांच तिनें धावत येऊन मला कडकडून मिठी मारली. पुरतेपणीं तिच्या चेहऱ्याकडे मला पाहतां आलें नाहीं. ती सारखी हुंदके देत होती आणि मिठी न सोडवितां हळू हळू माझी पाठ थोपटीत होती. मलाही हुंदका आवरेना.

माझें मलाच आश्चर्य वाटलें. इतक्या दिवसांनीं भेट झाली तरी पुरतें एकमेकांच्या चेहऱ्याकडे न पाहतां आम्ही मिठ्या मारमारून रडत होतों कशासाठीं ? तें दुःख तर खात्रीनें नव्हतें.

पांच वर्षांचा वियोग कुटुंबवत्सलाच्या घरांत अगदींच अशक्य होता असें नाहीं. पांच वर्षें माहेरीं न येणाऱ्या मुली काय थोड्या आहेत ? तशीच मी माहेरी गेलें

होतें अशी कल्पना करावी तर मधें हजारों मैल समुद्राचें व्यवधान समोर
माहेरीं जाणाऱ्या मुलीला भेटावें म्हटलें तर जिव्हाळ्याच्या माणसांना
भेट घेतां आली असती.

पण मी जिथें होतें तिथें जाऊन भेटणें सहजसाध्य मुळींच नव्हतें. म
वियोग इतका दुर्धर वाटला. म्हणूनच ती भेट इतकी आनंददायक झ
म्हणूनच आम्ही भेटल्याक्षणीं अशी अन्तःकरणें मोकळीं करून उर
रडूं लागलों.

तसाच माझा हात धरून ताईनें मला घरांत आणलें. काका एका इ
स्वस्थ बसले होते. त्यांनीं आपल्या मनाची चलबिचल झाल्याचें कोणत्या
दिसूं दिलें नाहीं. त्यांची ती पूर्वींची स्थितप्रज्ञ वृत्ति जशी होती तशीच काय

आतां कुठें मी ताईकडे पाहिलें—अगदीं डोळे भरून पाहिलें. तिच्यांत व
प्रकारचा फरक झाला नव्हता, हें पाहून मला अतिशय आनंद झाला. चंदू
लीला बदलली, काकासुद्धां म्हातारे दिसूं लागले, पण ताई जशी पूर्वीं होत
होती. माझें समाधान झालें.

माझा पोषाख जरी बदलला नव्हता, तरी विलायतेच्या हवेला अनुस
कांहीं कांहीं फरक मला करावे लागले होते. बूट स्टॉकिंग्ज खेरीज गत्यंतरच
गरम कपडे वापरावे लागत होते, पण त्याकाळीं इकडून जाणाऱ्या कित्ये
स्त्रियांप्रमाणें मी डोक्यावरून पदर घेत नव्हतें.

मी पायांतील बूट स्टॉकिंग्ज काढूं लागलें तेव्हां काका म्हणाले, "
एवढ्यापुरती तरी मडम बनलीस म्हणायची. मला वाटलं होतं, कीं बहु
परकरी झगा घालूनच येशील; पण मधूनमधून इकडून लुगडीं मागवीत
म्हणून मला बरीचशी आशा होती. "—थोडा वेळ माझ्या चेहऱ्याकडे पा
म्हणाले, "आणि हें तुझं कुंकू तर कायमच आहे—कीं आतां इथं यायचं
लावलंस ? "

बुटाचे बंद सोडित सोडित मी म्हटलें, "हवामानाला अनुसरून जेवढा
करायचा त्याच्यापेक्षां माझ्या पोषाखांत मी कोणताच फरक केला नाहीं. मल
स्वत्व राखायचं होतं—पांच वर्षं विलायतेंत काढूनही माझ्या आचारांत मी यत्किं
बदल होऊं दिला नाहीं. "

माझें भाषण ऐकून काका मधूनमधून हंसले. तें ऐकून ताई म्हणाली, " इकडे कांहीं जरी वाटलं तरी मला पूर्ण खात्री होती. मथू जशी जाईल तशीच परत यायची. तिच्यांत फरक व्हायचा नाहीं. आणि तें मी पाह्यलं म्हणून मला पोट भरून आनंद झाला. "

" कसला आनंद झाला ? " काका म्हणाले. " हे बूट स्टॉकिंग्ज तर आले आहेत ना ? हें काय थोडं झालं ? आमच्या इथल्या लोकांना एवढं तरी कुठं खपणार आहे ? "

मी हंसत म्हटलें, " मी आलें नाहीं तोंच हीं तुमचीं भांडणं सुरू झालीं. माझ्यापायीं तुमचीं भांडणं व्हायचीं हें जसं कांहीं ठरलेलंच आहे. आतां मला हात-पाय धुवायला जाऊं द्याल कीं नाहीं—कीं विलायतेंत जाऊन बाटलेल्याला घरांत जायची बंदी आहे ? "

" तें मी काय सांगूं ? " काका म्हणाले, " मी कांहीं या घराचा मालक नव्हे. घराचे मालक हे वकीलसाहेब आहेत. त्यांचा जसा हुकूम होईल तसं वाग म्हणजे झालं."

मी चंदूकडे वळून म्हटलें, " काय हुकूम आहे, वकीलसाहेब ? "

" हा काय प्रश्न मथू ? " चंदू म्हणाला, " पण मथू म्हटलं तर तुला राग नाहीं ना यायचा ? आतां तूं विलायतेहून जाऊन आलीस, केंब्रिज युनिव्हर्सिटी-सारख्या मोठमोठ्या युनिव्हर्सिटींच्या डिग्र्या घेऊन आलीस, तुला 'अग तुग' करण्याचा खरं पाहिलं तर आम्हांला अधिकार नाहीं. विद्वत्तेच्या दृष्टीनं पाहिलं तर तुझ्यापुढं आम्हीं कोटश्चकीटायते आहोंत. पण आधीं असं सांग, आधीं हातपाय धूणार आहेस कीं आधीं चहा घेणार आहेस ? "

" बरा विषय बदललास ! " मी म्हटलें, " विद्वत्तेचा प्रश्न तूर्त बाजूला ठेऊं. जुन्या आचाराविचारांची बाब कशीही असो पण स्वच्छता तरी राखली पाहिजे ना ? त्या बोटीवरून आल्यावर कांहीं झालं तरी मन मोकळं वाटत नाहीं. चौदा दिवस बोटीवर काढले—रोज स्नान करीत होतें तरी देखील मनाला स्वच्छता वाटत नव्हती. तो हवेचाच कांहीं तरी एक चमत्कारिक परिणाम होत असतो. इथं येतांच कसं मोकळं झाल्यासारखं वाटतं आहे—आणि पहिली कल्पना येते आहे ती हातपाय स्वच्छ धूण्याची. विलायतेंत हात धुण्याचं मोठं प्रस्थ आहे. पण इथं हिंदुस्थातांन

नुसत्या हात धूण्याच्या प्रश्नानं भागत नाहीं. हातपाय धूणं, ही इथं फार महत्त्वाची बाब आहे. तोंड धूण्याचा उल्लेख देखील मागाहून केला जातो पण हातपाय धूणं आधीं झालं पाहिजे. " बोलत बोलत मी बूट स्टॉकिंग्ज काढून बाजूला ठेवले.

लीला अजूनपर्यंत कांहीं बोलत नव्हती. पण या माझ्या भाषणानें तिला वाचा फुटली. ती म्हणाली, " एकूण पांच वर्षं झालीं तरी हातपाय धूण्याचा विसर नाहीं पडला तुला, काकू ? असं आहे हें आमच्या हिंदू लोकांचं. हजार विलायता झाल्या तरी मुळचे संस्कार कांहीं नाहींसे व्हायचे नाहींत ! "

तिचें भाषण ऐकून मी थक्क झालें. क्षणभर तिच्याकडे पहात पहात मी विचारलें, " विलायतेला गेला कीं माणूस स्वच्छतासुद्धां विसरून जातो असा का तुझा समज आहे ? हातपाय धूणं हा कांहीं आचार नाहीं. हा अगदीं साधा स्वच्छतेचा प्रश्न आहे. विलायतेला आम्ही बूट स्टॉकिंग्ज वापरीत असतों तेव्हां पाय मुळींच मळत नसत. तिथली हवाही फार थंड. त्यामुळें बूट स्टॉकिंग्ज काढून ठेवण्याचीही जरूरी वाटत नाहीं. पण इथं येतांच पहिला परिणाम हवेचा होऊं लागतो. हें आतांच पहा —अजून पुरतं ऊन्ह सुद्धां वर आलं नाहीं तरी घाम यायला लागला. स्वच्छतेची आठवण जर या वेळीं व्हायची नाहीं तर व्हायची तरी केव्हां ? "

लीला उगीच राहिली. ताई म्हणाली, " फार दमून आली असशील. आधीं चहा घेतला तर नाहीं का चालायचं ? "

मी म्हटलें, " खरं म्हटलं, तर ताई, केव्हां एकदां चहा घेईन असं मला झालं आहे. पण एकदां हातपाय धुतल्याशिवाय कांहीं चहा घेववणार नाहीं. आमची ती बोट स्वच्छ असते यांत शंका नाहीं, तरी पण इकडेतिकडे लागलेल्या हातांनीं चहा ध्यायची कल्पना मोठी दुःसह होते. "

ताई काकांकडे वळून म्हणाली, " ऐकलं, हें असं आहे. हिंदु स्त्री–मग ती किती वर्षं कां विलायतेला राहीना–तिच्या मनावरचे संस्कार कांहीं जायचे नाहींत. हे संस्कार जोंपर्यंत कायम आहेत तोंपर्यंत कुणी कितीही बढाया मारल्या, तरी त्या साऱ्या फोल आहेत. "

चंदू म्हणाला, " मथू आली कीं तुमच्या चर्चेला सुरवात होणार हें भाकीत मी आधींच करून ठेवलं होतं. पण त्याची एवढी घाई कशाला ? आतां ती कांहीं विलायतेला जात नाहीं. बोलायला पुढं भरपूर वेळ आहे. "

मी उठून उभी राहिलें, तसा तोही रस्ता दाखविण्यासाठीं पुढें झाला. मधला दिवाणखाना ओलांडून आम्ही आंत गेलों. त्यापुढें एक बारिकशी वाट होती. त्या वाटेनें बाथरूमकडे जात असतां समोरच्या खोलींतून एक अपरिचित स्त्री–म्हणजे मी पूर्वी कधींच न पाहिलेली स्त्री–बाहेर आली आणि मला पाहतांच झट्कन् आंत गेली.

माझ्या काळजांत धस्स झालें. कोण ही ? चंदूचें लग्न झालें का ? ती त्याची बायको तर नव्हे ? कुणीच तिच्या नांवाचा उल्लेख कसा केला नाहीं ? कीं नुसतीच कुणी पाहुणी आली आहे ?

माझ्या मनांत हे विचार येताहेत तोंच ताई पुढें येऊन म्हणाली, " अग, अशी लाजतेस कां ? मधुताई येऊन किती वेळ झाला पण तूं पुढंसुद्धां आली नाहींस. ऐकलंस कां मथू, ही आमच्या चंदूची बायको."

मी बाथरूममध्यें पाऊल टाकीत होतें त्या वेळीं हे शब्द माझ्या कानीं पडले.

माझ्या डोळ्यांपुढें एकदम अंधेरी आली.

## प्रकरण दुसरें ............................................ सरूबाई

चटकन् पुढें होऊन ताईनें मला सावरलें नसतें तर मी खालींच पडलें असतें. ताई म्हणाली, "असं काय झालं. चक्कर आली का?"

"हवा बदलल्याचा परिणाम असेल!" मी चांचरत चांचरत म्हटलें. मी काय बोलत होतें याची मला कल्पना होती. पण प्रत्यक्ष ती समोर असतां तिच्या-बद्दल आपल्या मनांत विकल्प आला, असें सांगण्याचें धाडस माझ्याकडून झालें नाहीं.

चहा झाल्यानंतर स्नानें करून जेवणेंही झालीं. विलायतच्या गोष्टी सारख्या चालल्या होत्या. तिकडील निरनिराळ्या गमती मी सांगत होतें, त्या ऐकून त्या सर्वांची करमणूक होत होती—पण इतकें सर्व होत असतांनाही माझें सारें चित्त एकाच गोष्टीवर लागून राहिलें होतें.

चंदूच्या बायकोचें नांव सरस्वती असें ठेवलें होतें. तत्कालीन प्रचाराप्रमाणें भालचंद्र हें गणपतीचें नांव असल्यामुळें तिचें नांव सरस्वती असें ठेवलें होतें. खरें पाहिलें तर सरस्वतीचा आणि गणपतीचा यत्किंचितही संबंध नाहीं, पण गणपतीच्या बायकोचें नांव सरस्वती ठेवण्यांत सरस्वती ही गणपतीची बायको आहे, असें गृहीत

धरून चालण्यांत येतें. आमच्या पौराणिक समजांत जे जे कांहीं घोटाळे आहेत, त्यापैकींच हाही एक आहे.

तिचें नांव जरी सरस्वती ठेवलें होतें तरी काका तिला ' सरू'च म्हणत आणि ताई ' सरूबाई ' म्हणत असत. एकेरी नांवानें हाक मारण्याची काकांना फार खोड. कोंकणच्या सार्वत्रिक प्रचाराप्रमाणें एकेरी नांवानें हाक मारणें हें जास्त सलगीचें समजलें जातें, त्यालाच अनुसरून ते तशी हाक मारीत असत. पण ती हाक मारतांना त्यांच्या स्वरांत त्यांना स्वाभाविक असलेला कोमलपणा मुळींच दिसून येत नसे. त्यावरून सरूबाईबद्दल एकंदरींत त्यांचें मत जिव्हाळ्याचें नव्हतें, असा मी कयास केला. नवरा–बायको समोर बोललीं असतीं तर काकांनीं त्याला अडथळा केला नसता. पण त्या काळांत वडील माणसांच्या देखत नवरा–बायकोनें एकमेकांच्याशीं बोलणें असभ्यतेचें समजलें जात असे. त्यामुळें उभ्या दिवसांत चंदू आपल्या बायको-बरोबर बोललेला मला मुळींच दिसून आला नाहीं. तो बोलला नाहीं एवढ्यावरूनच त्या दोघांचें रहस्य नाहीं असा अंदाज करणें म्हणूनच चुकीचें झालें असतें.

चंदूचें आणि त्याच्या बायकोचें रहस्य कितपत आहे, हें मी ताईला विचारलें असतें तर तिनें सांगितलें नसतें असें नाहीं–पण तसें विचारण्याला माझें तोंडच वाहीना. त्या बाबतींत मला संकोचच वाटत होता. मी आपण होऊन तिच्याशीं बोललें नाहीं आणि तीही माझ्याशीं बोलण्यास फारशी उत्सुक असलेली दिसून आली नाहीं, त्यामुळें त्या उभ्या दिवसांत आम्हा दोघांचें भाषण झालें नाहीं.

लीला आली होती तिच्याबरोबर पुण्याच्या हकीकती विचारण्यांत माझा बरा-चसा वेळ गेला. नानासाहेब अजूनही केसरी ऑफिसांत होते आणि पांच वर्षांच्या काळांत त्यांच्या शरीरयष्टींत जरी बदल झाला होता तरी स्वभावधर्म अगदीं पूर्वी जसा होता तसाच राहिला होता. लीलेची आई करड्या नवऱ्याच्या अमलाखालीं तितकीच गोगलगाईप्रमाणें वागत होती, असें मला लीलेच्या सांगण्यावरून कळून आलें.

फरक झाला होता तो काय तो लीलेंत. लहानपणी ती कांहीं दुधखुळी नव्हती. भेत्रीच होती म्हटलें तरी चालेल; पण आतां तिच्या तोंडाचा तोफखाना जसा कांहीं खुला झाला होता. ती जी बोलत बसली ती दुसऱ्या कुणाला बोलूंच देईना. शाळें-तल्या गोष्टी, घरच्या गोष्टी, गांवांतल्या मित्रांच्या गोष्टी यांचें पुराण तिनें एवढें

लांबविलें, कीं तें ऐकतांना मला ताईबरोबर बोलायला त्या पहिल्या दिवशीं तरी फुरसत मिळाली नाहीं.

शिवाय काका मला विलायतच्या गोष्टी सारख्या विचारीत होते. त्यांची उत्तरें देतांना मला कष्ट होत होते. हिंदुस्थानांत असणाऱ्या माणसांना ज्या गोष्टी त्याज्य वाटतील अशा आहार-विहारांतल्या बऱ्याचशा गोष्टी मला नाइलाजानें कराव्या लागल्या होत्या. ती हकीकत सांगतांना माझें मलाच वाईट वाटे.

पण ऐकतांना काकांना त्याचें कांहींच वाटलें नाहीं, असें मला स्पष्ट दिसत होतें. ते म्हणाले, " हें असं व्हायचंच. खाण्यापिण्याचे निर्बंध पाळूनसुद्धां विलायतेंत राहता येतं हें मला माहीत आहे. पण तें फक्त श्रीमंतानांच सुसाध्य आहे, हें मी जाणतों. गरीबीनं रहायचं म्हटले म्हणजे खाण्यापिण्याचे निर्बंध पाळून चालत नसतं, असं पुष्कळांनीं मला सांगितलं आहे. निरामिष आहार विलायतेंत महाग जातो, तेव्हां अर्थातच तूं ज्या परिस्थितींत गेली होतीस त्या परिस्थितीला अनुसरून तुला आपल्या आहारांत फरक करावा लागला असेल तर त्याबद्दल मला यत्किंचित् वाईट वाटणार नाहीं. आतां यानंतर कुणी प्रायःश्चित्ताची गोष्ट काढली—नव्हे मीच तुला विचारतों, आहाराच्या बाबतींत तुला जो फरक करावा लागला त्यासाठीं प्रायःश्चित्त घेतलं पाहिजे, असं तुला वाटतं का ? "

उत्तर द्यायला मला क्षणभर विचार करावा लागला. त्या विचारांतही मला निश्चितपणें कांहीं सांगता येईना म्हणून मी म्हटलें, " अजून मी या गोष्टीचा विचारच केला नाहीं. प्रायःश्चित्त घेणं अवश्य आहे असं जर माझ्या बुद्धीला पटलं तर मी प्रायःश्चित्तही घेईन. पण त्याबद्दल आधीं मला विशेष चौकशी केली पाहिजे. तोंपर्यंत मला अपंक्त ठेवायचं असेल तर खुशाल ठेवा. ही सवय कांहीं मला नवीन नाहीं ! "

माझें हें भाषण ऐकून ताई अगदीं पोटभर हंसली. ती म्हणाली, " तुमचाच तेवढा प्रायःश्चिताचो आग्रह कां ? या मुंबई-पुण्यांत मी सर्वत्र पाहिलं आहे—वाटेल तो माणूस वाटेल तिथं आणि वाटेल तें खातो. त्याची बकवा मात्र होत नाहीं. तूं विलायतेला गेली होतीस म्हणून खाण्यापिण्यांत तुझ्या हातून धर्माचा अतिक्रम झाला आहे, असें कुणी म्हणेल आणि म्हणूनच तूं प्रायःश्चित घ्यावं असा सर्वांचा आग्रह पडेल—पण इथंच राहून खाण्यापिण्याचे निर्बंध न पाळणाऱ्या माणसांना

प्रायःश्चित्ताची कुणी सक्ती केली नाहीं तोपर्यंत तुला प्रायःश्चित घ्यायची जरुरी आहे, असं मला तरी वाटत नाहीं. ”

“ पाहिलंस मथू—” काका म्हणाले, “ ही आम्हां पुरुषाहून आतां सुधारक बनूं लागली आहे. आगरकरांचीं पुस्तकं वाचल्याचा हा परिणाम. तूं गेल्यानंतर तिचं मन फार उद्विग्न झालं होतं, म्हणून मी कांहीं पुस्तकं तिला वाचायाला आणून दिलीं होतीं. त्यांत कांहीं आगरकरांची होतीं, कांहीं लोकहितवादींची होतीं, आणि सर्वांत वाईट म्हणजे रा. रा. भागवतांचीं होतीं. तीं पुस्तकं वाचून तिचं डोकं हल्लीं बिघडलं आहे. एकाद्या सुधारकाला देखील लाज वाटेल इतक्या बेफामपणानं ही बोलत असते. मला वाटलं होतं, कीं ही नुसती बोलूनच थांबेल म्हणून. पण आतां धडधडीत तुला प्रायश्चित्त घेऊं नको म्हणून सांगते आहे, तें ऐकून तर मी थक्कच झालों आहें. ”

या बाबतींत चंदूचें काय मत पडेल हें जाणण्याची माझी उत्कंठा होती. पण तो कोर्टांत गेला होता. रात्रीं परत आल्यावर कांहीं ना कांहीं तरी कारण काढून हा विषय पुन्हां उकरून काढावा असें मी ठरविलें. मात्र लीला म्हणाली, “ तूं प्रायश्चित्त घेतलं नाहींस तर तुला आमच्या घरीं मात्र जातां येणार नाहीं. या विषयाची घरीं खूप चर्चा होऊन गेली आहे. नानासाहेबांचा तर असा समज आहे कीं तूं बहुतेक किरिस्तांव होऊन येणार. विलायतेला गेल्यानंतर हिंदुधर्मांत कुणी राहणारच नाहीं, असा त्यांचा ठाम समज झाला आहे. बोटीवरून उतरतांना तुला पाहिलं त्या वेळीं मी देखील आश्चर्यचकित झालें. मला वाटलं होतं, कीं तूं बहुतेक मडमेसारखा पोषाख करून येशील. म्हटलं, आमची मडमकाकू एकदां डोळे भरून पाहीन ! पण माझा अगदीं विरस झाला. बूट स्टॉकिंग्जचं मला कांहीं वाटलं नाहीं. इकडेदेखील हल्लीं कुणी बायका बूट स्टॉकिंग्ज वापरूं लागल्या आहेत. मग त्या कडक थंडीच्या प्रदेशांत तूं बूट स्टॉकिंग्ज घातले असलेस तर त्याबद्दल मला कांहीं विशेष वाटलं नाहीं. पण पोषाखाच्या बाबतींत मात्र माझी निराशा झाली. मला वाईट वाटलं म्हणेनास. तूं अशी कांहीं तरी पोषाख बदलून आली असतीस तर मला जास्त आनंद झाला असता. कुणी कुठं तुझं नांव छापणार त्यावेळीं तुझ्या डिग्रया लोकांच्या नजरेला येणार, पण प्रत्यक्ष पाहिल्याबरोबर ही एक विलायतच्या डिग्रया घेऊन आलेली बाई आहे, असं दिसायला कांहीं तरी साधन पाहिजे–आणि म्हणूनच तूं मडमेसारखा पोषाख करून आली असतीस तर मला जास्त बरं वाटलं असतं. ”

लीलेच्या भाषणाचें मला खरोखरच हसूं आलें. तिची कल्पना मोठी विलक्षण होती यांत शंका नाहीं. डिग्र्या मिळविलेले हिंदुस्थानांतले पुरुष हल्लीं आपला पोषाख साहेबी थाटाचा करण्याची दक्षता दाखवित असतात. साध्या पोषाखांत वावरणारा पदवीधर विरळा! श्रीमंती अचानक आली म्हणजे तिचें प्रदर्शन करण्यासाठीं एकादी बाई जशी स्वतःला दागिन्यानें मढवून घेते त्याचप्रमाणें पदवी मिळाली कीं पुरुष आपला पोषाख त्या काळांत साहेबी थाटावर नेत असे. पदवीधरांची संख्या त्यावेळीं जास्त नव्हती, म्हणून जो कोणी पदवीधर होत असे त्याला पाहून, हा पदवीधर आहे, हें न सांगतांही लोकांना कळावें अशी त्यांची उत्कंठा असे. त्या तत्कालीन प्रचाराच्या अनुरोधानें लीलेला वाटलें तें असमर्थनीय नव्हतें. त्या काळांत काय किंवा आजच्या काळांत काय, अशा कितीशा बायका विलायतेला गेल्या आहेत? जी एकादी जाते तिचा टेंभा मिरवला जावा असें तिच्या जिव्हाळ्याच्या माणसांना वाटलें तर तें अस्वाभाविक नव्हतें.

मी विलायतेच्या गोष्टी सांगत होतें. ताई, काका आणि लीला माझ्यासमोर बसून त्या गोष्टी ऐकत होतीं पण सरूबाई मात्र समोर येऊन बसली नाहीं. किंबहुना माझ्या विलायतच्या गोष्टी ऐकण्याच्या बाबतींत तिनें बुद्धिपुरःसर अनास्था दाखविली, असें मला दिसून आलें. आम्हीं बोलत होतों त्यावेळीं ती स्वयंपाकघराच्या दाराशीं बसून दाळ तांदूळ निवडीत होती.

मला थोडेंसें आश्चर्य वाटलें. बायकांच्या ठायीं अकारण जिज्ञासा असते असें म्हणतात. नसत्या उठाठेवी करण्याची संवय बायकांना असते असा पुरुषांचा त्यांच्यावर आरोप आहे. विलायतच्या गोष्टी कुणाला ऐकायला नकोत? त्या गोष्टी वारंवार ऐकायला मिळणाऱ्या नाहींत. क्वचित् एकादीच संधी यायची, असें असूनही सरूबाई मुद्दाम दूर जाऊन बसली त्याचें मला आश्चर्य वाटलें. तिला हाक मारावी असेंही एकदां माझ्या मनांत आलें होतें; पण ती अमूक म्हणून मला आणि मी अमूक म्हणून तिला परिचय करून दिला असतांही ती माझ्याशीं सलगी वाढविण्याचें कोणतेंही लक्षण दाखवीत नाहीं असें दिसून आल्यामुळें तिला हाक मारण्यास मला संकोच वाटला.

माझ्या मनांत दुसरा एक संशय आला. चंदूनें पूर्वीच्या हकिकती तर तिला सांगितल्या नसतील?

सांगितल्या असतील असें माझें मन सांगेना. मग ही अशी कां वागते? इतक्यांतच माझ्याबद्दल असा दुष्टपणा कां दाखविते?

आम्हीं बोलत असतांच ती 'बाहेरून जाऊन येतें' असें म्हणून जेव्हां निघून गेली त्यावेळीं मी ताईला विचारलें, "कशी काय आहे चंदूची बायको?"

माझा प्रश्न ऐकून ताई क्षणभर स्वस्थ राहिली आणि काकांकडे वळून म्हणाली, "आतां इकडनंच काय तें सांगायचं! मी इथं कुठं येतें आहे फारशी? चंदूचं बिऱ्हाड झाल्यावर इथं यायची ही माझी दुसरी खेप. गांवीं असतांना लग्न झाल्यावर ती सासरीं म्हणून आली होती. त्यावेळच्या अनुभवावरून सांगायचं म्हणजे—" असें म्हणून ती स्वस्थ राहिली.

काका म्हणाले, "मधेंच कां थांबलीस? सरळ सरळ काय तें सांगून टाक झालं! ऐक मथू, ती सांगायची नाहीं—मी सांगतों. चंदूचं लग्न झाल्यांनतर माझी चूक मला कळून आली. मुलगी पहायला मीच गेलों होतों. मी मुलगी पसंत करून लग्न ठरवलं असं जरी नाहीं, तरी मुलगी पाहण्यासाठीं मी पाहिल्यानंतर चंदूला मीच पाठवलं. आम्हाला पसंत आहे असा त्याचा समज झाला असावा. लिहिणावाचणारी आहे, मराठी पाचवी इयत्ता शिकलेली आहे, इंग्रजी शाळेंत कांहीं गेली नाहीं—पण इतक्या शिकलेल्या मुली तरी अजून कुठं मिळताहेत? पुण्याची आहे. चांगल्या घरंदाज घराण्यांतली आहे. बाप सरकारी अम्मलदार आहे. अशा वरवरच्या सर्व गोष्टी पाहून मी चंदूला एक प्रकारें हें लग्न ठरवायला उत्तेजन दिलं. तो जाऊन स्वतः पाहून आला. त्यांचं बोलणं निघतांच मी त्याला विचारलं त्यावेळीं त्यानंही होकार दिला. मला थोडंसं आश्चर्य वाटलंच! पण मी उघड उघड विचारून त्या विषयाची फारशी छाननी केली नाहीं. मला कबूल आहे, कीं ही माझी चूक झाली. पण त्यापेक्षांही चंदूची चूक मोठी आहे. मला स्वतःला लग्न करायचं असतं तर मी कांहीं ही मुलगी पसंत केली नसती. पसंतीचा भार चंदूवर टाकून एकाप्ररीनं जरी मी आपल्या जबाबदारींतून मोकळा झालों होतों तरीही माझी तात्विक जबाबदारी मी पार पाडली, असं आज मला वाटत नाहीं. या बाबतींत माझ्या हातून चूक झाली आहे, गुन्हा झाला आहे, पाप झालं आहे—किंबहुना माझ्या या मुक्या संमतीमुळंच मला हें स्थळ पसंत आहे, असं चंदूनं गृहीत धरलं. खरं सांगायचं म्हणजे आजचा त्याचा संसार सुखाचा नाहीं. चार

दोन महिन्यांनीं तरी मी इथं येत असतों. चंदूची प्रॅक्टिस फार उत्तम चालते आहे असा माझा समज आहे. असं मी म्हटलं एवढ्याचकरितां, कीं त्याच्या उत्पन्नाचा हिशेब मी कधींच घेतला नाहीं. चंदूवर विश्वास आहे म्हणून असा हिशेब घेण्याची मला जरूरी वाटली नाहीं. त्याची प्रॅक्टिस चांगली चालते आहे म्हणूनच मी वारंवार इथं येत असतों. पण ज्या ज्या वेळीं मी इथं येतों त्या त्या वेळीं माझं पाप माझ्यासमोर उभं राहतं. संकोचानं ती दोघं माझ्यासमोर बोलत नाहींत असा पहिल्यानं माझा समज होता. पण जसजसं मी बारकाईनं पाहूं लागलों, तसतसा माझा समज चुकीचा होता असा प्रत्यय मला येऊं लागला. त्या दोघांच्या स्वभावांत जमीन–अस्मानाचं अंतर आहे. साम्य आहे एकाच बाबतींत. म्हणजे तिलाही डोकं आहे. तीही न बोलून शहाणी आहे. दोघांपैकीं कुणीही आपली तक्रार उघडपणें दुसऱ्या कुणालाही सांगत नाहींत. एकपरीनं जरी हें बरं असलं तरी त्यामुळं दोघांच्या मधलं अंतर दिवसेंदिवस बळावत चाललं आहे. मी एकदां ठाव घ्यायचा प्रयत्न केला; पण दोघांपैकीं एकानंही मला स्पष्ट जबाब दिला नाहीं. मुंबईच्या चाळींत राहणारे दोन खोल्यांतील दोन गृहस्थ तरी एकमेकाशीं जास्त सलगीनं वागतात–पण या दोघांचा एकमेकांच्या बाबतींत तुसडेपणा चाललेला दिसतो. तो पाहून या पापाचा धनी मीच आहें, असं वाटून माझं अन्तःकरण तुटूं लागतं. ”

असें म्हणून काका स्वस्थ बसले. ताईनें तर मान खालींच घातली होती. मी तरी काय बोलणार होतें ? आल्यापासून सारखी सुरू झालेली आमची बडबड त्या एका विषयाच्या उहापोहामुळें एकदम थांबली.

किती तरी वेळ कुणीच कांहीं बोललें नाहीं. लीलेच्या बडबड्या स्वभावाला तें रुचलें नसावें.

कुणीच बोलत नाहीं असें पाहून ती म्हणाली, “ बऱ्या चांगल्या बोलत होतों– ही कसली गोष्ट काढलीस काकू ? काय करायचं आतां त्याचं ? लग्न व्हायचं तें होऊन गेलं. दोघांचं कांहीं पटत नाहीं, हेंही ठरलं. मग आतां त्याला काय उपाय आहे ? कशाला मनाला वाईट वाटून घ्यायचं ? हीं असलींच कुटुंबं आपल्याला जिकडे तिकडे दिसतात. म्हणूनच मला वाटतं, कीं मुलीं लग्नच करूं नये–पण त्या वाटण्यांत कांहीं तथ्यांश आहे असं मात्र समजूं नकोस बरं काकू ! मला लग्न करायचं आहे, लग्न झाल्याशिवाय आपलं निभायचं नाहीं, हें मला पूर्णपणें पटतं. पण

असलीं जोडपीं पाहिलीं कीं वाटूं लागतं, कीं कशाला लग्न करायचं तें? खरोखर म्हणशील, तर मला तुझा मत्सर वाटतो काकू! तुझ्यासारखीच मी बालविधवा असतें—"

"चूप! चाहटळ कुठली!" ताई ओरडून म्हणाली, "कांहीं जिभेला हाड तरी मेलीच्या? काय बोलावं आणि काय न बोलावं एवढं तरी कळतं का या पोरीला?"

लीला म्हणाली, "कळो कीं न कळो—पण 'बालविधवा असतें तर' असं म्हटल्यानं कांहीं बिघडत नाहीं. मी आतां एवढी मोठी झालें आहें, कीं यापुढं वैधव्य आलं तरीही मला कुणी बालविधवा म्हणणार नाहीं. कुणीही झालं तरी मला बड्या विधवेच्या पंक्तींत बसवणार! तेव्हां चर्चेसाठीं नुसता विधवेचा उल्लेख केला तर त्याचं तुला कां वाईट वाटतं? मी खरोखरीच म्हणतें, मला वैधव्य आलं असतं तर हा रोज लग्नाचा ससेमिरा ऐकून तरी घ्यावा लागला नसता. काकूच्या लग्नाचं कधीं कुणी बोलतात का? किती सुखी आहे ती? एवढी वाढली आहे पण अजून तिला कांहीं कुणी वाढलेली मुलगी म्हणत नाहींत! कां? तुम्ही म्हणाल, तिचं लग्न झालं आहे—पण तें कसलं लग्न? बाराव्या दिवसाच्या बारशाची आठवण आणि या लग्नाची आठवण, हीं दोन्हींही तिच्यालेखीं सारखींच आहेत. मग आतां कुणी तिच्या लग्नाच्या गोष्टी कां नाहीं बोलत? ती विधवा झाली आहे म्हणून ना? म्हणूनच मी म्हणतें, कीं या असल्या चंदूंच्या संसारापेक्षां बालवैधव्य हजार वाटेनं बरं!"

लीलेच्या या भाषणावर कुणीच उत्तर दिलें नाहीं. संध्याकाळीं आम्हीं फिरायला गेलों. मुंबईच्या रस्त्यांतून केव्हां एकदां फिरेन असें मला झालें होतें. पहिल्यानें आम्ही ट्रॅममधून निघालों. ट्रॅममधून जितका प्रवास करतां येणें शक्य होतें तितका केला. नंतर एक व्हिक्टोरिया केली. व्हिक्टोरिया करून मलबार हिलवर गेलों. मुंबईच्या माथ्यावर उभे राहून समुद्रकांठची शोभा एकदां डोळांभर पाहिली. मातृभूमीच्या दर्शनानें जिवाची तहानभूक निवाल्यासारखी वाटली.

दिवे लावणीनंतर घरीं परत आलों, त्यावेळीं चंदू आला होता. आम्हीं आल्याची चाहूल त्याला लागली नाहीं, इतका तो संतापलेला दिसला. केवढ्यातरी मोठ्यानें तो बायकोबरोबर भांडत होता—भांडत होता म्हणण्यापेक्षां नुसतें टाकून बोलत होता असें म्हटलेलें जास्त बरोबर होईल—कारण, ती कांहींच उत्तर देत नव्हती.

आम्हीं आलेलीं समोर पाहतांच त्याचें बोलणें बंद झालें.

त्या भांडणामुळें तो ओशाळल्यासारखा झाला होता. आपण कां भांडत होतों हें कुणीच विचारीत नाहीं, म्हणून त्याचा ओशाळेपणा पदोपदीं वाढत जात होता.

जेवणखाण आटोपल्यावर आम्हीं पुन्हां दिवाणखान्यांत बसलों. मला दुपारची आठवण झाली आणि मी चंदूला अगदीं उघड उघड प्रश्न केला, " असं पहा चंदू, विलायतेहून मी परत आलें, तिथं खाण्यापिण्याचा धरबंद मी कांहीं ठेवला नव्हता. मी प्रायःश्चित्त घेतलं पाहिजे का ? "

माझा प्रश्न ऐकून चंदू माझ्याकडे सारखा पाहातच राहिला.

उत्तर द्यायला त्याच्या तोंडून शब्दच निघेना !

## प्रकरण तिसरें ::::::::::::::::::::::::::::::::::::::::::::: गृहिणी

चंदू बोलत नाहीं असें पाहून काका म्हणाले, " कां रे गप्पसा राहिलास? कांहीं उत्तर द्यायला सुचत नाहीं का ? कीं खरं बोलायला भितो आहेस ? हें पहा, खरं बोलायला भिणं कांहीं चांगलं नाहीं. मला माहीत आहे, कीं तूं वकील झाला आहेस. खोटं बोलणं हा तुझा पेशा आहे. त्या पेशामुळं खोटं बोलणं तुला जितकं सुलभ वाटतं तितकंच खरं बोलणं तुला कठीण जातं, हें मला माहीत आहे. आम्हीं खोटं बोलायला सरावलों नाहीं. मनांत उद्गार आला, कीं तो तोंडाबाहेर निघून जातो. मुद्दाम म्हणून खरं बोलायचा आम्हाला प्रयत्न करावा लागत नाहीं. तेव्हां तूं क्षणभर स्वस्थ राहिलास यांत मला नवल वाटलं नाहीं. आतां तोंड उघडशील तेव्हां बोलायचं तें खरं बोल."

काकांचें भाषण ऐकून चंदू गालांतल्या गालांत हंसला आणि म्हणाला, " तुम्हीं म्हणतां तें कांहीं खोटं नाहीं. असंच कांहींसं झालं आहे खरं. खरं असो वा खोटं असो, विचार केल्याशिवाय कोणतीच गोष्ट बोलतां यायची संवय हळुहळू जात चालली आहे. कांटयाकुटयांतून चालतांना माणूस जितकं जपून पाऊल टाकतो तितकंच

बोलतांना जपून बोललं पाहिजे, असं बाण्यालाच खिळून गेलं आहे. आतां हिच्या प्रश्नाच्या बाबतींत बोलायचं म्हणजे मला मोठी पंचाईत आली आहे. इतक्या वर्षांनीं मथुताई परत आली. तिनं माझ्या घरीं रहावं, दुसऱ्या कुठं जाऊं नये, असं मला वाटतं आहे. आणि खरं बोललं तर तिला माझं घर सोडावं लागेल. ''

''तें कसं काय बोवा? '' काका भुंवया वर चढवून म्हणाले. चंदूच्या तोंडून चटकन् उत्तर आलें नाहीं. त्यानें एक वेळ माझ्याकडे पाहिलें. दाराआड उभ्या असलेल्या आपल्या पत्नीकडे पाहिलें आणि मग बोलायला सुरवात केली. तो म्हणाला, '' आम्हीं कसे वागतों तें आम्हांला माहीत आहे. धर्माचीं बंधनं म्हणून जर कांहीं पाळायचीं असतील तर आम्हांला दिवसांतून तीन वेळां तरी प्रायःश्चित घ्यावं लागेल. आमचं जिथं असं तिथं प्रायःश्चित घे असं, मथूला कोणत्या तोंडानं सांगावं? तेव्हां प्रामाणिकपणानं बोलायचं म्हणजे मथूनं प्रायश्चित घेऊं नये, हेंच खरं. पण मथूनं जर प्रायश्चित घेतलं नाहीं, तर तिला इथं राहतां येणार नाहीं. आतां लपवून कशाला ठेऊं? हा आमच्या गृहिणीचा हुकूम आहे. आज ती इथं राहिली यावरच आमचीं रणं माजलीं होतीं. उद्यां उपाध्याला बोलावून शांत करायला तिनं मला सांगितलं आहे. इतकंच नव्हे, तर उद्यांच्या उद्यां तिनं प्रायःश्चित घेतलं नाहीं, तर एक तिनं तरी घराबाहेर गेलं पाहिजे किंवा आमची पत्नी तरी माहेरीं निघून जाणार आहे. तुम्ही वडील आहांत. याचा निकाल तुम्हींच काय तो द्यावा. ''
चंदू गंभीरपणानें बोलत होता, पण त्याचें भाषण संपतांच काका मोठमोठ्यानें हंसले. त्यांच्या त्या वृत्तीचा चंदूला थोडासा रागच आल्यासारखा दिसला.

काका म्हणाले, '' माझं मत तुला माहित आहे. कुठल्यातरी पुस्तकांतील धर्मापेक्षां मी मनुष्यधर्माला जास्त महत्त्व देतों. मला माझं अंतःकरण सांगेल, तोच माझा धर्म. कुठल्यातरी पुस्तकांत, कुठल्यातरी संस्कृत श्लोकांत, कुणीतरी सांगितलं आहे, म्हणून तें मानायची माझी तयारी नाहीं. तें तसं सांगितलेलं जर माझ्या बुद्धीला पटत असेल, तर मी त्याप्रमाणें वागेन. पण माझ्या बुद्धीला तें पटत नसलं तर केवढ्याही मोठ्या महापुरुषानं सांगितलेली गोष्ट मी धुडकावून देईन. माझं हें असं आहे. मथूनं प्रायःश्चित्त घ्यावं असं मला वाटत नाहीं. प्रायश्चित्त घ्यावं असं तिला वाटत असेल तर तें तिनं अवश्य घ्यावं—तें घेऊं नकोस म्हणून सांगण्याइतकी मी सुलतानशाही गाजवणार नाहीं. मला पटतं—पण तिला जर पटत नाहीं, तर

केवळ मला खूष करण्यासाठीं म्हणून तिनं आपल्या मताविरुद्ध वागावं असं मी केव्हांही म्हणणार नाहीं. माझी वृत्ती तुला माहित आहेच. तें नव्यानं सांगायला नको."

" पण मी काय करूं तें मला सांगाल ना ?" चंदू म्हणाला, " घरांतला हुकूम हा असा आहे. आणि तुमचं आणि माझं मत बरोबर आहे. मग मी आतां काय करूं ?"

" काय वाटेल तें कर ! " काका म्हणाले, " असं वाग किंवा तसं वाग, असं सांगायचा माझा अधिकार नाहीं. तुझा तूं मुखत्यार आहेस. प्रायःश्चित्त घेतलं नाहीं म्हणून मथूला घरांतून बाहेर घालवून दिलीस तर तिला घेऊन मी गांवीं जाईन आणि मथूनं प्रायःश्चित्त घेतलं नाहीं असं असूनही तिला घरीं ठेवलंस आणि त्यामुळं तुझी बायको माहेरीं निघून गेली, तर त्याचंही मला कांहीं वाटणार नाहीं. यापुढं तुला काय करायचं असेल तें कर. यापेक्षां जास्त निश्चितपणानं सांगायची माझी ताकद नाहीं आणि इच्छाही नाहीं. "

काकांचें भाषण संपतांच चंदू दाराकडे पाहून म्हणाला, " काका काय सांगतात तें ऐकलंस का ? यावर तुझं काय म्हणणं आहे ? "

दाराआडून शब्द आले–" माझं कसलं आलं आहे म्हणणं ? मला कांहीं अधिकार आहे का इथं ? कितीही झालं, तरी मी पायांतली वहाण. पण हा असला अधर्म जिथं होत असेल, तिथं मला रहायचंच नाहीं. पायांतली वहाण असली तरी ठेंच लागली कीं तुटते—पायांतून निसटून जाते. पण मी एकदां सांगून ठेवतें, कीं जोपर्यंत ही बाडगी बाई या घरांत आहे, तोपर्यंत मी इथं पाऊल देणार नाहीं. "

चंदूच्या बायकोचें हें भाषण ऐकतांच सर्वच स्तब्ध बसलीं. या बाबतींत कोण काय बोलणार होतें ? हा ज्याच्या त्याच्या मुखत्यारीचा प्रश्न होता.

वेळ आणीबाणीची होती यांत शंका नाहीं. चंदूला मोठाच धक्का बसल्यासारखा दिसत होता तो अगदीं सुन्न झाला होता. त्याच्या चेहऱ्यावरून निरनिराळ्या विकारांच्या छाया झराझर बदलत जात होत्या.

मनाचा निर्धार करून त्यानें उत्तर दिलें, " माझा नाइलाज आहे. मथूला घेऊन तुम्हांला गांवीं जायचं असेल, तर उद्यां सकाळीं सात वाजतां बोट आहे. पोंचवायला मी बरोबर येऊं कीं येऊं नको ? "

चंदूचा निश्चय ऐकून काका मोठमोठ्यानें हंसले, मलाही हंसूं आलें. पण तें कां आलें तें माझें मलाच समजलें नाहीं. लीला मात्र चिडून म्हणाली, " पुरुष आहेस

कीं कोण आहेस, चंदूभाऊ? नुसती बायको म्हणते ती काय आणि त्यासरशीं पांच वर्षांनीं परदेशाहून परत येणाऱ्या जिवाभावाच्या मैत्रिणीला घराबाहेर घालवतोस काय? लाज नाहीं वाटत? बायको एवढी ताब्यांत रहात नाहीं, तर लग्न तरी कशाला केलंस? अशी अनावर बायको आहे, हें लग्न करायच्या पूर्वीच तुला कळलं नव्हतं का?"

"मुळींच कळलं नव्हतं!" चंदू संथपणानें म्हणाला, "तसं कळलं असतं तर या लग्नाच्या भानगडींत कशाला पडलों असतों? आज तुम्हां सर्वांसमक्ष मान खालीं घालायचा प्रसंग कां आला असता? उद्यां मथूला तुम्ही घेऊन जा असं काकांना मी सांगतों आहें, तें सुखानं का सांगतों आहें? विलायतेहून परत आल्या-बरोबर दुसऱ्याच दिवशीं असा प्रकार होऊन मथू माझ्या घरून निघून गेली तर मला आनंद का होणार आहे? काय वाटलं तुला? मी कसाब आहें असं तुला वाटलं?—"

बोलत असतांना तो सुस्कारे सोडित होता—धापा टाकीत होता. क्षणभर स्वस्थ राहून तो म्हणाला, "तूं देखील मोठ्या बढाया मारीत असतेस लीले. पण तसाच प्रसंग आला कीं तुझीदेखील माझ्यासारखीच फजिती होईल. आज ही माझ्या घरांतून निघून गेली—माहेरीं गेली, तर चारचौघांत तोंड दाखवायलादेखील मला जागा राहणार नाहीं. मला जगांत वागायचं आहे. कोर्टकचेऱ्या पहायच्या आहेत. प्रत्येकाच्या तोंडीं हा विषय होईल. प्रत्येकजण आपापल्यापरीनं मला विचारूं लागेल. प्रत्येकाला मला उत्तरं द्यावीं लागतील—तो प्रसंग मला नको आहे. मथू उद्यां काकांबरोबर गांवीं गेली तरी त्याचं कुणालाच कांहीं वाटणार नाहीं. ती त्यांची सासू आहे. ते तिचे जांवई आहेत. तिथं जायचा तिला अधिकार आहे. पण ही जर माहेरीं निघून गेली तर मात्र त्या गोष्टीची बकवा झाल्याशिवाय राहणार नाहीं. मला यावेळीं किती दुःख होतं आहे, काळजाला कशा टोंचण्या लागताहेत, हें कुणाला सांगूनसुद्धां कळायचं नाहीं. पण ज्या निगरगट्टपणाच्या जोरावर मी वकिलीचा धंदा चालवतों आहें, त्याच निगरगट्टपणाचा आश्रय करून मी काकांना तसं निक्षून सांगि-तलं. मथूला मला भेटायचं असेल तर सुट्टींत गांवीं जाऊन तिला भेटेन. त्यावेळीं ही माहेरी गेली तर कुणाला त्याचं कांहीं वाटणार नाहीं. पण इथं मथू राहिली, त्यामुळं रण माजलं आणि ही माहेरीं निघून गेली, तर माझ्यावर किती घाणेरडे

आरोप येतील याची तुला कल्पना नाहीं. माझ्यावर आरोप आले तरीदेखील तें मी पत्करलं असतं पण त्या आरोपाचा शिंतोडा मथूच्या चारित्र्यावरही उडाल्यावांचून राहणार नाहीं. तसं व्हायला नको आहे. मथू विलायतेहून आली पण माझ्या घरीं राहिली नाहीं, याचं मला दुःख झालं तर गिळून टाकीन; पण हें असं कांहीं झालं तर त्यापासून होणारं दुःख गिळून टाकण्याची ताकद माझ्या अंगीं नाहीं. त्यासाठीं तूं मला कितीही नांवं ठेवलींस तरी त्याची मला पर्वा वाटणार नाहीं. ''

'' खरं आहे '' काका म्हणाले, '' ऐकलंस लीले, चंदूचं म्हणणं अक्षरशः खरं आहे. आणि अग ए, तुलादेखील तें पटल्यावांचून राहणार नाहीं. सकृद्दर्शनीं चंदूचं म्हणणं चमत्कारिक वाटतं खरं पण व्यावहारिकदृष्ट्या तें योग्य आहे. चंदूला वाईट वाटलं तरी चालेल, पण मथूला कुणी नांवं ठेवलीं तर मला मरणप्राय दुःख होईल. आतां तुझं म्हणणं काय आहे तें मला सांग. ''

ताई अगदीं खिन्नपणानें हंसली आणि म्हणाली, '' मी काय सांगणार त्यांत? हिला माझ्या घरीं घेऊन जायला मी कांहीं कुणाच्या बापाला भ्यायची नाहीं. आधीं तिच्या प्रायःश्चिताचा प्रश्नच निघायचा नाहीं–तो पूर्वीं एकदां देवाचा कौल मिळाला आहे ना–तेव्हांपासून सर्वांचीं तोंडं बंद झालीं आहेत. पण निघालाच तर मी तिथल्या गांवगुंडांची कांहीं पर्वा करणार नाहीं. आम्हांला वाळींत टाकायची कुणाची छाती नाहीं. चार दिवस बोलतील आणि पुढं आपोआप गप्प होतील. ''

'' ऐकलंस चंदू ? '' काका म्हणाले, '' झाली तुझी खात्री ? आतां आमच्याकडे पहा आणि तूं आपल्याकडे पहा ! आम्हीं जुन्या काळचीं माणसं. मतं सुधारकी असलीं तरी आम्हीं जुन्या काळचेच ! आम्हीं असं म्हणतों—म्हणजे विशेषतः ही देखील असं म्हणते–आणि तुझ्या बायकोला मात्र तें पटत नाहीं ! कां ? ''

चंदू म्हणाला, '' ते तुम्हींच आतां तिला विचारा. ''

काकानीं एकदां ताईकडे पाहिलें. ताईनें त्यांच्यावर डोळे वटारले. पण ते नुसते मिस्किलपणानें हंसले मात्र. त्यांना कुचाळीची लहर आली होती. ताईच्या दरडावणीला ती थांबण्याजोगी नव्हती.

दाराकडे वळून ते म्हणाले, '' अग ए सरू, अशी इकडे पुढं ये. तुझा चेहरा मला दिसूं दे. नुसतं बोलणं कानाला कळतं पण शब्दाचा मेळ चेहऱ्याशीं पटल्याशिवाय बोलणाराच्या वृत्तीचा अंदाज येत नाहीं. नुसतीं टेलिफोनचीं बोलणीं मला नको

आहेत. चांगल्या खणखणित माणसाचे शब्द मला पाहिजे आहेत. ”

सरूबाई दाराआडूनच म्हणाली, “ मी पुढं येणार नाहीं. मला तें आवडत नाहीं आणि जें मला आवडत नाहीं ते वडील माणसांनीं सांगितलं म्हणून मी ऐकणार नाहीं. ”

आरामखुर्चीच्या हातावर थाप मारून काका म्हणाले, “ शाबास! असं सणसणीत दिलेलं उत्तर मला फार आवडतं. पण आडपडद्यांतली बोलणीं मला नकोत आहेत. सर्वांसमक्ष तुला बाहेर यायचं नसेल तर मीच आंत येतों. तूंच मला काय सांगायचं तें सांग. ”

दाराआडून शब्द आले, “ मला काय विचारायचं आहे तें तिथूनच विचारावं. त्याचं उत्तर मी इथूनच देईन. वडील माणसांच्या समोर बसून उत्तर द्यायला मी कांहीं कॉलेजांत गेलें नाहीं कीं विलायतेलाही गेलें नाहीं! ”

सरूबाईचें उत्तर ऐकून काका क्षणभर स्तब्ध राहिले. पुढें काय बोलावें हें त्यांना सुचेनासें झालेलें पाहून ताई पुढें सरसावली आणि म्हणाली, “ ऐकलं का? तुम्हीं पुरुष मंडळी बाहेर गॅलरींत बसा. सरूबाईला काय विचारायचं तें मी विचारतें. ”

“ जसा हुजूरचा हुकूम! ” असे म्हणून काका उठले आणि चंदूला घेऊन बाहेर गॅलरींत गेले.

ते निघून जातांच ताईनें सरूबाईला बाहेर बोलावलें. ती बाहेर आली पण खुर्चीवर बसली नाहीं. ताई म्हणाली, “ बैस ना! तूं आतां कांहीं संकोच धरायला नको. ”

सरुबाईनें उत्तर दिलें, “ असलं हें खुर्चीवर बसणं मला कांहीं आवडत नाहीं. हे पुरुषी थाट विद्वान बायकांना शोभतात. आम्हीं आपली खुळीभोळीं गांवढळ माणसं. आम्हांला कशाला हव्यात खुर्च्या आणि कोचं? खालींच बसलें असतें पण इथं जमिनीवर साऱ्यांचे बूट फिरत असतात! ”

“ बरं! बरं! ” ताई म्हणाली, “ जसं तुला वाटेल तसं कर. आतां असं सांग, ही झाली ही चर्चा तूं ऐकलीस. या बाबतींत तुझं काय म्हणणं आहे? ”

सरुबाईनें उत्तर दिलें, “ माझं काय म्हणणं आहे तें तुम्हांला कळलंच आहे. मी आपली जुन्या काळच्या घराण्यांत वागलेली मुलगी. जुने आचारविचार पाहिलेले. तशीच वागत आलें. तुमच्या या नव्या चाली चांगल्या असतील पण मला त्या कांहीं पटत नाहींत. आणि धर्माची बाब आली कीं मी मुळींच माघार घ्यायची

नाहीं. आतां तुम्हीं म्हणाल, पुरुष मंडळी वाटेल तिकडे जातात, वाटेल तें खातात; पण दृष्टि आड सृष्टि आहे ना ? आमच्या समोर तर कांहीं खात नाहींत, कीं आम्ही असे असे जाऊन अमुक ठिकाणीं अमुक खाल्लं असंही कांहीं सांगत नाहींत. खाण्यापीण्याचं एक राहोच पण समुद्र पार होणं म्हणजे अधर्म आहे, असं वाडवडिल सांगत आले आहेत. मेलं प्रायःश्चित्त घ्यायचं, त्यांत एवढं काय बिघडतं ? प्रायःश्चित्त घेतल्यानं कांहीं मरायला होत नाहीं. तेवढा आपला एक धार्मिक विधी केला, कीं मनाला तेवढाच आपला मोकळेपणा वाटेल. आपलं होमहवन व्हायचं तें झालं कीं घर शुद्ध झालं. एवढ्या शुद्धिसाठीं तरी अट्टाहास कां ? आमच्या समजुती आहेत. त्या कदाचित् चुकीच्या असतील. पण आहेत त्या समजुती आतां कांहीं सुटत नाहींत. घरासारखं माणसानं झालं पाहिजे. म्हणूनच मी म्हटलं, मथूबाईंनीं प्रायःश्चित्त घ्यावं. प्रायःश्चित्त घेतल्याशिवाय त्या इथं राहिल्या आणि तें माझ्या माहेरीं कळलं, तर मला जन्मवेरीं माहेराला मुकावं लागेल–आणि तें कांहीं मला पटायचं नाहीं. सांगायचं तें सांगितलं–यापेक्षां जास्त मला कांहीं सांगायचं नाहीं. ”

बोलतांना ती मोरे हातवारे करीत होती. तडजोडीचें बोलणें करावयास तिच्या-जवळ कांहीं वाव होता असें मला तरी वाटलें नाहीं. तिनें भाषणाचा समारोपच केला होता. आतां ताई काय बोलते याच्याकडे माझ्याप्रमाणेंच लीलेचेंही लक्ष लागलें होतें.

ताई म्हणाली, “ असं पहा, तुझं सारं म्हणणं खरं आहे. पण आमच्या घरची रीतदेखील आमच्या हाडीमासीं खिळली आहे. ‘ हो सुने घरासारखी ’ अशी म्हण आहे, ती तुला माहीत आहे ना ? तुझ्या माहेरच्या चालीरीती इथं कांहीं चालायच्या नाहींत. इथं वडील माणसं आम्हीं आहोंत, आणि आम्हीं सांगू तें ऐकलं पाहिजे. तुझ्या नवऱ्याचंही मत तसंच आहे तिथं तुझं एकटीचं काय चालणार ? ”

“ नाहीं ना चालायचं ? ” सरूबाई वस्कन् म्हणाल्या, “ बरं आहे तर–मी आपली माहेरीं जातें. झग्यांतल्या साऱ्या मडमा आणून तुम्हीं घरांत भरा. मला त्याची मुळींच खंत वाटायची नाहीं. हवं तर आपल्या दीराचं दुसरं लग्न करून द्या. आतां कांहीं मडमांना तोटा नाहीं—”

तिचें भाषण अर्धेंच तोडून ताई म्हणाली, “ पुरे झालं. यापेक्षां जास्त ऐकायला नको आहे. चंदू भावजींना पटत असेल, तर आम्हीं तरी आग्रह कशापायीं

धरायचा ?" ती तशीच तडक गॅलरींत गेली आणि काकांना उद्देशून म्हणाली, "ऐकलं का ? सरूबाईपाशीं तडजोड होणं शक्य नाहीं. सकाळच्या ७ च्या बोटीनं आपण गांवीं निघायचं." लीलेकडे वळून ती म्हणाली, "तुला आमचं कोंकण पहायचं आहे ना लीले ? बोटीच्या प्रवासाची एकदां गम्मत तर पहा. नानासाहेबांना मी पत्र टाकीन." पुन्हां चंदूकडे वळून ती म्हणाली, "गज्याला सांगून आमच्या सामानाची बांधाबांध करा बरं चंदू भावजी. बरं झालं, कीं मथूताईच्या ट्रंका उघडल्या नाहींत."

चंदूनें एका शब्दानेंही उत्तर केलें नाहीं. बायकोला दुखवूं नये म्हणून आम्हीं कोंकणांत जाणें त्याला दुःसह झालें नाहीं, हें पाहून मलाही थोडें चमत्कारिक वाटलें.

मायभूमीवर पाऊल टाकतांच पहिल्याच दिवशीं आलेल्या या अनुभवामुळें माझें मन उद्विग्न झालें. हिंदुस्थानांत पुन्हां परत आल्याचा मला पश्चात्ताप होणार का, असाही प्रश्न पुढें उभा राहिला.

दुसऱ्या दिवशींच्या सकाळच्या बोटीनें आम्हीं प्रस्थान हलविलें.

## प्रकरण चवथें ............ बायकी नजर

स्मिथबाई अजून मुंबईंतच होत्या. डॉ. मॅकिकन हे मुंबईंतच होते. त्या दोघानांही भेटून जावें असें माझ्या मनांत फार होतें पण तें तसेंच राहून गेलें. काका आणि ताई यांनीं जी एकदम उचल खाल्ली त्यामुळें दुसऱ्याच दिवशीं आम्हां सर्वांना गांवीं जाणें भाग पडलें.

आम्ही गांवीं पोहोंचलों त्यावेळीं तेथें मोठीच खळबळ उडाली. अर्थांतच मी काकांकडे उतरलें होतें–माहेरीं गेलें नाहीं. मी आल्याचें कळलें तरी बाबा मला भेटायला आले नाहींत. आमच्या आईसाहेब तर मला लाखावारी शिव्या मोजीत होत्या असें मला ऐकू आलें. बनी आणि गोविंदा हल्लीं मुंबईंत असत. पण तींही यावेळीं गांवीं होतीं. मी गांव सोडून निघतांना मला आशिर्वाद देणारे दादा मात्र हयात नव्हते हें पाहून मला फार दुःख झालें.

पूर्वींची आठवण कांहीं बुजाली नव्हती, त्यामुळें मला नांवें ठेवण्याच्या बाबतींत गांवांतील लोक थोडी फार कच खात होते. त्यातूनही कित्येकांनीं अशी शक्कल काढली, कीं आतां विलायतेला जाऊन आल्यावर माझ्यावरची देवाची कृपा तशीच

राहणें शक्य नाहीं. कुणीकुणी तर पुन्हां मला देवळांत नेऊन तोच कौल मिळतो कीं काय, याचा प्रत्यय पाहायची सूचना पुढें आणली.

कौल मिळेल कीं मिळणार नाहीं याबद्दल जरी मला कांहींच अंदाज नव्हता, तरीही मी केव्हांही देवळांत जायला तयार होतें. पूर्वी मिळाला होता तो देवाचा कौलच होता कीं नुसती अचानक घडून आलेली एक घटना होती, याचीही मला शंका होती. पुन्हां देवळांत जाऊन मुद्दाम हात दाखवून अवलक्षण करूं नये, असें काकांचें मत होतें.

पण मला मात्र देवाच्या देवत्वाचा पडताळा पहायचा होता म्हणूनच मी तसलें दिव्य करण्यास तयार झालें. कौल मिळाला नसता तरीही माझें मोठेंसें नुकसान होणार नव्हतें. पूर्वीची परिस्थिति बदलली होती. गांवांत मला रहायचें नव्हतें. यापुढील आयुष्याचा भाग कोणत्या जागीं घालवावा लागणार, याची मलाही कांहींच कल्पना नव्हती. पण तो कोकणांतील या गांवीं घालवावा लागणार नाहीं, हें निश्चित होतें—असें असल्यामुळें कौल मिळाला नाहीं आणि त्यामुळें गांव सोडावा लागला तरी मला त्याबद्दल कसलीच खंत वाटणार नव्हती.

कौल घेण्यासाठीं माझी तयारी होती खरी पण देवळांतील पुजारी त्या गोष्टीला तयार नव्हते. प्रायःश्चित्त घेतल्याशिवाय मला देवळांत पाऊल टाकूं द्यायचें नाहीं, असा ज्या कांहीं लोकांचा निर्धार होता, त्यांचे पुढारी प्रत्यक्ष माझे बाबाच होते. मी देवळांत जाऊन कौल घेण्यास तयार आहें पण पुजारी लोक मला देवळांत प्रवेश करूं द्यायला तयार नाहींत, या दोन परस्पर विरुद्ध गोष्टींचा गांवांतील सामान्य लोकांवर फार चमत्कारिक परिणाम झाला.

त्यांची माझ्याविषयींची श्रद्धा वाढली. मी देवळांत गेलें आणि माझ्यासारखा कौल मिळाला तर देवळांत माझ्या प्रवेशाला हरकत करणाऱ्या लोकांची फजिती झाली असती, म्हणूनच प्रायःश्चित्ताचा बागुलबोवा पुढें आणून ते मला देवळांत जाऊं देत नाहींत, असा सामान्य जनतेचा समज झाला.

मागासलेल्या वाटणाऱ्या या लहानशा खेड्यानें अशा रीतीनें प्रायःश्चित्ताच्या दिव्यांतून मला मोकळें केलें.

गांवीं आल्यापासून सारा वेळ विलायतेंतील गोष्टी बोलण्यांत जात असे. त्या गोष्टी लीलाही फार लक्ष लावून ऐकत असे. माझ्या तोंडच्या हकिकती ऐकून

लीलेला विलायतेला जाण्याची स्फूर्ति होऊन काय उपयोग? विलायतेला जायचें कसें–आणि कसें जायचें हेही संकट निवारण झालें, तरी वडील माणसें पाठविणार कशीं, हाच मोठा प्रश्न होता.

विलायतेला गेल्यानंतर प्रो. भिसे यांजकडे मी फारच थोडें दिवस राहिलें. जातांना जीं पत्रें मला मिळालीं होतीं त्यांच्या आधारावर मी तेथील एका स्त्रियांच्या कॉलेजांत प्रवेश केला. तेव्हांपासून मला तेथील बोर्डिंगांतच रहावें लागलें. प्रो. भिसे मधूनमधून माझी खबर घेत असत आणि मीही सुट्टीची संधी साधून त्यांच्या घरीं जात असें. त्याखेरीज कुणाच हिंदी गृहस्थाचा आणि माझा विलायतेंत असतांना परिचय झाला नाहीं. जे कुणी हिंदी विद्यार्थी विलायतेंत अभ्यासासाठीं आले होते ते बहुतेक अगदींच तरूण होते आणि त्यांच्याशीं परिचय ठेवणें आम्हांला बोर्डिंगच्या शिस्तीप्रमाणें जवळजवळ अशक्य होतें. दुसरी कुणी एकादी हिंदी स्त्री असती तर आम्हीं दोघीही अशा विद्यार्थ्यांच्या निवासांत भेटीसाठीं गेलों असतों. पण मी एकटीच होतें. मनावरचे पुरातन संस्कार तितकेच प्रबल असल्यामुळें विद्यार्थ्यांच्या निवासस्थानांत एकटें जाणें मला प्रशस्त वाटलें नाहीं.

आमच्या कॉलेजमधील विद्यार्थिनींशीं दिवसेंदिवस माझा परिचय वाढत चालला. सुट्टीच्या दिवसांत मी त्यांतील कांहीं विद्यार्थिनींच्याबरोबर त्यांच्या घरीं जाऊं येऊं लागलें. ज्या विद्यार्थिनींच्या घरीं मी जात असें त्यांचे वडील हिंदी संस्कृतीबद्दल बरेचसे अभिमानी असत.

त्यांतील एक गृहस्थ स्वामी विवेकानंदांचे मोठे भक्त होते. विलायतेंत गेल्या वेळीं स्वामी विवेकानंदांची जी कांहीं शिष्यशाखा निर्माण झाली होती त्यांतील ते एक होते. त्यांनीं हिंदुस्थानांतील आध्यात्मिक ग्रंथांचा चांगलाच अभ्यास केला होता. त्यामुळें त्यांच्या घरीं गेल्यावर मला कोणत्याच प्रकारचा परकेपणा वाटत नसे. गीता आणि उपनिषदें यांचा अभ्यास माझ्याकडूनही झाला असल्यामुळें त्यांच्याशीं संभाषण करण्यांत मला केव्हांही आनंदच वाटत असे.

किंबहुना विलायतेंत असतांना एवढें एकच घर मला जास्त आपुलकीचें वाटत असे. या गृहस्थांचें नांव मि. वुइल्किन्स असे होतें.

त्यांच्या घरीं स्वामी विवेकानंदांच्या तसबिरीबरोबरच हिंदु देवतांच्या बऱ्याचशा तसबिरी लावलेल्या असल्यामुळें मला तिथें जातांच हिंदुस्थानांत गेल्यासारखें वाटत

असे. हिंदुस्थानचे चेहेरे किंवा त्यांतली मराठी भाषा जरी मला ऐकूं येत नव्हती तरीही आजूबाजूचें वातावरण हिंदी पद्धतीचें होतें एवढेंच मला पुरेसें झालें होतें.

त्याखेरीज मी दुसऱ्या कुणाच्या घरीं विशेषशीं जात नसें. स्मिथबाईनीं दिलेल्या पत्रांचा उपयोग मी केला होता. त्या मिशनची जी मंडळी विलायतेंत होती त्यांना-ही मी मधून मधून भेटत असें. वेळींप्रसंगीं त्यांच्याकडून मला बरीच मदत होत असे. माझें स्वतःचें असें कांहीं नसल्यामुळें केवळ धर्मार्थ देणग्यांवरच पहिल्या पहिल्यानें चरितार्थ चालविणें मला भाग आलें होतें. त्यावेळीं या मिशनच्या मंडळींनीं मला बराच हात दिला.

धर्माच्या अन्नावर जगणें मला पुढें पुढें कठीण वाटूं लागलें. स्वतःच कांहीं तरी करावें या विचारानें मी काम शोधूं लागलें. पण इंग्लंड म्हणजे अमेरिका नव्हे, असें जे कित्येक मिशनरी म्हणत असत त्याचा मला प्रत्यय आला. अमेरिकेंत हिंदु विद्यार्थ्याला कुठें ना कुठें तरी, कसली ना कसली तरी, पोट भरण्यापुरती नोकरी मिळणें सहजसाध्य असतें. विलायतेंत ही परिस्थिति बहुतेक अशक्य आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. मी गेलें होतें त्या काळांत हिंदी माणसाला तरी कोणत्याही प्रकारची नोकरी तिथें मिळणें शक्य नव्हतें.

पण वुइल्किन्स साहेबांनीं माझी एक सोय करून दिली. त्यांची अशीच एक त्यांच्यासारखीच विवेकानंदांची भक्त असलेली बाई होती. तिला संस्कृत शिकण्याची फार आवड होती. ती शिकवणी त्यांनीं मला जमवून दिली. माझी परिस्थिति वुइल्किन्स साहेबांना जशी माहित होती तशीच त्या बाईनाही असल्यामुळें धर्मार्थ मदत करण्यापेक्षां माझ्याकडून कांहीं ना कांहींतरी काम करून घेऊन माझ्या चरितार्थाला हातभार लावणें हाच उद्देश तिनें मनांत धरला होता. संस्कृत शिकण्याची तिची आवड जरी अनावर होती तरी प्रत्यक्ष शिक्षणाला सुरवात होतांच तिला ती भाषा फार कठीण जाऊं लागली. अक्षरओळखीपासून सुरवात करावी लागली होती. संस्कृतांतील सर्वच ग्रंथ कांहीं इंग्रजी लिपींत लिहिलेले सांपडत नाहींत. जर्मनींत छापलेले असे कांहीं जर्मन लिपीचे संस्कृत ग्रंथ आहेत. त्यांचा पहिल्यापहिल्यानें मी उपयोग करून घेत होतें. संस्कृत शिकण्याची आस्था असूनही त्या बाईला प्रत्यक्ष शिक्षण देणें कठीण जात होतें.

तरीही तिनें चिकाटी सोडली नाहीं. किंबहुना मला मदत करण्यासाठीं ती संस्कृत शिकायचा अट्टहास धरते आहे, असेंच बारकाईनें पाहिल्यावर मला वाटूं लागलें होतें. केवळ धर्मावर जगण्यापेक्षां–अन्न खाण्यापिण्यासाठीं कांहीं तरी नोकरी आपल्या हातून घडते आहे, अशी मनाची समजूत करून मी या शिकवणीला चिकटून राहिलें होतें.

तिथें एक विवेकानंद सोसायटी होती. या सोसायटीच्या विद्यमानें मधून मधून व्याख्यानें होत असत. त्यांत मीही भाग घेत असें. वुइल्किन्स साहेबानीं माझी परिस्थिती जाणून–ज्या ज्या वेळीं व्याख्यानें होत असत त्या त्या वेळीं–तीं तिकीट लावून ठेवण्याची व्यवस्था केली, आणि त्या उत्पन्नांतून बराचसा भाग मला देऊन त्यांनीं माझा खर्च बऱ्याच मोठ्या प्रमाणांत भागविण्याच्या यशाचा वांटा उचलला.

विलायतेंत असतांना मी सदोदीत डोळे उघडे ठेवले होते आणि जेवढें म्हणून कांहीं पाहणें शक्य होतें तेवढें पाहण्याचा अट्टाहास धरला होता. तेथील बहुतेक मोठमोठ्या लायब्ररऱ्या, म्युझियम, शिक्षण संस्था वगैरे अवलोकन करण्याचे कामीं वुइल्किन्स साहेबांची मला फार मदत झाली.

विलायतेंत जाणारे इतर विद्यार्थी आपल्या अभ्यासापलीकडे दुसऱ्या कोणत्याही गोष्टीकडे लक्ष देत नाहींत असें मला त्यावेळीं दिसून आलें ते जी चूक करतात ती आपण करायची नाहीं असा मी निर्धार केला होता. नुसती परीक्षा पास होऊन जाणें हें माझें ध्येय नव्हतें. ज्ञानार्जनाचीं जीं जीं साधनें उपलब्ध होतीं त्या त्या साधनांचा उपयोग करून घेण्यांत मी कधींही हयगय केली नाहीं.

तो सर्व इतिहास लिहिल्यास तें एक स्वतंत्र पुस्तकच होईल. माझ्या पुढल्या चारित्र्यावर त्या सर्व इतिहासाचा जरी फारच मोठ्या प्रमाणांत परिणाम झालेला असला, तरीही त्या हकिकतीची तपशीलवार माहिती या माझ्या आत्मचरित्रांत देणें आज मला प्रशस्त वाटत नाहीं. त्या इतिहासांत आत्मस्तुतीचा भाग बराचसा येईल म्हणून जरी ती हकिकत देण्याचें मी टाळीत आहें, तरीही तेवढेंच एक कारण आहे असें म्हणतां येत नाहीं. तो इतिहास इतका मोठा आहे, कीं संगतवार रीतीनें त्याची बखर करूं म्हटलें तर ग्रंथावर ग्रंथ होतील अशी मला भीती वाटते–आणि म्हणूनच माझ्या या लहानशा आत्मचरित्रांत त्याचा समावेश करण्याचें मी टाळलें आहे.

घरीं दिवस मोठ्या आनंदानें जात होते. विलायतेहून परत आल्यामुळें हिंदुस्थानांतील एका लहानशा खेड्याच्या निर्मळ हवेंत घालवलेला तो काळ मला अतिशय आनंददायी जात होता खरा; पण कर्तबगारी दाखवायला त्या लहानशा खेड्यांत फारसा वाव नसल्यामुळें माझें उत्साही मन हळू हळू अधिक तळमळूं लागलें.

आम्हीं गांवीं आल्यावर चंदूचीं पत्रें येत होतीं पण त्यांत खुशालीपलीकडे विशेष लिहिलेलें नसे. चंदूच्या 'या औदासिन्यामुळें मला जबरदस्त धक्का बसला. माझी बाब दूरच राहो पण काकांना आणि ताईलासुद्धां त्यानें दूर करायला तयार व्हावें, हें मला बरें वाटलें नाहीं. त्याच्या बायकोचा त्याच्यावर इतका जबरदस्त पगडा बसला होता कीं काय, याचा मला नीटसा अंदाज करतां येईना ! ज्यांनीं त्याला लहानाचा मोठा केला, त्याचें सर्व शिक्षण केलें, भावापेक्षां मुलगा या नात्यानेंच ज्यांनीं त्याला वाढविलें, त्यांनासुद्धां टाकून जायला त्यानें तयार व्हावें इतकें बायकोच्या खुषीनाखुषीचें महत्व त्याला काय वाटलें, याचीच कल्पना मला करितां येईना.

एके दिवशीं रात्रीं आम्ही सहज गप्पा मारीत बसलों असतां काकानींच हा विषय काढला. काकांची वृत्ति जरी अगदीं स्थितप्रज्ञतेची होती, तरीही चंदूच्या या वर्तनाचा त्यांच्या मनावर कांहीं तरी परिणाम झाला होता, असें त्यांच्या भाषणावरून मला दिसून आलें.

ते म्हणाले, "चंदूच्या वर्तनाचं हें कोडं मला कांहीं केल्या उलगडत नाहीं. लग्न झाल्यापासून तो सुखी नाहीं हें मी प्रत्यक्ष पहातों आहें. ज्या ज्या वेळीं मी मुंबईला जातों, त्या त्या वेळीं मला असं दिसून येतं, कीं शक्य तेवढा तो घराबाहेर वेळ काढीत असतो. त्याच्या बायकोला तितकाच घराबाहेर जाण्याचा तिटकारा आहे. तिनं चोवीस तास घरीं बसून रहावं आणि यानं सारा दिवस बाहेर राहून काढावा, असंच चालत असल्याचं मला दिसून येत होतं. पण त्याच्या परवांच्या वर्तनाचं मात्र मला मोठं चमत्कारिक वाटलं. तिच्या तोंडून निघालेल्या एकाच शब्दाबरोबर तो आम्हां सर्वांना—विशेषतः इतक्या वर्षांनीं विलायतेहून आलेल्या मथूलासुद्धां—तोडायला कां तयार झाला, याची मला कांहींच अटकळ होत नाहीं."

ताई म्हणाली, "पुरुषांच्या नजरेला या गोष्टी अगम्य आहेत—"

एवढेच शब्द बोलून ती स्तब्ध राहिली, तेव्हां काका म्हणाले, " मग आतां बायकांच्या नजरेनं तूं हें कोडं कसं काय सोडवलं आहेस, तें तरी आम्हांला सांग."

ताई हंसली पण तिनें कांहींच उत्तर दिलें नाहीं. क्षणभर वाट पाहून काका म्हणाले, " आतां कां बोलत नाहींस ? उगीच बायकी नजरेची प्रतिष्ठा मिरवूं नकोस. तुला हें कोडं सोडवतां आलं नाहीं."

ताई गंभीरपणानें म्हणाली, " तसंही असेल कदाचित् ! माझ्यापरीनं मी हें कोडं सोडवलं आहे खरं पण या कोड्याचं उत्तर काय आहे तें मी असं सहजासहजीं सांगणार नाहीं. मी एक कांहीं तरी अटकळ बांधली आहे, पण ती बरोबर आहे कीं चूक आहे हें पुढल्या हकीकती कशा होतात हें पाहिल्याशिवाय मी आजच सांगणार नाहीं."

काका मोठमोठ्यानें हंसत म्हणाले, " ठीक ! ठीक ! ज्योतिष्याच्या भविष्यासारखंच तुझं उत्तर दिसतं. एकादी गोष्ट घडून आली म्हणजे मग म्हणायचं, कीं मी त्याच वेळीं हें भविष्य केलं होतं, तसंच हें तुझं आहे. असल्या लपंडावानं मी फसणार नाहीं. मी साफ साफ सांगतों, कीं चंदू आतां पूर्वीचा राहिला नाहीं. बायकोच्या संगतीनं म्हणा किंवा वकिलीच्या धंद्यामुळं म्हणा, त्याच्या वृत्तीवर कांहींतरी विलक्षण परिणाम झाला आहे. पूर्वीं म्हणजे तो फार बोलका होता असं नाहींच. पण तो जें कांहीं बोलत असे त्यांत निश्चितपणा असे. लपंडाव नसे किंवा लबाडीही नसे. कोणत्याही गोष्टीचं कारण सांगण्याची त्याची प्रवृत्ती असे. तो अविचारी तर कधींच नव्हता. पण या वेळचं त्याचं वर्तन मात्र अविचाराच्या सीमेवर बसलेलं मला उघड उघड दिसतं आहे. इतका निर्भिडपणा त्याच्या ठिकाणीं आला कसा, हें तो एकटा भेटेल तर त्याला मी विचारीन. त्याची पत्रं पाहिल्यास ' आम्हीं सर्व खुशाल आहोंत तुमची खुशाली कळवा ' याच्या पलीकडे त्यांत कांहीं नसतं. स्वतंत्रपणें मथूबद्दल तो कोणतीच गोष्ट विचारीत नाहीं. तुला नमस्कार लिहितो पण मथूला किंवा लीलेला आशिर्वाद देण्याचं टाळतो— "

काका क्षणभर डोळे मिटून स्तब्ध बसले आणि समाधींतून जागा झालेल्या एकाद्या योग्याप्रमाणें पुन्हां डोळे उघडून म्हणाले, " अस्सं ! अस्सं ! आतां तुझ्या म्हणण्याचा अंदाज मला आला. हें आधीं माझ्या ध्यानांत यायला हवं होतं. एकंदरींत बायकांची बुद्धि विलक्षण असते खरी."

" मग मी देखील बायकोच आहें," लीला म्हणाली, " पण मला यांतलं कांहींसुद्धां कळलं नाहीं. "

लीलेचे ते उद्गार ऐकून ताई मोठमोठ्यानें हंसली. ताईचा उद्देश काय होता याची बरीचशी कल्पना मला आली. ती कल्पना लीलेला येणें शक्य नव्हतें.

लीला म्हणाली, " असं हंसण्यावारी नेऊं नकोस ताई ? तुम्हीं कांहीं तरी अटकळ बांधली आहे, काकांनाही ती पटली आहे, आणि काकांच्या चेहऱ्यावरून तुलादेखील बरीचशी कल्पना आली आहे, असं मला वाटतं. पण मला मात्र कांहीं उलगडा होत नाहीं. तुम्हीं बायकांची बुद्धि विलक्षण आहे असं म्हणतां–मी बायको आहें—ताईसारखीच एक बायको आहें–ताईपेक्षां जास्त शिकलेली आहें—"

" म्हणूनच तुला कांहीं कळत नाहीं ! " ताई म्हणाली, " हा शिक्षणाचा दुष्परिणाम आहे. शिक्षण मिळाल्यानं आलेली एक अहंमन्यता तुझ्या बुद्धीला आंधळी करते आहे. मी सुशिक्षित आहें, इंग्रजी शिकलेली आहें आणि इतर बायकांपेक्षां मला जास्त कळतं आहे, असं वाटत असल्यामुळं अगदीं सहज बायकांच्या नजरेला ज्या गोष्टी दिसाव्यात त्या तुला दिसत नाहींशा झाल्या आहेत. त्या दिवशींचा खटका झाल्याबरोबर चंदूनं आम्हांला जायला सांगितलं, त्याच क्षणाला जी गोष्ट अगदीं सहजासहजीं मला पटली, ती तुझ्या ध्यानीं येऊं नये याला कारण तुझं शिक्षण ! एवढं खरं, कीं ती गोष्ट सहजासहजीं तुझ्या ध्यानीं येण्याजोगी नव्हती. माझ्या ध्यानीं आली, त्याला पूर्वीचीं कांहीं कारणं आहेत. ती पूर्वीचीं कारणं तुला माहीत नाहींत. पण मला जरी तीं पूर्वीचीं कारणं माहीत नसतीं तरीदेखील –अगदीं तेव्हांच्या तेव्हांच–मी जें कांहीं समजायचं तें समजून घेतलं असतं. आम्हीं अशिक्षित बायका आहोंत कीं नाहीं–त्यामुळं दूरवर विचार करण्याची आम्हांला संवय नसते आणि कारणं असतात तीं अगदीं जवळ असतात. जवळचं पाहायची आमची प्रवृत्ति असल्यामुळं आम्हांला ती चटकन् दिसतात, आणि दूरवर पाहून विचार करायची शिक्षणामुळं तुम्हांला संवय लागली असल्याकारणानं हीं जवळचीं कारणं सहजच तुमच्या दृष्टीच्या टापूबाहेर जातात. "

लीला अगदीं गंभीर होऊन म्हणाली, " मला यांतलं एक अक्षरसुद्धां कळलं नाहीं. तूं इतकी अगदीं उखाण्याच्या भाषेंत बोलते आहेस, कीं त्यांत सरळपणापेक्षां सुरडच जास्त दिसते. माझ्या प्रश्नाचं उत्तर देण्यापेक्षां नुसती टाळाटाळी

करण्यासाठीं तूं हें लांबलचक चऱ्हाट वळलंस, असंच मला वाटतं. जें कांहीं आहे तें मला सांगायचं नाहीं—असं स्पष्ट शब्दानं सांगण्यापेक्षां हा असा जो द्राविडी प्राणायाम केलास तो कांहीं मला आवडला नाहीं ! " असें म्हणून ती उगीच बसली.

तिला राग आला हें ताईच्या ध्यानीं आलें. पण तिचा राग घालविणें ताईला जसें शक्य नव्हतें तसें मलाही अशक्य होतें.

ताईचा अंदाज खरा होता. ज्या कारणानें चंदूनें त्या दिवशीं आम्हाला घालवून दिलें, तें कारण इतक्या उघड रीतीनें लीलेला सांगण्यासारखें नव्हतें हें मलाही कळत होतें. ताईचा अंदाज अगदीं तंतोतत बरोबर होता पण ताई सांगेपर्यंत मला त्याची अटकळ बांधतां आली नाहीं याचीच मला लाज वाटली. सुशिक्षित आणि अशिक्षित स्त्रियांच्या विचारसरणींतला भेद जो ताईनीं सांगितला, त्यांत कांहीं तरी तथ्य होतें असें माझ्याच वृत्तीवरून मला पटलें.

त्या दिवशीं तो विषय तेवढाच राहिला. दुसऱ्या दिवशीं पुण्याहून नानासाहेबांचें पत्र आलें. तें पत्र वाचून मात्र आम्हीं सर्व अगदीं आश्चर्यचकीत झालों !

# प्रकरण पांचवें ::::::::::::::::::::::::::::::::::: पुणेरी जोडे

नानासाहेबांसारख्या सोवळ्या माणसाकडून मला घरीं येण्यासाठीं आमंत्रण यावें यार्चे इतर सर्वांपेक्षां मलाच जास्त आश्चर्य वाटलें. कदाचित् वर्तमानपत्रांनीं जी माझी स्तुती केली होती तिचा त्यांच्या मनावर परिणाम झाला असावा. केसरींत देखील माझ्या स्तुतिपर चारदोन ओळी आल्या होत्या. नानासाहेबांना तेवढासा आधारदेखील पुरेसा होता.

मला पाठविण्याच्या बाबतींत काकांचें मन मागेंपुढें होत होतें. त्यांचा नानासाहेबांवर यत्किंचित्‌ही विश्वास नव्हता. मला पुण्याला बोलावून नेण्यांत त्यांचा कांहींतरी डाव आहे, असा काकांना जबर संशय होता.

पण ताईनीं त्यांच्या या संशयाची गोड शब्दांत टवाळी केली. ताई म्हणाली, “ केव्हां ना केव्हां झालं तरी तुमचा आपला नानासाहेबांवर दांतच आहे. त्यांची मतं जुनीं आहेत हें खरं आहे. माणुसकीच्या बाबतींत देखील त्यांचा पाय माघारीच आहे, हेंही मला कबूल आहे. पण जिकडेतिकडे वर्तमानपत्रांतून मथूचीं स्तुति-

स्तोत्रं गायिलीं जात असतां तिला घरीं नेऊन मिरवण्याची संधी त्यांनीं कां साधूं नये? त्यांचा स्वार्थसाधूपणा असला तरी तो या दृष्टीनं असेल."

काका म्हणाले, " तूं वाटेल तें म्हण पण माझा नानासाहेबांवर विश्वास नाहीं. या लोकांच्या बाबतींत मी दुराग्रही आहें असं जरी तूं म्हटलंस तरी त्याचं मला वाईट वाटणार नाहीं. हीं माणसंच अशीं आहेत, कीं कोणत्याही प्रसंगीं त्यांचा स्वभाव कधीं बदलायचा नाहीं. माणुसकीचा लवलेशसुद्धां ईश्वरानं त्यांच्या वांट्याला दिलेला नाहीं. सलोख्याच्या अपेक्षेनं मधू तिकडे जात असेल तर माझं कांहीं म्हणणं नाहीं. तिकडे पुढं जर कांहीं चमत्कारिक प्रसंग आला तर आधीं मी हें भविष्य वर्तवलं आहे हें मात्र विसरूं नकोस म्हणजे झालं."

काकांनीं बरोबर यावें असें माझ्या मनांत फार होतें. पण त्यांनीं साफ नकार दिला. 'त्या माणसाचं मला तोंडसुद्धां पहायचं नाहीं,' असें ते अगदीं निक्षून म्हणाले. त्यांचें म्हणणें असें पडलें, कीं विलायतेसारख्या परमुलखांतून पांच वर्षांची सफर मारून आल्यावर मला पुण्यापर्यंत सोबत करण्यासाठीं जर ते आले, तर त्यांत माझाच कमीपणा होईल.

नानासाहेबांच्या आमंत्रणामुळें मी एकप्रकारें हुरळून गेलें होतें. माझा हा जय आहे, असें मला वाटत होतें. लीलेलाही आनंद झाला होता.

दुसऱ्या दिवशीं आम्ही निघालों. मुंबईला आल्यावर चंदूच्या घरीं न जातां आम्हीं परभारें स्टेशन गांठलें.

आगगाडींतून जात असतांना खंडाळ्यांतील रमणीय देखावा पाहून माझें हृदय आनंदानें भरून आलें. तींच पूर्वीचीं दृश्यें खरीं पण पांच वर्षांच्या वियोगामुळें तीं मला पूर्वींपेक्षां कितीतरी पटीनें सुंदर वाटूं लागलीं. खिडकीबाहेर तोंड काढून मी अधाशासारखी त्या नैसर्गिक सौंदर्याकडे डोळे भरून पहात होतें.

क्षणभर मला साऱ्या जगाची विस्मृति झाली होती. माझ्यावर झालेला हा परिणाम पाहून लीला माझी थट्टा करूं लागली तेव्हां मी तिला म्हटलें, " पांच वर्षांत मला केवढा उपास पडला आहे याची तुला कल्पना यायची नाहीं. नैसर्गिक सौंदर्याचा विलायतेंत अगदी पूर्णपणें अभाव आहे. तिथं सौंदर्य आहे खरं; पण सारे कृत्रिम बागबगीचे आहेत. तिथं पार्क्स आहेत, पण तेही बनावट. विलायतेला खेड्यांतूनही मी फिरलें आहे, पण आमच्या खेड्यांची रमणीयता विलायतेंतील खेड्यांत नाहीं.

आधीं सूर्यदर्शनाचा अभाव. त्यामुळें हवा कशी कुंद वाटते. झाडाच्या पानावर पडणारे सूर्याचे किरण या हिरवळीला जी खुलावट देतात, तें दृश्य विलायतेंत तर अगदींच दुर्लभ ! तिकडल्या झाडांच्या पानाचा रंगदेखील करपटलेला असतो. गर्द हिरवा रंग हिंदुस्थानाखेरीज–विशेषतः या आमच्या सह्याद्री पर्वताखेरीज–दुसऱ्या कुठं केव्हांच दिसून येत नाहीं. ही असली गर्द हिरवळ पाहण्यासाठीं माझा जीव कसा आशेला आला होता, याची तुला कल्पना येणार नाहीं. ''

जसजसें पुणें जवळ येऊं लागलें तसतसें माझें हृदय आनंदानें उचंबळूं लागलें. नुसता अभिमान बाळगण्याची माझी वृत्ति नव्हती खरी पण यावेळीं अभिमानाची एक लहानशी झुळूक माझ्या अंतःकरणांत जागी झाली. एकादी स्त्री विलायतेंत जाऊन तिथल्या विश्वविद्यालयाच्या मोठमोठ्या डिग्र्या मिळवून आली, याचें महाराष्ट्रीयांनीं जें कौतुक केलें, त्याचा नानासाहेबांसारख्या दुराग्रही माणसाच्या मनावरही परिणाम झाला, याबद्दल मला एक प्रकारचा अभिमान वाटत होता. आपण घरीं जातांच आपलें मोठें स्वागत होणार–तें कशा प्रकारचें होणार, याच्या निरनिराळ्या कल्पना मी आपल्या मनाशीं उभारीत होतें.

येतांना मी फारसें सामान बरोबर आणलें नव्हतें. तिथें फार दिवस राहायचा माझा विचार नव्हता.

स्टेशनवर उतरतांच एक टांगा करून आम्हीं दोघेंही निघालों. दाराशीं आलों. टांग्याखालीं उतरून सामानही खालीं उतरून घेतलें. पैसे देऊन टांगेवाल्याला चुकता केला—

तरीही घरांतलीं कुणी माणसें बाहेर आलीं नाहींत. आम्हीं उतरून ओट्यावर येतांच नानासाहेब एकटेच सामोरे आले आणि मोठ्यानें ओरडले, “ लीला, घरांत जा.'' आणि माझ्याकडे वळून म्हणाले, “ आणि अहो मडमबाई, या घरांत आपलं कांहीं काम नाहीं. आपण जिकडे वाट फुटेल तिकडे निघून जावं. माझी कांहीं हरकत नाहीं. ''

मी आश्चर्यानें स्तंभित झालें. एवढ्या आग्रहानें मला आमंत्रण दिलें काय आणि आतां अशी माझी संभावना होते काय !

मी पुन्हा म्हटलें, “ आपल्याच आमंत्रणावरूना मी इथं आलें ना ? ''

" खरं आहे ! " नानासाहेब म्हणाले, " मी आमंत्रण दिलं खरं. पण कां दिलं याचा अंदाज तुला करतां आला नाहीं. विलायतेला जाऊन इतक्या डिग्र्या मिळवूनही अजून तुला अक्कल कशी आली नाहीं, याचंच मला आश्चर्य वाटतं ! माझी वृत्ति तुला चांगली माहीत आहे. आम्ही बळवंतरावांच्या तालमींतलीं माणसं. भ्रष्टाचार आम्हांला कसे परवडतील ? तूं विलायतेला जाऊन आलीस, तिथं काय वाटेल तें माती-मसण खाल्लं असशील—त्या तुला मी माझ्या घरांत पाऊल टाकूं देईन का ? खाण्यावरच भागलं असेल कीं काय देव जाणे. एकटी बायको माणूस विलायतेला गेली, साहेब लोकांत वावरली, हवं तिथं हवी तशी राहिली, तर तिनं काय केलं असेल आणि काय केलं नसेल, हें ब्रह्मदेवाच्या बापालाही सांगतां यायचं नाहीं. एकट्यानं जग पालथं घालणाऱ्या बायकांवर माझा काडीभरही विश्वास नाहीं. विलायतेला जाऊन आमच्या घराण्याचं नांव बट्टु केलंस आणि वर दिमाखानं घरांत शिरायला लाज नाहीं वाटत ? मी आमंत्रण पाठवलं म्हणून काय झालं ? हें तुला कळायला हवं होतं ! निदान प्रायःश्चित तरी घ्यायला हवं होतं. इकडलीं माणसं कुणी विलायतेला गेलींच नाहींत का ? पण जो जो गेला त्यानं त्यानं आल्याबरोबर पहिल्यानं प्रायश्चित घेतलं आहे. तूं प्रायःश्चित तर घेतलं नाहींसच पण उलट वर्तमानपत्रांत लिहून 'प्रायश्चित्तावर माझा विश्वास नाहीं' म्हणून डांगोरा पिटलास. कुणी तुला विचारलं होतं, कीं प्रायःश्चित घेतलंस कीं घेतलं नाहीं म्हणून ? मुकाट्यानं राहिली असतीस तर मी गयसुद्धां केली असती. पण सूळ खांद्यावर घेऊन प्रायश्चिताच्या विधीचा जो लेखी उपमर्द केलास तो वाचून माझ्या अंगाचा भडका उडाला. "

नानासाहेब काय म्हणत होते तेंच मला कळलं नाहीं. कुठल्या वर्तमानपत्रांत मी कांहींच लिहिलें नव्हतें. एका वर्तमानपत्रकारानें माझ्या बाबतींत प्रायः-श्चिःताचा उल्लेख केल्याचें मी वाचलें होतें खरें. पण त्याच्याशीं माझा प्रत्यक्ष संबंध मुळींच नव्हता. त्याप्रमाणें मी नानासाहेबांना सांगितलें त्यावेळीं ते म्हणाले, " तसं असेल तर तूं त्याचा इन्कार करायला पाहिजे होतास. तूं प्रायःश्चित्त घेतलं नाहींस म्हणून वर्तमानपत्रांनीं तुझी तारीफ केली. त्यानंच तूं हुरळून गेलीस. तुला प्रायःश्चित्त घ्यायचं नव्हतं हें मला माहीत आहे. आतांही तूं प्रायःश्चित्त घेणार नाहींस हेंहीं मी जाणतों. पण वर्तमानपत्रांत नुसतं तसं लिहलं नसतं तर तुझ्या बापाचं कांहीं खर्चलं असतं ? तेवढं तरी बाहेरच्या लोकांचं समाधान झालं असतं.

पण तूं इन्कार न केल्यामुळं आम्हांला तोंड दाखवायला जागा राहिली नाहीं. तूं आमच्या घरीं राहिलीस–प्रायःश्चित्त न घेतांना राहिलीस–असं कळलं तर उद्यां लोक मला वाळींत टाकतील. मला चार पोरंबाळं आहेत, त्यांचीं लग्नकार्यं व्हायचीं आहेत. मी कांहीं नेसायचं सोडून डोक्याला गुंडाळलं नाहीं कीं एकादा उपटसुंभ नाहीं. मी एक संसारी माणूस आहें. केसरी ऑफिससारख्या महाराष्ट्रांतल्या एका मोठ्या संस्थेचा मी एक घटक आहें. त्या नात्यानं माझ्यावर मोठी जबाबदारी आहे. मी कसा वागतों याच्याकडे लोकांची नजर आहे हें विसरून मला चालायचं नाहीं. कृपा कर आणि जशी आलीस तशीच परत निघून जा."

संतापानें माझ्या अंगाचा भडका झाला होता. पण तो सर्व राग गिळून मी अगदीं संथपणानें म्हटलें, "असं जर होतं तर मला बोलावलंत कां ? प्रायःश्चित्त घेऊन ये, असं तरी लिहायचं होतं–म्हणजे मी यायचं कीं न यायचं याचा विचार केला असता."

नानासाहेब तोंड वासून मोठमोठ्यानें हंसले आणि म्हणाले, "मी कां बोलावलं म्हणतेस ? ऐक. माझ्या मुलीसाठीं मी तुला बोलावलं. तुला बोलावलं नसतं तर माझी मुलगी नुसती माझ्या बोलावण्यानं आली नसती, याची मला खात्री आहे. कुठली झक मारली आणि तिला शाळेंत घालायची मला बुद्धि झाली. पण शाळेंत गेल्यापासून ती अत्यंत फाजील झाली आहे. कुणाचंच कांहीं ऐकत नाहीं. मी तिला नुसतं बोलावलं असतं तर तिनं रजा संपेपर्यंत येत नाहीं म्हणून मला साफ उत्तर दिलं असतं. तूं विलायतेहून आलेली कीं नाहीं–आणि ही कारटी इंग्रजी शिकलेली. या इंग्रजी शिकलेल्यांना विलायतेहून आलेलीं माणसं म्हणजे परब्रह्म वाटत असतात. आम्हांला तसं वाटत नाहीं. आमचे एवढे मोठे बळवंतराव आहेत पण ते कुठं गोखल्यांसारखे विलायतेला गेले नाहींत. या पुण्यांत असूनही साऱ्या जगभर त्यांची बोलबाला झाली आहे. त्यांचं उदाहरण आमच्यासमोर आहे. पण या इंग्रजी शाळेंत जाणाऱ्या कार्ट्यांना गोखलेच मोठे वाटतात. कां ? तर म्हणे विलायतेला गेलेले म्हणून. त्यांत असल्या शाळेंतून शिकलेली पोरटी–म्हणूनच मला भय वाटूं लागलं, कीं तुझी मगरमिठी मिळाली म्हणजे माझी मुलगी मला कायमची अंतरेल ! याची कल्पना होती—अगदीं पुरेपूर खात्री होती, म्हणूनच मी हा डाव टाकला–आणि तो साधला. माझ्या गळाला लागून तूं आपसूक अचूक आलीस. माझी मुलगीही घरीं आली. माझं काम झालं. आतां मडमसाहेब, सलाम ! मुकाट्यानं घरा बाहेर व्हा."

काकांचें भविष्य माझ्यासमोर उभें राहिलें. एकूण मी आशाळभूत म्हणून काकांनीं म्हटलें, तें कांहीं खोटें नाहीं.

लीला दारांत उभी राहून ऐकत होती. मी जायला निघत आहें असें पाहून ती पुढें आली आणि म्हणाली, " काकू, कुठं चाललीस ? "

" वाट फुटेल तिकडे. " मी उत्तर दिलें, " कदाचित् पुन्हां गांवीं जाईन किंवा मुंबईला कुणाकुणाला भेटायचं राहिलं आहे त्यांच्या भेटी घेऊन मग गांवीं जाईन."

" पण मुंबईची गाडी निघेपर्यंत इथं कुठं राहणार आहेस ? " लीलेनें विचारलें.

मी उत्तर दिलें, "स्टेशनवर बसायला तर प्रायःश्चित आड येत नाहीं ! "

असें म्हणून मी सामान हातीं घेऊन घराबाहेर पडलें. पायांत जोडे घालून लीलाही माझ्या मागोमाग बाहेर आली. मी तिला आंत जायला सांगणार होतें, इतक्यांत नानासाहेब तिथें आले आणि लीलेच्या बखोटीला धरून त्यांनीं तिला खेंचून धरलें.

लीला वाघिणीसारखी चवताळली होती. ती म्हणाली, " खबरदार मला हात लावाल तर. मी आतां लहान नाहीं. अशी फसवाफसवी करून मला आणलीत आणि अगदीं उघड उघड मला तसं ऐकवलंत, तेवढं पुरं झालं. तुमचा डाव तिकडे तुमच्या ऑफिसांत चालवीत बसा. माझ्याकडे तें चालायचं नाहीं. मी काकू-बरोबर जाणार आणि रजा संपल्याशिवाय घरीं येणार नाहीं. " असें म्हणून एक हिसडा मारून तिनें आपला हात सोडवून घेतला.

त्या हिसड्यासरशीं नानासाहेब कदाचित् कोलमडून पडले असते. पण दाराला सांवरून ते म्हणाले, " मी तुझा बाप आहें. तुझ्यावर माझी पूर्ण सत्ता आहे. मी सांगेन तसंच तूं वागलं पाहिजेस, असा कायदा आहे. आमच्या हक्कांची मला पूर्ण जाणीव आहे. तो माझा हक्क मी एकसहा गाजवल्याशिवाय मुळींच राहणार नाहीं. जास्त गमजा करशील तर पोलिसांत वर्दी देऊन तुला स्टेशनवरून पकडून आणीन. "

" आणि हें म्हणे केसरी संस्थेचे घटक ! " लीला किंचकटपणानें हंसत हंसत म्हणाली.

पूर्वीच्या अशाच एका प्रसंगाची मला आठवण झाली. नानासाहेबांनीं त्यावेळीं माझी ट्रंक घराबाहेर फेंकून दिली होती. त्यावेळीं माझी स्थिती अगदीं असहाय होती. त्यावेळीं मी विलायतेसारखा मोठा प्रवास केला नव्हता. इतकेंच नव्हे तर

लहानशा प्रवासालादेखील कधीं एकटी गेलें नव्हतें. तशा स्थितींतही मी एकटी स्टेशनवर गेलें आणि त्यावेळीं—

पुन्हां ती आठवण होऊन माझें हृदय भरून आलें. आज मी सरळ स्टेशनवर गेलें असतां लीलेलाही बरोबर ये असें म्हटलें असतें. पण आज जबाबदारीची नवी जाणीव माझ्याठायीं जागी झाली होती. बापाची मुलगी त्याच्या घरांतून काढून आपल्याबरोबर नेण्याचा मला यत्किंचितही अधिकार नव्हता. पोलिसांत वर्दी दिल्यास ते तिला स्टेशनवरून देखील घेऊन गेले असते, हें मला माहीत होतें. म्हणून मी म्हटलें, " लीले, घरांत जा कशी. काकांचं सांगणं मी ऐकलं नाहीं म्हणून अशा पस्ताव्यांत पडलें. तसंच तूंही माझं सांगणं न ऐकलंस तर पस्तावशील. कायद्याच्या दृष्टीनं तूं अजून अज्ञान आहेस. तुझ्या बापाची तुझ्यावर पूर्ण सत्ता आहे, हें तुला माहीत नसलं तरी मला माहीत आहे. माझं ऐक आणि मुकाट्यानं घरांत जा. योग्यवेळीं पुन्हा आपली भेट होईल. यापुढं मात्र तशी तूं सज्ञान होईपर्यंत तुझी माझी भेट होणं अशक्य झालं आहे. "

समोरून टांगा जात होता त्याला हांक मारून मी उभा केला.

लीला हट्टाला पेटली होती. ती माझ्याशीं हुज्जत घालीत होती पण मी तिला बोलूं दिलें नाहीं. मुकाट्यानें टांग्यांत चढलें आणि टांगा चालू झाला.

ती माझ्या टांग्यामागून धावत असतां नानासाहेबानीं तिचा हात धरून तिला खेचून ओढल्याचें मला टांग्यांतून जात असतां दिसून आलें.

आजूबाजूचे लोक हीः हीः करून हंसत होते. लाज सोडून ती " काकू ! काकू ! " अशी मोठमोठ्यानें हांका मारीत होती.

मी स्टेशनवर येऊन पोंचलें आणि सेकंड क्लासच्या वेटिंगरूममधें जाऊन बसलें. लीलेची ती शेवटची मुद्रा आठवून माझ्या अन्तःकरणांत कालवाकालव सुरू झाली होती. नानासाहेबांच्या पूर्वींच्या वर्तनापेक्षां देखील या खेपेचें त्यांचें वर्तन जास्त राक्षसी स्वरूपाचें झालें होतें.

या स्वभावाला म्हणावें तरी काय ? पुण्यापर्यंत येण्याचा खर्च मला निष्कारण करायला लावला ! तसें पत्र लिहिलें असतें तर झांकली मूठ सव्वा लाखाची राहिली असती. पण या शोभेमुळें ती उघडली. शेजाऱ्यापाजाऱ्यानीं सर्व प्रकार पाहिला होता, ते चर्चा केल्याशिवाय राहिले नसते. लीलेला आतां सारींजणें टोंचटोंचून

खातील आणि तीं केवळ माझ्यामुळें—हें मनांत येतांच माझ्या डोळ्यांना टच्कन् पाणी आलें.

कुठें जावें हें मला कांहींच निश्चित ठरवितां येईना. एकदां वाटे मुंबईला चंदूच्या घरीं जावें. पण तिथेंही याच प्रकारची जर पुनरावृत्ति झाली तर—

तो विचार सोडून दिला. स्मिथबाईकडे जावें असें एकदां मनांत आलें. पण तिथें जायचें म्हणजे मिशन हाऊसमध्यें राह्यचें. तशी मिशन हाऊसमधें राहिलें असतें तर त्याचाही निष्कारण गाजावाजा झाला असता.

पूर्वी मी कांहीं केलें तरी त्याला महत्व नव्हतें. पण आज विलायतेला जाऊन आल्यामुळें माझ्यावर एक प्रकारची जबाबदारी आली होती. त्या जबाबदारीला अनुसरून वर्तनांत निर्मळपणा ठेवणें मला अवश्य होतें.

सर्व दृष्टीनें विचार करतां सरळ कोकणांत जावें हें बरें, असें मला वाटूं लागलें आणि तसा निश्चय करून मी मुंबईचें टिकीट काढलें.

मुंबईची गाडी येण्याला कित्येक तास अवधी होता. तोपर्यंत वेळ कसा घालवावा याची मला पंचाईत पडली. स्टॉलवर जाऊन एक दोन वर्तमानपत्रें घेऊन मी वेटिंगरूममधें वाचित बसलें.

मी वर्तमानपत्रें वाचित होतें खरी पण काय वाचीत होतें हें माझें मलाच कळत नव्हतें. माझ्या डोक्यांत विचाराचें चक्र सारखें सुरू होतें. सर्व गोष्टींचें सिंहावलोकन जरी होत होतें तरी एक गोष्ट प्रामुख्यानें पुनः पुनः माझ्या आठवणींत येत होती, ती याच पुण्याच्या स्टेशनवरची—याच परिस्थितींत मला मुंबईला जायची आलेली पाळी !

पुन्हां इतिहासाची तर पुनरावृत्ति होणार नाहीं ना ? असें माझ्या मनांत आलें—नव्हे तशी पुनरावृत्ति व्हावी असेंही मला वाटूं लागलें. तशीच पुनरावृत्ति झाली आणि चंदू मला एकटाच भेटला तर मुंबईला झालेल्या प्रकाराबद्दल त्याच्याशीं मोकळ्या मनानें चर्चा करितां येईल असें मला वाटत होतें. वाचनाकडे माझें लक्ष मुळींच लागत नव्हतें. पुनः पुनः तेंच तेंच वाचावें आणि वाचलेलें लक्षांत आलें नाहीं म्हणून पुन्हां वाचलेला भाग सोडून देऊन पुन्हा दुसरीं पानें वळवावींत, असेंच चाललें होतें. मी ज्या वेटिंगरूममध्यें बसलें होतें ती बायकांची वेटिंगरूम असल्यामुळें पुरुष तिथें येणें शक्य नव्हतें—हें पहिल्यानें माझ्या ध्यानांत आलें नाहीं...

# प्रकरण सहावें ................. इतिहासाची पुनरावृत्ति

दृष्टादृष्ट झाली तरी क्षणभर एकमेकांच्या तोंडून शब्द निघेना. चंदूलाही माझ्या-सारखेंच वाटलें असावें.

तो म्हणाला, “ तूं इकडे कुणीकडे ? कोंकणांतून इकडे केव्हां आलीस ? ”

मी उत्तर दिलें, “ आजच आलें आणि आजच परत निघालें आहें. ”

बोलतांना माझ्या आवाजावर मनावर झालेल्या परिणामाची छाया पडली होती, ती चंदूच्या लक्षांत आली. तो म्हणाला, “ आजच निघालीस ? आज आली असून आजच निघालीस, इतक्या तातडीचं काय काम होतं ? ”

गाडी येण्याची बहुतेक वेळ झाली होती म्हणून मी म्हटलें, “ तो इतिहास फार मोठा आहे. आतां गाडींतच बोलूं. ”

चंदूनें विचारलें, “ आतां कुणीकडे जाणार ?”

मी कोकणांत जाणार आहें, असें सांगितलें त्यावेळीं तो बराच वेळ स्तब्ध राहिला. त्याच्या चेहऱ्यावर विषादाची छाया स्पष्ट दिसत होती. कांहीं तरी विचारावें म्हणून

तो म्हणाला, " गाडी आतां रात्रींच्या वेळीं मुंबईला जाणार. सरळ धक्क्यावरच जाणार आहेस का ? "

मी म्हटलें, " अर्थांतच ! दुसऱ्या कुठं जाणार ? मुंबईत कुठं जायला मला आतां आधार आहे कुठं ? "

तो पुन्हां स्तब्ध झाला. त्याच्या मनांत चाललेली खळबळ त्याच्या चेहऱ्यावर दिसत होती. इतक्यांत गाडी आली.

आम्हीं ज्या डब्यांत बसलों त्यांत दुसरें कुणीच नव्हतें. एवढ्या मोठ्या डब्यांत आम्हीं दोघेंच एकटीं असल्याचें मला थोडेंसें चमत्कारिक वाटलें ! चंदूही थोडासा अस्थिर झाला होता.

गाडी चालू होतांच तो म्हणाला, "आतां सांग तुझा इतिहास."

कोकणांत नानासाहेबांचें पत्र आल्यापासून पुन्हां स्टेशनवर येईपर्यंतची सर्व हकीकत मी तपशीलवार सांगितली. ती सांगत असतां माझी नजर सारखी त्याच्या चेहऱ्याकडे लागली होती. हकिकत सांगत असतांना नानासाहेबांच्या वर्तनावर मी मधून मधून शेरेही मारीत होतें. ते शेरे ऐकून त्याच्या मनावर झालेला परिणाम त्याच्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसत होता.

माझी हकिकत पुरी झाल्यावर तो म्हणाला, " असं झालं एकूण ? खरं पाहिलंस तर मधू, यावेळीं नानासाहेबांना चांगल्या शिव्या हांसडाव्या असं माझ्या मनांत येतं आहे. पण कुठल्या तोंडानं त्यांना मी दोष देऊं ? मी काय केलं ? नानासाहेबांप्रमाणं दाराच्या उंबरठ्यांतच तुझा पाणउतारा जरी केला नाहीं, तरी विलायतेहून आल्याच्या पहिल्याच दिवशीं तुला घरांतून घालवून देण्याचं श्रेय मी संपादन केलं आहे. कुठल्या तोंडानं मी नानासाहेबांना शिव्या देऊं ? नानासाहेबांना शिव्या द्याव्या असं माझ्या मनांत येतं, इतकी तरी माणुसकी माझ्यांत राहिली आहे हें पाहून तुला आश्चर्य वाटलं असेल. बरं झालं, आयतीच ही संधी मिळाली. हा योग येईल याची मी वाट पहात होतों. तो इतक्या लौकर येईल असं मला वाटलं नव्हतं. माझं भाग्य म्हणून तूं मला आज भेटलीस. आतां मन मोकळं करून सारं कांहीं सांगून टाकावं असं मला वाटूं लागलं आहे. ऐकायची तुझी तयारी आहे का ? "

चटकन् माझ्यानें होय म्हणवेना. कोंकणांत काकांनीं जी चर्चा केली होती त्याची आठवण झाल्यामुळें चंदू काय सांगणार आहे याचा अंदाज मला आला होता. फक्त ती हकिकत त्याच्या तोंडानें काय ती ऐकायची होती.

मी म्हटलें, " त्या बाबतींत काकांची आणि माझी बरीच चर्चा झाली आहे. काका जरी अगदीं उघड उघड बोलले नाहींत तरी त्यांच्या म्हणण्यांतला ग्राह्यांश माझ्या ध्यानांत आला आहे. तूं असं कां वागलास याची कल्पना तोंपर्यंत मला आली नव्हती. तुझ्या त्या निर्दयपणामुळं मी मोठी बुचकळ्यांत पडलें होतें. तुझ्या स्वभावांत पांच वर्षांच्या एवढ्या अवधींत एकदम पालट कसा झाला याचा मला अचंबा वाटत होता. काकांचा अंदाज कदाचित् चुकीचा असेल किंवा बरोबरही असेल—पण ती हकीकत तुझ्या तोंडानं ऐकावी असं मला वाटलं तर त्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. मन मोकळं करून सांगण्यामुळं तुला दुःख होणार नसेल, तर जें कांहीं सांगायचं तें एकदां सांगून टाक पाहूं. "

त्याच्या डोळ्यांतून पाणी आलेलें दिसलें. खिशांतून रुमाल काढून त्यानें डोळे पुसले. तो म्हणाला, " योगायोगानंच ही संधी प्राप्त झाली आहे. या गाडींतला एवढा सगळा डबा आमच्यासाठींच जसा कांहीं राखून ठेवला आहे. हा योगायोग आहे. या योगायोगाचा फायदा मी घेतला नाहीं तर माझ्यावर लबाडीचा आरोप येईल असं वाटूं लागतं. ऐक ! या वेळीं मी तुझ्यापुढं हृदय अगदीं उघडं करणार आहें. माझें लग्न कोणत्या परिस्थितींत झालं याची हकिकत काकांनीं तुला सांगितलीच असेल. लग्नाच्या बाबतींत माझं मन अगदीं उदासीन झालं होतं. लग्न करायचं म्हणूनच करायचं, याच्यापलीकडे मनांत दुसरी कोणतीच भावना नव्हती. कुठल्याही मुलीशीं लग्न झालं तरी मला तें सारखंच होतं. म्हणून काकांनीं जी मुलगी पसंत केली, ती मी बिनदिक्कत पत्करली. मी पहायला गेलों होतों खरा पण डोळे वर करूनसुद्धां तिच्याकडे पाहिलं नव्हतं—मग परिक्षा घेण्याचं तर दूरच राहिलं. तिच्या बाहेरच्या माणसांच्या तें ध्यानीं आलं नसावं. उपवर झालेल्या मुलींचे बाप आशाळभूत असतात. त्यांची नजर दूरवर पोंचत नाहीं. तितक्याच आशाळभूतपणानं त्यांनीं माझ्याकडे पाहिलं होतं. मी मुलीकडे धड न पाहतांसुद्धां तिला पत्करली हें त्यानीं ध्यानींही घेतलं नाहीं. इथंच मोठी चूक झाली. लग्नाचा विधी होत असतांनासुद्धां मी तिच्याकडे पाहिलं नाहीं. ज्यावेळीं पाहण्याचा योग आला, त्यावेळीं तिच्याकडे

पाहतांच माझ्या अंगावर शहारे आले. माझी वृत्ति एकप्रकारें बांधून गेलेली होती. अन्तःकरणाचा निश्चय झाला होता, पण तो निश्चय अनाठायीं होता. ती माझी वेडी आशा पुरी होण्याचा कोणताच संभव नाहीं अशी माझी खात्री होती. म्हणूनच मी हा अविचार केला. लग्न केल्याशिवाय आपल्याला प्रपंच चालवतां येणार नाहीं, एवढ्यासाठींच मी लग्न केलं—"

असें म्हणून तो क्षणभर थांबला. बोलत असतां त्याचा आवाज सारखा कांपत होता. त्याच्या तोंडची ती काकुळतीची भाषा ऐकतांच माझ्या अंतःकरणाला घरे पडत होते.

तो पुढें बोलूं लागला, "आम्हां उभयतांचा परिचय झाला. तो परिचयाचा नुसता फार्स होता. त्या परिचयानं मला यत्किंचितही समाधान झालं नाहीं. उलट मनाचा उद्वेग वाढला मात्र. जसजसा सहवास वाढूं लागला तसतसा तिच्याबद्दलचा तिटकाराही वाढूं लागला. तिलाही माझ्याबद्दलचा ओढा मुळींच नाहीं असं मला दिसून येत होतं. प्रपंचाचे खोटे ढंग आम्ही चालवीत होतों. आम्ही एके जागीं रहात असून एकमेकांना परकी होतों. अजूनही तसेच आहोंत. ती केव्हांही माझ्याशीं खुल्या दिलानं बोलत नाहीं आणि मलाही तिच्याशीं खुल्या दिलानं बोलावं असं वाटत नाहीं. तरीही आम्हीं एके जागीं रहात आहोंत याचं मला आश्चर्य वाटतं. तिचा स्वभाव अगदीं तुसडा आहे. जुन्या काळच्या सनातनी घराण्यांत ती वाढली आहे. काकांच्या आगरकरी वळणांत मी लहानाचा मोठा झालों आहें. अशा प्रकारें आम्हीं दोघें दोन टोंकावर उभी आहोंत. आमचा संसार कोणत्या प्रकारें जमला असेल याची यावरून तुला कल्पना करितां येईल. पुष्कळ वेळां मनांत येतं, कीं ही खोटी बेडी तोडून टाकावी—पण हिंदुंच्या संसारांत तें शक्य नाहीं. पहिल्यानं अविचार माझ्या हातून घडला आहे—तिचा कांहीं अपराध नाहीं—असं असतां मी तिला संकटांत कां घालूं? आज माहेरीं निघून जा, असं तिला मी म्हटलं तर माझी खात्री आहे कीं तिला आनंदच वाटेल; पण तसं मी केलं तर तो अन्याय होईल अशी माझी मनोदेवता मला पदोपदीं बजावीत असते. मीहून ही लग्नाची बेडी पत्करली. त्या बेडीचा खळखळाट ऐकत मला मुकाट्यानं स्वस्थ बसलं पाहिजे. उद्यां कदाचित् आमचा प्रपंच वाढेल खरा. दोन मुलं खेळूं लागतील पण आम्हा दोघांत एक मत असं कधींच होणार नाहीं. त्या दिवशीं तुला मी रहा असं म्हटलं असतं तर ती खरोखरच माहेरीं निघून गेली असती, अशी माझी खात्री

आहे. म्हणूनच अन्तःकरणाला वेदना होत असतांही मी तुला जाऊं दिलं. माझ्या त्या वागण्यामुळं ताईला धक्का बसला, काकांना दुःख झालं, लीलेचा माझ्याविषयींचा अनादर झाला. तरीही मी तसाच वागलों. याला कारण एकच–उगीच तिचं मन दुखवायचं नाहीं. तुझा गैरसमज झाला तर केव्हांना केव्हां तर दूर करतां येईल. तिचा गैरसमज झाला तर ती जन्माची ताटातूट होईल अशी माझी खात्री होती. म्हणूनच मी तुला कोंकणांत जाऊं दिलं. पांच वर्षांनीं तुझी भेट झाली, घटकाभर एका जागीं बसून बोललोंसुद्धां नाहीं आणि दुसऱ्या क्षणालाच मी तुला निघून जा म्हणून सांगितलं, इतका मी राक्षस झालों तो माझ्या अविचारासुळंच. लग्न करण्याची चूक–नव्हे गुन्हा मी करतां नये होता–पण तो केला आणि त्याचीं हीं अशीं फळं मी आतां भोगतों आहें."

असें म्हणून तो स्वस्थ राहिला. काय उत्तर द्यावें हें मला सुचेना. त्याच्या म्हणण्याचें धोरण माझ्या ध्यानीं आलें होतें. गतकालांतील तो प्रसंग माझ्या स्मरणांतून गेला नव्हता. त्या वेळचे त्याचे उद्गार अजूनही माझ्या कानीं घुमत होते. ती आठवण येऊन अगदीं न कळत मला हुंदका आला.

चंदू म्हणाला, "तूं रडते आहेस का? तुला माझी कींव येते म्हणून? माझी कींव येण्याची वेळ ही नव्हे. ती वेळ केव्हांच निघून गेली आहे. त्यावेळीं माझी कींव केली असतीस तर आज मी असा जन्माचा दुःखी झालों नसतों. त्यावेळीं तुझी वृत्ति ज्या प्रकारची होती, त्याच प्रकारची वृत्ति आज माझ्या बायकोची आहे. असं म्हणतों म्हणून तूं रागाऊं नकोस. कां त्यावेळीं मला नकार दिलास? त्यावेळीं नकार देण्यांत तुझंही अन्तःकरण सनातनी वृत्तीचंच होतं! माझ्याबद्दल तुला आदर वाटत होता कीं नाहीं? मग मला तसं कां झिडकारलंस? माझ्या त्या प्रश्नानं त्यावेळीं तुला केवढा मोठा धक्का बसला? तुला आठवतं का? त्यावेळीं तूं मूर्छित पडलीस! तुझी मूर्च्छा क्षणभर टिकली, पण मी जन्माचाच मूर्च्छित होऊन बसलों आहें. मी कोर्टांत जातों, लोकांचे खटले चालवतों, पैसे मिळवतों, लोक मला सुखी समजतात, पण माझं मन मरून गेलं आहे. ही एकान्तिकता माझ्या जन्माला खिळून बसली आहे. पुनः पुनः माझा मलाच राग येतो तो एकाच गोष्टीबद्दल. लग्न करण्याची ही दुर्बुद्धी मला कां झाली? मी स्वतः दुःखी झालों तो झालोंच पण एका अजाण जिवाला निष्कारण दुःखी करण्याचं पाप मात्र त्यामुळं माझ्या माथीं बसलं आहे. तिचं समाधान माझ्या हातून

केव्हांही होणं शक्य नाहीं. समाधानाची तिला अपेक्षा नसेल का? ती असमाधानी झाली आहे–कुरब्या स्वभावाची झाली आहे—चिडखोर बनली आहे–पण ती अपराध तिचा नाहीं. तो अपराध माझा आहे. मी तिला तशीच वागवली आहे. प्रेमाचा एक शब्दही तिला कधीं ऐकूं आला नाहीं. तिला पाहतांच माझ्या अंगावर शहारे येतात. ती कांहीं कुरूप नाहीं किंवा मूर्खही नाहीं. हल्लींच्या परिस्थितीच्या मानानं मुलींना जितकं शिक्षण मिळतं, तितकं तिला मिळालंही आहे. तरीदेखील तिचा मला तिटकारा येतो. कां येतो तें मला सांगतां येत नाहीं. सर्वच चुका माझ्या आहेत. पण माझ्या एकाद्या चुकीमुळं तिनं कायमचं निघून जाऊं नये असंच मला वाटत असतं. हा माझा दुबळेपणा असेल, पण मला तो दुबळेपणा वाटत नाहीं. मी म्हणतों हा माझा दुबळेपणा नव्हे—हा माझा स्वार्थत्याग आहे—हें माझ्या पापाचं प्रायःश्चित आहे—"

बोलत असतांना त्याला एकदम रडूं कोसळलें. एकाद्या लहान मुलासारखा तो ओक्साबोक्शीं रडूं लागला. एवढा विद्वान आणि कर्तबगार पुरुष धाय मोकलून रडतो आहे, हें पाहून माझें मन फार उद्विग्न झालें. कोणत्या शब्दानीं त्याचें समाधान करावें हें मला सुचेना.

त्यानें डोळे पुसले आणि पुन्हा बोलायला सुरवात केली. तो म्हणाला, "आतां तूं कुठं जाणार आहेस? मुंबईतल्या कांहीं खाणावळींत राहण्याची सोय आहे. आजच्या रात्रीं अशा एकाद्या खाणावळींत काढ. मी घरीं जाईन. पुन्हा एकदां अंदाज घेईन आणि एका रात्रीपुरती तुला घरीं घेऊन जाणं शक्य असेल तर बोलवायला येईन. मला वाटतं तूं सकाळच्या दिवसाची उपाशी आहेस. स्नानसुद्धां केलं नसशील. अशा वेळीं घरीं आली असतीस—चांगलं स्नान करून घांसभर गरम गरम आमटीभात खाल्ला असतास तर तुला समाधान झालं असतं. पण तुझा तेवढासुद्धां आदरसत्कार करण्याचं माझ्या नशिबीं नाहीं. तूं विलायतेहून आलीस, तिथल्या हकीकती विचाराव्यात असं कितीतरी माझ्या मनांत होतं पण सर्व कांहीं तिथल्या तिथंच राहिलं. अगदीं पहिल्याच दिवशीं ती आकांत करील, अशी माझी कल्पना नव्हती. पण सर्वच गोष्टी माझ्या आयुष्यांत जर कल्पनेबाहेर होत आहेत तर एवढीच कां होऊं नये?"

मी म्हटलें, "मला एक प्रयत्न करून पाह्यचा आहे. तुझ्याबरोबर मी तुझ्या घरीं येतें. अगदीं बाहेर बसून राहतें. घरांत पाऊल टाकीत नाहीं. बाहेरच मला

ताट वाढून दे, म्हणून तुझ्या बायकोला सांगतें–आणि नंतर तिच्याशीं मन मोकळें करून चार शब्द बोलातां येतात कीं नाहीं, याचा प्रयत्न करतें."

"नको ! नको ! तेवढं मात्र करूं नकोस !" चंदू काकुळतीनें म्हणाला, "पुन्हां नानासाहेबांच्या घरची पुनरावृत्ति होईल. तुझा अपमान करायला ती आतां क्षणभरही मागंपुढं पहाणार नाहीं. त्यावेळीं काका आणि ताई बरोबर होतीं. त्यांचा थोडा तरी आडपडदा होता. पण यावेळीं तूं एकटी आलीस आणि ती तुला टाकून बोलली, तर मला मरणप्राय दुःख होईल. मी सांगतों तसंच कर. मीच तिचं मन वळवण्याचा थोडा प्रयत्न करतों–नाहीं तर तूं परभारें जाणारच आहेस."

त्याची दीनवाणी स्थिती पाहून मला फार कींव आली. त्याच्या म्हणण्यांत तथ्य होतें. आम्हीं दोघें एकदांच जाऊन थडकलों, तर तिनें त्याचा भलताच अर्थ केला असता. ज्या प्रसंगाला चंदू भीत होता, तो प्रसंग त्याच्यावर माझ्या वर्तनामुळें आला असता.

आम्हीं दोघेंही स्वस्थ बसलों. तोही विचार करीत होता, मी ही विचार करीत होतें. त्याचे विचार काय होते हें मला सांगतां आलें नसतें, पण माझ्या मनांत एकच गोष्ट येत होती. इतिहासाची पुनरावृत्ति झाली खरी, पण त्याचा प्रकार मात्र निराळा झाला. गहजब गुदरलेल्या स्थितींत मी स्टेशनवर आलें तों चंदू मला भेटला, त्याचे मित्र भेटले, त्या सर्वांनीं मला मोठ्या प्रेमानें वागवलें. माझ्या निरुत्साह पावलेल्या मनाला त्यावेळीं त्या प्रेमळ मित्रांच्या सहवासानें धीर आला.

पण आज काय झालें ? त्याच परिस्थितींत चंदू मला भेटला. त्या वेळच्या इतकी या प्रसंगीं मी खचून गेलें नव्हतें. जीव द्यायला देखील त्यावेळीं मी जशी तयार झालें होतें, तशी परिस्थिती आज नव्हती. आत्मविश्वासाच्या पायावर उभी राहिलेली मी, आज त्याच प्रकारच्या प्रसंगीं चंदूला भेटतें काय आणि तो माझ्यासमोर रडतो काय ? पूर्वीच्या खेपेप्रमाणें त्यानें माझें समाधान करण्याऐवजीं आज त्याचें समाधान करणें मला प्राप्त झालें होतें.

विषयान्तर करण्याच्या उद्देशानें मी विचारलें, "डॉक्टरची परीक्षा अगदीं हातातोंडाशीं आली असतां ती सोडून तूं इकडे वकिलीकडे कां वळलास ?"

माझ्या या प्रश्नानें त्याचा चेहरा बदलला. क्षणभर मनावर आलेली काळोखी दूर झालेली दिसली. तो म्हणाला, "खरं सांगूं ? डॉक्टरीची मला आवड होती पण

माझ्या बरोबरीचे कांहीं विद्यार्थी चार चार पांच पांच वेळां परिक्षेला बसूनही नापास होत आहेत असं ज्यावेळीं मी पाहिलं, त्यावेळीं हा धंदाच सोडून द्यावा असं मला वाटलं. खरं कारण म्हणजे तुझं विलायतेला जाणं. तूं विलायतेला गेल्यामुळं माझं मन इतकं वावदूक झालं होतं, कीं मी कोणती गोष्ट कां करतों याचंच मला भान नव्हतं. मेडिकल कॉलेज सोडलं आणि मी कायद्याचा अभ्यास करूं लागलों, हें काकांना कळवलं तरीही त्यांनीं विरोध केला नाहीं. कोणत्याही बाबतींत केव्हांही त्यांनीं जशी माझ्यावर सत्ता गाजवली नव्हती तशीच ह्यावेळींही गाजवली नाहीं. मी परिक्षेला बसलों–पास झालों आणि वकिली करूं लागलों. यांत कार्य-कारणभाव कांहींच नाहीं, माझं हें असं झालं आहे. कांहींच ताळतंत्र राहिला नाहीं.”

असें म्हणून तो स्वस्थ बसला. पुन्हां त्याला औदासिन्य आलें. मी कांहीं बोलणार होतें. पण इतक्यांत बाहेर डोकावून पाहतें तों मुंबईची हद्द आलेली दिसूं लागली.

तोंडाशीं आलेला प्रश्न तसाच गिळून टाकून मी स्वस्थ राहिलें.

बोरीबंदर स्टेशन आलें आणि आम्हीं दोघेंही प्लॅटफॉर्मवर उतरलों. स्टेशनच्या बाहेर येतांच मी जाण्यासाठीं गाडी ठरवूं लागलें त्यावेळीं चंदू म्हणाला, “थांब ! माझ्या डोक्यांत एक कल्पना आली आहे. चल माझ्याबरोबर–मी एक अनुभव घेऊन पाहणार आहें.”

मलाही तशीच लहर आली आणि मी गाडींत बसून चंदूबरोबर त्याच्या घरीं निघालें.

## प्रकरण सातवें ............ तुटलीक

आम्हीं दोघें घरीं आलेलीं पाहतांच सरुबाई आश्चर्यचकित झाली. चंदूनें निश्चयात्मक कांहीं ना कांहीं तरी करायचें ठरवलें होतें. त्यामुळें तिच्या मनावरच्या परिणामाची बाब तो खिजगणतींत धरीत नव्हता.

येतांच मी बूट वगैरे काढून ठेवले आणि चंदूनें माझें सामान आंत नेऊन ठेवायला सांगितलें. सरुबाई धुसमुसत होती पण प्रत्यक्ष असें तिनें कांहींच बोलणें केलें नाहीं. हा ज्वालामुखी थोड्या वेळांत भडकणार, असें मला वाटत होतें.

चंदूनें ताटें वाढण्यास सांगितलीं. मी हातपाय धुऊन जेवायला बसायच्या जागीं आलें, माझ्याबरोबर चंदूही होताच–पण तिथें एक चमत्कार दिसून आला. एकच ताट वाढलेलें होतें.

चंदूनें भटजींना विचारलें, " घरीं पाहुणी आली आहे ती तुम्हांला दिसत नाहीं का ? ताटं दोन वाढायचीं एवढंसुद्धां कळूं नये ? "

भटजी नुसते टकमक पाहूं लागले तेव्हां चंदू ओरडून म्हणाला, " दुसरं ताट वाढा. "

भटजी जागेवरून हालेनात. चंदूचा राग अनावर झाला. तो सरुबाईकडे वळून म्हणाला, "तुला तरी हें कळायला पाहिजे होतं–"

सरुबाई अगदीं शांतपणानें म्हणाली, " बायकामंडळी देखील पुरुषांच्या पंक्तीला जेवायला बसतात, हें मला वेडीला काय माहीत ? मी कांहीं अजून विलायतेला गेलें नाहीं."

चंदू जरा थंड होऊन म्हणाला, " बरं ! बरं ! आतां ताट वाढायला सांग. तूं पंक्तीला बसलीस तर मी कधीं अडथळा केला आहे का ? पण तूंच बसत नाहींस त्याला मी काय करूं ? "

सरुबाई म्हणाली, " लग्न झालेल्या बायका नवऱ्याच्या उष्ट्या ताटांत जेवायला बसत असतात. आपण पुष्कळ सांगाल मला पंक्तीला बसायला ! पण मी कांहीं माझा धर्म सोडणार नाहीं. "

एवढें बोलणें झालें तरीही भटजी ताट वाढीत नव्हता. तें पाहून चंदू त्याच्या अंगावर पुन्हां खेकसून ओरडला.

उत्तरादाखल भटजी म्हणाला, " मी काय करूं ? चार माणसांचंच जेवण आहे. एक मी तरी उपाशी राहिलं पाहिजे नाहींतर गड्यानं तरी उपाशी राहिलं पाहिजे. भात टाकूं का, असं बाईसाहेबांना विचारलं तर त्या नको म्हणून म्हणाल्या. पाहुण्याबाई आल्या आहेत ना ? असं सुद्धां मी विचारलं–त्यावेळीं त्यांनीं सांगितलं, कीं त्या कांहीं इथं जेवायला रहायच्या नाहींत. "

चंदू सरुबाईला उद्देशून म्हणाला, " हें खरं का ? "

सरुबाईनें उत्तर दिलें, " मीच उपाशीं राहतें म्हणजे साऱ्यांचीं पोटं भरतील."

चंदु म्हणाला, " तूं उपाशी रहा असं कोण म्हणतो आहे ? स्वयंपाक करणारा भटजी चांगला खंबीर आहे. पुन्हा जेवण करायची त्याची तक्रारही नाहीं. मग तूं उपाशी कशाला रहायाला हवं ? मथूनं इथं जेऊं नये, असं सरळच सांगेनास. त्याला एवढा आडपडदा कशाला ? "

सरुबाई म्हणाली, " मग आतां सांगतें–असला भ्रष्टाकार माझ्या घरीं नको. ती जेवणार असेल तर या घरांत मी जेवणार नाहीं. आणि इथं राहणार असेल तर उद्यांच्या उद्यां मला आपली माहेरीं पोंचती करा. "

चंदू म्हणाला, " ठीक. तुला जेवायचं नसेल तर जेऊं नकोस आणि उद्यां माहेरी जायचं असेल तर किती पैसे पाहिजेत तें सांग आणि खुशाल माहेरीं जा. मी कामाचा माणूस आहें. तुला पोचवायला यायला मला सवड नाहीं. "

मी कांहीं बोलणार होतें इतक्यांत चंदूनें मला डोळा घातला. सरुबाईनें जाऊन धाड्कन कुठें तरी अंग टाकल्याचें ऐकूं आलें. मी पाहण्यासाठीं जाणार होतें पण चंदूनें तोंडावर बोट ठेवून मला मनाई केली.

भटजीनें ताटें वाढलीं आणि आम्ही जेवायला बसलों. एवढा प्रकार झाल्यामुळें मला जेवण गोड लागेना. जेवित असतां चंदू कांहीं बोलला नाहीं.

पुण्यापासूनच्या हकिकती माझ्या नजरेसमोरून जात होत्या. जिथें मी जावें तिथें कांहीं ना कांहींतरी तंटाबखेडा उपस्थित व्हावा, असा हा माझा योगायोग तरी काय हें मनांत येऊन मला फार खिन्नता आली.

जेवण उरकून आम्हीं बाहेर आलों, त्यावेळीं माझा बिछाना घातलेला दिसला. भटजीच्या उदाहरणावरून गड्यानें धडा घेतला असावा.

बराच वेळ आम्हीं विलायतच्या गोष्टी बोलत बसलों होतों–तरीही बोलत असतांना माझें सर्व चित्त गतगोष्टींवर लागलें होतें. खरोखरीच सरूबाई माहेरी निघून जाईल का? ती तशी गेली तर त्यामुळें बाहेर बभ्रा होईल का? त्या बभ्याचा माझ्या चरित्रावर परिणाम होईल का? चंदूच्या बरोबरीचे लोक त्याला काय म्हणतील? तो काय उत्तर देईल? नाहीं नाहीं ते प्रश्न माझ्यासमोर उभे रहात होते.

साधारण साडे अकरा झाले. तोंपर्यंत आम्हीं बोलत बसलों होतों. चंदूनें घड्याळा-कडे नजर दिली आणि म्हटलें, "आतां मला वाटतं जरा डोकं टेकावं. चार दिवस विश्रांती घे आणि नंतर कोकणांत जायचं असेल तर जा. इथं तुला स्मिथबाईंना भेटायचं असेल! केव्हां जायचं तें मला सांगितलंस तर मी देखील बरोबर येईन."

मी म्हटलें, "स्पष्ट बोलतें याच्याबद्दल क्षमा कर. पण मला उद्यां सकाळच्याच बोटीनं जायचं आहे. पुन्हां आलें म्हणजे चार दिवस राहायला येईन."

"ते चालायचं नाहीं." चंदू म्हणाला, "मी तुला उद्यां जाऊं देणार नाहीं. निदान उद्यांचा दिवस तरी तूं इथं राहिलं पाहिजेस. तुला हिची भीति वाटत असेल. पण तिला जायचं असेल तर तिनं खुशाल जावं. उद्यांच तूं गेलीस, तरी पुन्हां तुला घेऊन येणं मला भाग पडेल. नुसत्या हिच्या खुळ्या मतासाठीं माझ्या जिव्हाळ्याच्या माणसांना तोडायची माझी इच्छा नाहीं. पुन्हां आलीस म्हणजे ही जाणारच कीं नाहीं? ती उद्यांच जाईल."

मी म्हटलें, “ मला हें कांहीं बरें वाटत नाहीं. माझ्यामुळं तुझ्या सुखाच्या संसारांत व्यत्यय यावा, हें मला बरं वाटत नाहीं. दुर्दैवानं मी जन्माचीच दुःखी बनलें आहें. माझा संसार नाहींसा झाला आहे, तिथं दुसऱ्याचा संसार मोडल्याचं पाप मी कां मस्तकीं घेऊं ? त्यांत तुला सुख होणार नाहीं आणि मलाही होणार नाहीं. ”

चंदू म्हणाला, “ माझं सुख ? मी सुखी आहें असं का तुला वाटतं ? मी सुखी असतों तर त्या दिवशीं तशी माझी विटंबना कां झाली असती ? कोणत्याच रीतीनं सुख लागत नाहीं–मग निदान आपल्या मनाप्रमाणं मी कां वागूं नये ? किती दिवस अशी शिक्षा भोगीत रहावं ? यानं यायचं, त्यानं यायचं नाहीं, याच्याकडे जायचं नाहीं, त्याच्याकडे पाह्यचं नाहीं, अशी ही साहेबी माझ्यावर गाजवली जावी म्हणून मी कांहीं स्वतंत्र धंदा पत्करला नाहीं. नाहीं तर मला नोकर होतां आलं असतं. बाहेर स्वतंत्रता असते. घरांतच तेवढी पारतंत्रता. केव्हां तरी ही भीति तोडून टाकावी लागणारच. जितकी ती जुनी होईल तितका गंज जास्त चढेल. तितके डाग जास्त लागतील. त्यापेक्षां आजच्या आजच काय तें होऊन जाऊं द्या ! ”

आंतून एकदम मोठ्यानें रडण्याचा आवाज ऐकूं आला. मी पुन्हां पाह्यला जाणार होतें पण पुन्हां मला चंदूनें दरडावलें.

त्याच्या मनाचा पक्का निर्धार झाला होता. तो प्रकार पाहून मला वाईट वाटत होतें खरें पण त्याला माझा इलाज नव्हता. हा विचार मी पहिल्यानेंच केला पाहिजे होता. ज्यावेळीं चंदूनें मला बोलावलें त्यावेळींच मी नाहीं म्हणायला पाहिजे होतें. आल्यानंतर असें कांहीं तरी होणार याची मला जाणीव नव्हती असें नाहीं. आतां तें झाल्यावर माघार घेणें भ्याडपणाचें झालें असतें !

मी बिछान्यावर पडलें पण मला झोंप लागेना. लहानपणापासूनच्या सर्व हकिकती नजरेसमोरून जात होत्या. सत्यकाम जाबालाची गोष्ट आठवली. सत्यासाठीं वाटेल ते क्लेश सहन करणें हा मानव धर्म आहे, याचीही आठवण झाली.

चंदूची तयारी होती. मग मला वाटलें मीच कां माघार घ्यावी ? सरूबाई त्रागा करीत होती यांत शंका नाहीं. तो त्रागा सत्यासाठीं होता का ? तिच्या मताप्रमाणं होता. माझ्या किंवा चंदूच्या मताप्रमाणें तो त्रागा मूर्खपणाचा होता. दोघेंही

आपापल्या परीनें वाटणाऱ्या सत्याच्या कल्पनेसाठीं भांडत होतीं. त्यांत ज्याचा जय होईल तेंच खरें सत्य, असें ठरायचें होतें.

पण यांतील जय म्हणजे काय? कोडेंच असें पडलें होतें, कीं जय कोणता हेंच ठरणें शक्य नव्हतें. सरुबाई माहेरीं निघून गेली—त्रागा करून कायमची तिथेंच राहिली तर तो चंदूचा जय झाला असें म्हणायचें कीं काय? ती पश्चात्ताप होऊन जर परत आली तर कदाचित् तो जय झाला असता. पण तशी ती येईल असें मला वाटलें नाहीं. तिचीं मतें फार विक्षिप्त होतीं खरीं पण त्यासाठीं मन कठोर करावें लागणार होतें. ती माहेरीं गेली आणि तिनें चंदूवर भलताच आरोप केला तर माहेरच्या माणसांनीं तिला पाठिंबा दिला असता, तिची बाजू उचलून धरली असती आणि चंदूची बदनामी करण्याच्या बाबतींत तिच्या माहेरचीं माणसेंदेखील कंबर कसून उठलीं असतीं.

दुसरा प्रश्न मनांत आला तो असा, कीं अशा प्रकारें झालेल्या बदनामीमुळें चंदूच्या धंद्यावर कांहीं परिणाम होईल कीं काय? मला तसें शक्य वाटलें नाहीं. केती तरी वकिलांची खासगी चरित्रें सदोष असल्याचें मला माहीत होतें. जोंपर्यंत वकील या नात्यानें तो आपलीं कामें चोख बजावीत होता तोपर्यंत त्याच्या खासगी वर्तनावर केलेले आक्षेप त्याच्या धंद्याच्या आड येऊं शकले नसते, अशीच कल्पना माझ्या मनांत आली.

काय होईल तें होवो एकदां हा प्रयोग होऊं द्यायचाच, असा चंदूप्रमाणें मीही निर्धार केला. 'वाघ म्हटलं तरी खातो वाघोबा म्हटलं तरी खातो' मग वाघ्याच कां म्हणूं नये?

विचार करीत असतां मला झोंप लागली. सकाळीं जागी झालें त्यावेळीं चांगलें उफटीत उजाडलें होतें. चंदू माझ्यापूर्वींच जागा होऊन प्रातर्विधी आटोपून सकाळचीं वर्तमानपत्रें वाचीत बसला होता.

मी नित्यविधि करून आलें तरी चंदूच्या हातांत वर्तमानपत्रें होतीं. आंतून येत असतां सरुबाई मला कुठें दिसली नाहीं. मी हॉलमध्यें आलें त्या वेळीं भटजी चहा घेऊन आला. मी चहा घेतला तरीही चंदूनें माझ्याकडे पाहिलें नाहीं. मी कांहीं वेळ वाट पाहून त्याला विचारलें, "सरुबाई कुठं आहे?"

वर्तमानपत्रावरील नजर दूर न करतां तो म्हणाला, " गेली, माहेरीं गेली ! "

असें कांहीं तरी होईल याची कल्पना जरी मला होती तरी मला वाईट वाटलें. इतक्या लौकर ती जाईल असें मला वाटलें नव्हतें. रात्रीं दोघांचें कांहीं तरी चांगलेंच भांडण झालें असावें आणि त्या रागाच्या तिरमिरींत ती सकाळीं उठून निघून गेली असावी, असा मी अंदाज केला. ती कोणत्या रीतीनें गेली, हें चंदूला विचारणें मला प्रशस्त वाटलें नाहीं.

कोर्टांत जाईपर्यंत चंदू कांहीं विशेष बोलला नाहीं. दुपारच्या वेळीं मी वर्तमान-पत्रें घेऊन कांहीं वेळ वाचीत बसलें. पण वाचनाकडे माझें लक्ष लागेना. पुनः पुनः विचाराच्या चक्रांत मी गोते खात होतें. झालें हें बरें झालें, कीं वाईट झालें, याची जबाबदारी आपल्यावर किती आहे आणि त्या जबाबदारीचा आपल्या पुढल्या भवितव्यावर काय परिणाम होणार आहे, याचा विचार मला भेवडावित होता. माझ्या अतिविचारी स्वभावामुळें हजारो कुजकट कल्पना माझ्या नजरेसमोर येत होत्या. घरांत दुसरीं दोन माणसें होतीं खरीं पण ती नोकर माणसें होतीं. अशा परिस्थि-तींत एकट्या रहाणाऱ्या चंदूच्या घरीं मी रहावें कीं राहूं नये, असा प्रश्न माझ्या समोर येऊं लागला. स्वतःचें मन निर्मळ असल्यावर जगाला भीण्याची पर्वा नाहीं, असें आपण म्हणत असतों खरे पण प्रत्यक्ष प्रसंगीं मन कच खाल्ल्याशिवाय रहात नाहीं. तसेंच माझें झालें !

तीनचार वाजण्याच्या सुमाराला मी स्मिथबाईला भेटून आलें. मला पाहतांच त्यांना फार आनंद झाला. माझी हकिकत त्यांना वर्तमानपत्राच्याद्वारें पूर्वींच कळली होती. मी आल्याचेंही त्यांना कळलें होतें. त्या माझीच वाट पहात होत्या.

त्यांच्या ताब्यांत असलेल्या मुलींच्या शाळेंत मी हेड मिस्ट्रेसची जागा पत्करावी अशी इच्छा त्यांनीं प्रदर्शित केली. त्या म्हणाल्या, " तुम्हीं ज्या प्रकारचा सन्मान विलायतेंत मिळवून आलां आहांत त्याला या नोकरीचा पगार साजेसा नाहीं खरा—पण तुमच्या जाण्यांत माझा जो अंशतः तरी हातभार लागला आहे त्याला अनुसरून तुम्हीं ही नोकरी पत्करण्याचा स्वार्थत्याग दाखवावा अशी माझी इच्छा आहे. दुसऱ्या ठिकाणीं कदाचित् तुम्हाला मोठ्या पगाराची नोकरी मिळेल—कदाचित् मिळणारही नाहीं—खरं पाहिलं तर तुम्हाला कोणत्या तरी कॉलेजांत प्रोफेसरची जागा मिळाली पाहिजे होती—पण आमचीं कॉलेजें—म्हणजे आमचीं हिंदुस्थानांतील

कॉलेजें अजूनपर्यंत मुलांच्या कॉलेजांत स्त्रियांना प्रोफेसर नेमूं लागलीं नाहींत. स्त्रियांची कॉलेजें या भागांत तरी नाहींत. तुम्हालाही नोकरी पत्करल्यावांचून गत्यंतर नाहीं. तेव्हां नोकरी पत्करायची तर ती आमच्याच शाळेची पत्करावी, अशी माझी फार इच्छा आहे. पुढें चांगल्या पगाराची दुसरी नोकरी मिळेल तर तुम्हांला मोकळीक द्यायची माझी तयारी आहे. पण तुमच्या येण्याचा पहिला मान आम्हाला मिळावा अशी माझी आत्यन्तिक इच्छा आहे. ”

त्या जागेचा पगार दीडशें रुपये होता. माझ्या प्रस्तुतच्या परिस्थितींत तो पगार सर्व दृष्टीनें भरपूर होता. स्वतंत्र बिऱ्हाड करून एकादी स्वयंपाकीण ठेऊन राहणें तेवढ्या पगारांत मला सहज शक्य होतें.

मी म्हटलें “ माझ्या जागीं कोणी इतर पुरुष असता तर त्याला नोकरी मिळ-वण्यासाठीं सर्वत्र खेटे घालावे लागले असते. प्रोफेसरचीच जागा मिळाली पाहिजे असा त्यानं आग्रह धरला असता आणि तशी जागा त्याला चटूकन मिळालीही असती. माझी कांहींच अपेक्षा नसतां आपण चटूकन जो हा मान दिला तो पाहून खरोखरीच मला आनंद होतो आहे. तरीही या बाबतींत विचार करायला मला चार दोन दिवसांचा अवधी द्याल तर बरं होईल. ” असें सांगून मी स्मिथबाईंचा निरोप घेतला.

संध्याकाळीं चंदू घरीं आला त्या वेळीं स्मिथ बाईकडे झालेली हकीकत त्याला सांगितली. त्याच्या पुरुषी स्वभावाप्रमाणें मी कांहीं दिवस वाट पहावी असें त्याला वाटल्याचें त्यानें बोलून दाखविलें, त्याचें मला आश्चर्य वाटलें नाहीं. मला संमती द्यायची ती फक्त काका आणि ताई यांचीच. त्यांनींही विरोध केला नसता, ही माझी खात्री होती.

मी असें बोलून दाखविलें तेव्हां चंदू म्हणाला, “ दीडशें रुपयाची नोकरी हल्लींच्या दिवसांत कांहीं लहान नाहीं. विशेषतः तुझ्यासारख्या एकाद्या स्त्रीला ! आतां तूं ही नोकरी पत्करायची म्हणून म्हणतेस, तर माझी एक सूचना आहे. बिऱ्हाड करून रहावं—स्वतंत्र बिऱ्हाड करून रहावं असं तुला वाटतं आहे, तें मला पटत नाहीं. तूं इथं माझ्याकडेच रहा. मनांत यत्किंचितही संकोच बाळगूं नकोस. माझ्यापासून तुला कोणत्याही प्रकारचा उपसर्ग होणार नाहीं. ती आतां येत

नाहीं याबद्दल माझी खात्री आहे. निदान इतक्या लवकर तरी येत नाहीं. एक दोन वर्षें तरी ती माझी कसोटी पाहणार ! तोंपर्यंत इथं एकटं राहणं माझ्या जिवावर येईल. तूं इथं राहिलीस तर तेवढीच मला सोबत होईल. तेवढाच मनाला विरंगुळा मिळेल. नाहीं तर–नाहीं तर मथू, मी तुला बजावून सांगतों, मी बहकेन. माझे मनोधर्म फार भावनात्मक आहेत. एकटं रहाणं मला शक्य नाहीं. ती निघून गेली आहे, मी होऊन तिला कधींही बोलावणार नाहीं आणि वर्ष दोन वर्षं जर मी असा एकटाच राहिलों तर माझ्या वर्तनाला आळा घालणं माझ्या हातीं राहणार नाहीं. मी पापी होऊं नये अशी तुझी इच्छा असली, तर तूं इथं रहा. तुझ्या सहवासानं माझ्यावर एक प्रकारची करडी नजर राहील. स्पष्ट सांगायचं म्हणजे मला तुझी जरब वाटते. वयानं तूं माझ्यापेक्षां लहान आहेस खरी पण मी जितका काकांना भितों, तितकंच मला तुझं भय वाटतं. या वयाचं हें असं आहे, कीं या वेळीं वडील माणसांची पाखर डोक्यावर असली पाहिजे. ती नसल्यामुळं बहकलेलीं किती तरी माणसं मी पाहिलीं आहेत. तसं माझं व्हायला नको आहे. तुझ्या सोयीसाठीं नव्हे–तर केवळ माझ्या कल्याणासाठीं तूं मला टाकून दुसरीकडे राहूं नकोस."

काय उत्तर द्यावें हें मला सुचेना ! बोलत असतां तो इतका गहिवरला होता, कीं त्याची ती स्थिती पाहून मला देखील अन्तःकरणापासून भडभडून आलें.

माझ्या डोळ्यांतून आंसवें येत असलेलीं पाहून तो म्हणाला, "तूं रडते आहेस? मथू, तुला माझी दया येते आहे? दयेला कोणी पात्र असेल तर तो मीच आहें. यावेळीं निष्ठूर होऊं नकोस. तूं माझ्या सहवासाला राहिलीस तर लोक तुला नांवं ठेवतील, मलाही नांवं ठेवतील, असं तुला वाटत असेल–पण त्याची पर्वा बाळगूं नकोस. लोकापवाद बोलतां बोलतां धुतले जातात पण त्या लोकापवादाच्या भयानं जी गोष्ट करण्याचं आपण टाळतों, ती टाळण्यामुळं होणारे अनर्थ मात्र एकाद्या निरपराधी जीवाचा कायमचा सत्यानास करतात, हें विसरूं नकोस."

त्या वेळीं मी कांहींच उत्तर दिलें नाहीं. मी किती तरी वेळ विचार करीत बसलें होतें. तोही कांहीं बोलत नव्हता. माझ्या मनाची सारखी खळबळ चालली होती. मला कांहींच निश्चय करतां येईना.

मनाचा निर्धार करून शेवटीं मी म्हटलें, " मला वाटतं, या गोष्टीचा निकाल करणं आपण काकांच्यावरच सोपवूं. ते जसं सांगतील तशीच मी आजपर्यंत वागत आलें आहें आणि या बाबतींतही त्यांचीच आज्ञा शिरसावंद्य करीन. तुझ्याकडे राहणं मला धोक्याचं वाटतं. म्हणजे तुझ्यापासून मला कांहीं धोका आहे असं नव्हे, तर तूं म्हणतोस त्याप्रमाणें लोकापवादाचीच मला भीति वाटते. इतकेंही असून मी तुझ्याकडेच रहावं असं काका जर मला सांगतील, तर मी त्यांच्या आज्ञेबाहेर जाणार नाहीं."

माझ्या या उत्तरानें त्याचें समाधान झाल्यासारखें दिसलें.

दुसऱ्याच दिवशीं मी कोकणांत जायला निघालें. मी निघण्याची घाई केली होती खरी पण माझ्या जाण्याला त्यानें अडथळा केला नाहीं. काकांचा निकाल ऐकण्यासाठीं तोही तितकाच उत्सुक झाला होता.

## प्रकरण आठवें ............ पुनः मुंबई

मी गांवीं येऊन पाहतें तों तिथें एक निराळेंच प्रकरण उपस्थित झालें होतें. काकांवर बहिष्कार घालण्याचा गांवांत ठराव होत होता. सर्वांत आश्चर्याची गोष्ट ही, कीं या प्रकरणीं माझे बाबाच पुढारी होते.

लोकांना हें आश्चर्य होतें. मला यांत आश्चर्य वाटण्याजोगें कांहींच नव्हतें. ज्या दिवशीं माझी आई वारली, माझ्या बाबांनी पुन्हा लग्न केलें, त्याच दिवशीं मी मातृ-पितृविहीन झालें होतें. माझ्याबद्दलच्या वात्सल्याचा यत्किंचित्‌ही ओलावा माझ्या बाबांच्या मनांत राहिला नव्हता. किंबहुना आपली एक मुलगी आहे, याचीसुद्धां त्यांना आठवण राहिली नव्हती.

विलायतेहून आलेली एक बाई प्रायःश्चित घेतल्याशिवाय काकांच्या घरीं येऊन राहिली आणि तिला त्यांनीं आपल्या पंक्तीला घेतलें, घरांत वावरूं दिलें, एवढेंच त्यांचें पाहणें होतें. ती विलायतेहून आलेली बाई म्हणजे आपली मुलगी आहे, हें त्यांच्या हिशेबांत नव्हतें. गांवचे एक पुढारी आणि वेदशास्त्रसंपन्न शास्त्री या नात्यानें

आपण आपलें कर्तव्य बजावीत आहोंत, असेंच त्यांचें म्हणणें होतें. ती मुलगी आपल्या घरीं यायची असती तर प्रायःश्चित घेतल्याशिवाय तिला आपण आपल्या घराचा उंबरठाही चढूं दिला नसता, असें ते अभिमानानें सांगत होते.

ज्या वेळीं काकांनीं ही हकिकत मला सांगितली त्या वेळीं मी त्यांना विचारलें, " मग आतां तुम्हीं काय करणार ? मला कांहीं इथं रहायचं नाहीं, मला नोकरी मिळालीच आहे, मला मुंबईला रहायचं आहे, मग तुम्हीं प्रायःश्चित घेऊन व्हा ना कां मोकळे ! "

" वेड्या मुली," काका म्हणाले, "हा तत्वाचा प्रश्न आहे. तूं इथं राहणार आहेस कीं राहणार नाहींस, याच्याशीं मला कांहीं कर्तव्य नाहीं. समुद्र प्रवास करणें हा जर अधर्म होत असेल तर या कोंकणच्या बोटींतून प्रवास करणाऱ्या प्रत्येक माणसाला प्रायःश्चित घ्यावं लागेल. या लोकांचं म्हणणं असं आहे, कीं नुसतं समुद्र-यानांतून प्रवास करणं, हा अधर्म नव्हे—तर परदेशगमन करणं हा अधर्म आहे. माझा मनुस्मृतीवर विश्वास नाहीं. मनुस्मृतींत इतक्या परस्परविरुद्ध गोष्टी आहेत कीं त्यांचा एकमेकांशीं मेळ घालणें अशक्य आहे. मनुस्मृतींत जें प्रायःश्चित सांगितलं आहे किंवा निर्णयसिंधूंत सांगितलं आहे, तें समुद्रयानासाठीं आहे—समुद्रपार होण्या-साठीं नव्हे. तें पाप कोकणच्या लोकांच्या हातून प्रत्यहीं घडत आहे, असा माझा समज आहे. परदेशगमनाच्या या खोट्या कल्पनेमुळंच आम्हांला आज पारतंत्र्य आलं आहे. वास्तविक हिंदुस्थानानं यापूर्वींच इतर देश काबीज केले पाहिजे होते, पूर्वीच्या काळांत एवढं हिंदुस्थानचं सामर्थ्य होतं. पण परदेशगमनाच्या कल्पनेला पापाचं स्वरूप दिल्यामुळं आम्हीं आज दुसऱ्याच्या सत्तेचं जूं वाहतों आहोंत. परदेश-गमनाला ख्रिस्ती धर्मांत जर विरोध असता तर एवढ्याशा टिचभर इंग्लंडला आज हिंदुस्थानावर सत्ता गाजवतां आली नसती. एवढ्या बाबतीपुरती तुलना केली तर ख्रिस्ती धर्म हिंदुधर्मापेक्षां मोठा आहे—जास्त व्यापक आहे—असंच कुणीही म्हणूं लागेल. हिंदुस्थान नाहीं तर इंग्लंडची काय किंमत आहे ? एवढंसं टिचभर इंग्लंड आज हिंदुस्थानावर राज्य करतं आहे, याचं कारण एकच, कीं असलीं हीं खुळीं बंधनं त्यानं मानलीं नाहींत. मी याचं न्यायानं परदेशगमनाकडे पाहतों. एवढंच नव्हे तर आम्हीं परदेशगमन करीत नाहीं हेंच मोठं पाप आहे, असं मी समजतों. परवां आमच्या शेजारच्या गांवच्या त्या गोविंदरावांचा मुलगा मुंबईहून आला. दारू

पिऊन तो गटारांत पडलेला कित्येकांना आढळून आला. काय खात असेल आणि काय नसेल हें त्याचं त्यालाच ठाऊक. त्याला कुणी कां बहिष्कार घातला नाहीं? त्याच्या बापाला कां वाळींत टाकलं नाहीं? माझं म्हणणं हेंच आहे, कीं आधीं त्याला आणि त्याच्यासारख्या इतरांना वाळींत टाका आणि मग मला प्रायश्चित्ताचा अधिकारी ठरवा. ”

“ या प्रश्नाला त्यांनीं काय उत्तर दिलं? ” मी विचारलें.

“ कुणीच कांहीं उत्तर दिलं नाहीं. ” काका म्हणाले, “ गोविंदराव गांवचे खोत आहेत. लोकांचं बरं वाईट करणं त्यांच्या हातीं आहे. पोलीसपाटिलकीचा अधिकारही त्यांनाच मिळाला आहे. तेव्हां असल्या अधिकारी माणसाशीं विरोध कोण करणार? मलाही थोडाबहुत अधिकार आहे. मीही एक लहानसा खोतच आहें. पण माझा स्वभाव या लोकांना माहीत आहे. खोतपणाचा अधिकार मी कधीं गाजवला नाहीं आणि यापुढं गाजवणारही नाहीं, हें त्यांना माहीत आहे आणि म्हणूनच त्यांनीं माझ्यावर हें अस्त्र फेकलं आहे. खरं पाहिलं तर हें सर्व तुझ्या बापाचं कारस्थान आहे. मी तुझ्याबद्दल कळकळ बाळगतों, तुला आश्रय देतों, तुला विलायतेला जायला मीच उत्तेजन दिलं, या गोष्टीची त्यांना चीड आली आहे. त्याचा सूड ते माझ्यावर उगवीत आहेत. आज वाळींत टाकण्याचा ठराव करतील पण उद्यां माझ्या घरीं एकादं कार्य असलं कीं मुकाट्यानं पंक्तीला येतील. मी यांच्या बहिष्काराला एक कवडीचीही किंमत देत नाहीं. ”

काकांचें म्हणणें खरें होतें आणि तसें झालेंही. बहिष्काराचा ठराव पास झाला. काकाशीं संबंध ठेवण्याचें कित्येकांनीं टाळलेंही. पण ज्यावेळीं काकांनीं एक मोठा उत्साह करून सर्वत्रांना जेवायला बोलावलें त्यावेळीं सारे मुकाट्यानें आले. आले नाहींत फक्त माझे बाबा. ते बहिष्कार पाळण्याच्यासाठीं नव्हे—तर केवळ माझ्या संबंधामुळें.

या पुढल्या गोष्टी. त्या दिवशीं या बहिष्कारावरूनच आमचें बोलणें पुढें सुरू झालें. स्मिथबाईची सर्व हकिकत मी काकांना सांगितली आणि पुढें मी काय करावें याबद्दल त्यांना प्रश्न केला.

ते म्हणाले, “ प्रश्न मोठा बिकट आहे. चंदूचं म्हणणं अक्षरशः खरं आहे. तुम्हां दोघांवरही माझा पूर्ण विश्वास आहे. पण तुम्ही दोघंही एका जागीं रहायला

मी संमती द्यावी किंवा नाहीं, याचा मला मोठा विचार पडतो. " ताईकडे वळून ते म्हणाले " तुझं मत काय आहे ? "

ताई पहिल्यानें हंसली आणि नंतर माझ्याकडे वळून म्हणाली, " हा प्रश्न तुझा आहे कीं यांचा ? "

मी म्हटलें, " या बाबतीतलं मत मी काकांना विचारलं आहे. निदान यावेळीं तरी तुझा कांहीं संबंध नाहीं. "

माझे उद्गार ऐकून काका मधून मधून हंसले आणि म्हणाले, " या बाबतींत मी निरुत्तर झालों आहें आणि म्हणूनच मी हिला विचारलं. मी हिची सल्ला जो घेतों आहें ती माझ्यासाठीं. तुझा प्रश्न म्हणून नव्हे. मी हिला असं विचारतों आहें, कीं चंदुची बायको त्याच्या घरीं नसतां मथूनं त्यांच्या घरीं जाऊन राहणं योग्य होईल कीं अयोग्य होईल ? "

एक क्षणभर थांबून ताई म्हणाली, " त्यांत अयोग्य असं कांहींच नाहीं. पण माझी एक सूचना आहे–तिनं तिथं जाऊन रहावं अशीच माझी इच्छा आहे-पण लोकांचे प्रवाद टाळण्यासाठीं मी एक उपाय सुचवणार आहें; पण तो इकडे पटला मात्र पाहिजे. "

" ठीक ! ठीक ! " काका म्हणाले, " तुझा उपाय योग्य असला तर तो आम्ही तावडतोब अमलांत आणूं. "

ताई पुन्हा हंसून म्हणाली, " मला कठीण वाटतं तें तेंच. यांत इकडून बराचसा स्वार्थत्याग करावा लागणार आहे—बरीचशी गैरसोय सोसावी लागणार आहे. "

" मथूच्या कल्याणासाठीं मी वाटेल तो स्वार्थत्याग करीन. वाटेल ती गैरसोय सोशीन, " काका म्हणाले.

" ती गैरसोय इतकी सोपी नाहीं. " ताई म्हणाली, " माझं म्हणणं असं आहे, कीं लोकांनीं नांवं ठेवूं नयेत म्हणून पहिल्यानं कांहीं दिवस मीच तिथं जाऊन राहतें—"

" जा ना ! जा ना ! " काका म्हणाले, " म्हणजे मी इथं एकटा राहून पडतील ते हाल सोसावेत, असंच ना तुझं म्हणणं ? जेवणाच्या बाबतींत मी किती खोडकर आहें हें तुला आतां नव्यानं सांगायला नको. आचारी स्वयंपाक्यानं केलेलं जेवण मला कांहीं जात नाहीं—"

" तें मला माहीत होतं म्हणूनच मी तसं म्हटलं, " ताई म्हणाली, " कीं इकडून बरीच गैरसोय सोसावी लागणार आहे. मी म्हणतें, शक्य असेल तर आपण उभयतांच जाऊं. "

" हा उपाय मात्र ठीक आहे. " काका म्हणाले, " चंदूही पुष्कळ दिवस या या म्हणतो आहे, त्याचंही ऐकल्यासारखं होईल आणि प्रवादही टळेल. पण दुसरं एक काय होईल तुला माहीत आहे ? सरुबाईला घरांतून घालवून दिल्याच्या साऱ्या अपेशाचं खापर त्यामुळं आपल्या माथीं येईल. ती होती तोंपर्यंत आपण कधींच तिकडे रहायला गेलों नाहीं आणि आतां ती निघून गेल्याबरोबर आपण जाणार आहोंत. सरुबाईच्या माहेरचीं माणसं या गोष्टीचा संबंध आणल्यावांचून राहणार नाहींत. कदाचित् लोकही तसंच म्हणतील. "

" बरं ! म्हणतील ! " ताई म्हणाली, " सरुबाईच्या माहेरच्या माणसांनीं काय किंवा लोकांनीं काय, तसं म्हटलं म्हणजे आपण कांहीं देवाच्या घरीं दोषी ठरत नाहीं. सरुबाईनं निघून जावं असं आम्ही केव्हांच म्हटलं नाहीं—केव्हांच आम्हांला म्हणायचं नाहीं—इतकंच नव्हे, तर त्या दोघानीं सुखानं नांदावं हीच आमची अन्तरींची तळमळ. पण ती आतां निघून गेली तर चंदुभाऊजीसाठीं आपल्याला नको का तिकडे जायला ? शिवाय ही वाळींत टाकण्याची वावटळ उठली आहे तीही थोडीशी थंडावेल. आम्ही इथं नसलों तर वाळींत टाकणार कुणाला ? तिथला ताळमेळ पाहून—तितक्यांत सरुबाई आली तर बरंच झालं—वाटलं तर कांहीं दिवस राहूं. तिनं नको म्हटलं तर निघून येऊं. आपल्याला कांहीं चंदूभाऊजींच्या घरीं कायमचं ठाणं देऊन बसायचं नाहीं. सरुबाई परत आली आणि त्यामुळं कदाचित् मथूला निराळं बिऱ्हाड करावं लागलं आणि तसं बिऱ्हाड करायला तिलाही धीर आला, तर आमची आपोआपच कांहीं जरूरी राहणार नाहीं."

काका विचारांत पडले. उपाय पटला होता पण तो अमलांत आणावा कसा, याची त्यांना चिंता पडल्यासारखी दिसली. मला ताईचा उपाय तंतोतंत पटला. चंदूची इच्छा असतां आपण तिथें राहूं नये, हें मला बरें वाटत नव्हतें. लोकापवादाला भिण्याइतकी मी दुबळी आहें, असाच त्यामुळें चंदूचा समज झाला असता. पुराव्यानिशी मी दुबळी ठरलें असतें. लोकापवादाला न जुमानतां मनाला पटणारी प्रत्येक गोष्ट आजपर्यंत मी करीत आलें होतें आणि आतांच

जर मी माघार घेतली असती तर तो माझा कमकुवतपणा ठरला असता. ताईला याचा अंदाज असावा आणि म्हणूनच तिनें ही योजना सुचविली.

काका म्हणाले, " ठीक आहे ! मला साधक बाधक गोष्टींचा विचार आधीं केला पाहिजे. कांहीं महिने मुंबईला जाऊन राहायचं म्हटलं म्हणजे इथल्या भानगडींची आधीं व्यवस्था लावली पाहिजे. ती व्यवस्था लावायला चार दोन दिवस सहज जातील. तेवढी व्यवस्था लागली, कीं आपण तिघंही बरोबरच मुंबईला जाऊं."

काकांचे हे उद्गार ऐकून मला अतिशय आनंद झाला. त्यांतही थोडासा कमकुवतपणा नव्हता असें नाहीं. खरें पाहिलें तर मी या बाबतींत काकांना विचारायलाच नको होतें-म्हणजे त्यांची संमति घेण्यासाठीं विचारायला नको होतें. मी चंदूकडे राहणार आहें, असें नुसतें जर सांगितलें असतें तर त्यांनीं त्याला मुळींच विरोध केला नसता. पण आतां विचारलें, ताईनीं उपाय सुचवला, काकांनीं त्याला संमति दिली,. तेव्हां मला मागें पुढें पाहण्याजोगें कांहींच राहिलें नाहीं.

आम्ही तिघेंही ज्या वेळीं मुंबईला चंदूच्या घरीं येऊन पोंचलों त्या वेळीं तो आश्चर्यचकित झाला. निघण्याच्या पूर्वी त्याला कळविलें नव्हतें. त्याला आश्चर्यचकित करून सोडावें, असाच ताईचा उद्देश होता.

झालेली सर्व हकीकत काकांनीं चंदूला सांगितली. तीं दोघेंही येऊन राहिल्यानें चंदूला जरी आनंद झाला, तरी अशा विशिष्ट प्रसंगीं तीं आलीं, हें कांहीं त्याला बरें वाटलें नाहीं, असें त्याच्या एकंदर उद्गारांवरून मला दिसून आलें. त्याची इच्छा होती ती आम्ही दोघांनींच रहावें म्हणून. काका आणि ताई आल्यानें ती इच्छा साध्य झाली नाहीं. तो आगीचा खेळ होता. तो जिवापाड खेळ खेळून पाहण्याचें दिव्य त्याला करून पाहायचें होतें. त्या दिव्यांतून मी सहीसलामत सुटलें असतें, याची मला खात्री होती—

पण चंदूच्या बाबतींत मलाही विश्वास वाटत नव्हता. पूर्वीचे सर्व प्रसंग आठवले म्हणजे तें दिव्य चंदूला कठीण गेलें असतें, अशी माझी खात्री होती आणि म्हणूनच काका आणि ताई आल्यानें मला समाधान वाटलें.

मी नोकरीवर रुजू झालें. मी दीडशें रुपये पगार मिळवितें, याचा ताईला मोठा अभिमान वाटत असे. ओळखीच्या सर्व बायकांना तोंड फाटेपर्यंत स्तुति करकरून ती ही हकीकत सांगत असे.

मी तिची 'आई' होतें, मुलगी नव्हतें, हें ती बहुतेक विसरून गेली होती. आपल्या मुलीच्या कर्तबगारीचा आईला जितका अभिमान वाटावा तितकाच माझ्याबद्दलचा अभिमान तिला वाटत होता. तें व्यावहारिक नातें जें एकदां उलटलें तें कायमचेंच होऊन बसलें.

तरीही नात्यागोत्याच्या लोकांत चर्चा सुरू झाली होती. काकांना जी भीति वाटत होती तीच खरी ठरूं लागली. आम्हीं तिघांनींही कट करून सरूबाईला घराबाहेर घालवून दिलें, असाच लोकांचा समज होऊं लागला होता. मध्यंतरी बाबा मुंबईला आले होते त्यांनीं मुद्दाम ओळखीच्या लोकांचा तसा गैरसमज करून दिला, असें आमच्या कानीं आलें.

तिकडे नानासाहेबही स्वस्थ राहिले नव्हते. लीलेच्या पत्रावरून त्यांचीही हकीकत कळत असे. लीलेच्या मनांत मुंबईला यावें असें फार होतें, मलाही तसेंच वाटत होतें आणि ताईचाही त्या गोष्टीला विरोध नव्हता.

काकांनीं नानासाहेबांना पत्र लिहिलें, पण त्यांनीं लीलेला पाठविण्याचें साफ नाकारलें.

मला भीति वाटूं लागली. वारंवार होणाऱ्या छळामुळें लीला अगदीं बेफाम झाली होती. एखाद्या दिवशीं ती एकदम निघून इकडे येईल अशी पदोपदीं मला भीति वाटत होती.

मी लीलेला मुद्दाम पत्र लिहिलें आणि अशा प्रकारचा अविचार न करण्याविषयीं बजावलें. या माझ्या पत्राला आलेलीं तिचीं उत्तरें वाचून मला फार दुःख झालें.

तिनें लिहिलें होतें, " माझा छळ अनावर होत चालला आहे. नानासाहेबांनीं शाळेंत जाण्याची आतां मला बंदी केली आहे. इतकेंही असून शाळेंत जाण्याचा माझा हट्ट मी चालवीत आहें. गेले दोन दिवस त्यांनीं मला उपाशी ठेवलं आहे. तरीही मी शाळेंत जात आहें. शेजारच्या मैत्रीणीच्या घरीं जाऊन हल्लीं मी जेवीत आहें. एक दोन दिवसांत मला घर सोडावं लागेल असं वाटत आहे. घरीं जर अन्नच मिळत नाहीं तर रहायचं कशासाठीं ? आईलादेखील माझी दया आली पण

नानासाहेबांचं अंतःकरण द्रवलं नाहीं. यापुढं मी काय करावं तें काकांना विचारून मला कळवावं. प्राण गेला तरी मी शाळा सोडणार नाहीं. माझ्या बरोबरच्या मुली शाळेंत जाऊन शिकत असतां हातातोंडाशीं आलेली परिक्षा बुडवणं मला दुःसह होतं आहे. निदान मॅट्रिक तरी झालें असतें म्हणजे मग मला कांहीं वाटलं नसतं. पण कॉलेजांत जाऊन बी. ए. व्हावं अशी माझी फार इच्छा आहे. तूं माझी काकू विलायतेला जाऊन मोठमोठ्या डिग्र्या घेऊन आलीस पण मी नुसती बी. ए. तर नाहींच पण मॅट्रिकसुद्धां होऊं नये, हें काय दुर्दैव ! असाच माझा कोंडमारा चालवला तर तुझी अवज्ञा करून मी तिकडे येणार आहें. "

पत्र बरेंच मोठें होतें पण त्यांत त्याच त्याच गोष्टींचा पुनः पुनः उल्लेख करून लीलेनें आपल्या मनावरचें ओझें दूर करण्याचा प्रयत्न केला होता.

तें पत्र मी काकांना आणि ताईनां दाखविलें. चंदूनें तें पत्र पाहिलें त्यावेळीं त्याच्या अंगाचा भडका झाला. तो म्हणाला " साऱ्या बापांचीच जात अशी कसाब आहे का ? या मथूचा बाप तो तसा आणि लीलेचा बाप हा असा. तुम्हाला कदाचित् राग येईल पण मी स्पष्ट सांगतों, कीं ह्या असल्या गोष्टी पाहिल्या कीं मला बाप नाहीं याचाच आनंद वाटतो. "

विषयांतर करण्याच्या उद्देशानें मी म्हटलें " मग आतां लीलेला काय लिहायचं ? तिला 'ये' असं म्हणायचा माझा अधिकार नाहीं. एकापरीनं मी तिला वडिलांच्या जागीं आहें खरी पण इथं ताई आहे तोंपर्यंत तो अधिकार मला गाजवतां येत नाहीं. लीलेनं काय करावं हें ताईनंच सांगितलेलं बरं. "

ताई म्हणाली " मला कशाला संकटांत घालतेस ? या आमच्या नानासाहेबांचा आधींच माझ्यावर राग. त्यांतून त्यांच्या मुलीला फोडून इकडे आणायला जर मी कारणीभूत झालें तर त्यांचा नुसता भडकाच होईल. त्यांच्यालेखीं, जशी लीला तशीच मी. ती जशी त्यांची मुलगी, तशी मी त्यांची पुतणी. त्यांतून पुतण्या असतें तर गोष्ट निराळी होती. मी पडलें बायको माणूस. मी यांत काय सांगूं ? माझ्या हातीं कसला अधिकार आहे ? "

" तुझं म्हणणं खरं आहे. " काका म्हणाले, " पण ही कुणा तिऱ्हाइताची मुलगी असती तरीदेखील मी तिला आश्रय दिला असता. कुणाचीसुद्धां पर्वा केली नसती. कायदासुद्धां जुमानला नसता. मला वाटतं, तिला अठरा वर्षं जवळ जवळ

पुरीं होत आलीं आहेत. तिला लिहूं, तोंपर्यंत धीर धरून रहा. जरूर वाटल्यास तोंपर्यंत शाळासुद्धां सोड म्हणावं. त्याची भरपाई करतां येईल. इथं घरीं तिला आम्ही शिकवूं. पण जोंपर्यंत ती अज्ञान आहे तोंपर्यंत आम्ही कितीही जोर दाखवला तरी तो लंगडाच पडणार. फिर्याद करून नानासाहेब तिला आमच्या कबजांतून घेऊन निघून जातील. ''

दुसऱ्याच दिवशीं मी त्याप्रमाणें लीलेला पत्र लिहिलें. तिचें जें उत्तर आलें तें वाचून मला त्यांतल्यात्यांत समाधान वाटलें. बापाचा जाच तिला दुःसह झाला होता खरा पण कायद्यामुळें आपण पराधीन आहों, हें तिला पटलें आणि म्हणूनच तिनें बापाची आज्ञा तूर्त तरी पाळण्याचें कबूल केलें.

तिला शाळा सोडावी लागली याबद्दल मला फार वाईट वाटलें. नानासाहेबांच्या या स्वभावाचा अर्थ तरी काय करावा हेंच मला समजेना. तिनें शाळेंत जाऊं नये असें त्यांनीं कां म्हणावें ? ती शाळेंत गेली असती, मॅट्रिक झाली असती, तर तिचें लग्न करणें त्यांना बरेंच सोपें गेलें असतें. मॅट्रिक झालेल्या मुली त्या काळांत फार थोड्या होत्या. अशा मुलींना निवडणें साहजिकच सोपें गेलें असतें. इतर कोणत्याही मुलीपेक्षां अगदीं सहजासहजीं फारच चांगलें स्थळ मिळालें असतें. ती जितकी शिकली होती तितकेंच शिक्षण तिला चांगलें स्थळ मिळण्यास जरी पुरेसें होतें, तरीही ती मॅट्रिक झाली असती तर तिला इतर कोणत्याही मुलीपेक्षां जास्त चांगलें स्थळ मिळालें असतें अशी त्यावेळची परिस्थिती होती.

असेच सुमारें दोन महिने गेले आणि एके दिवशीं एक चमत्कार घडला.

आधीं कांहींच न कळवितां सरूबाई अचानक येऊन दाखल झाली.

## प्रकरण नववें ::::::::::::::::::::::::::::::::::::::::::::::::::::: स्वातंत्र्य

सरुबाईनें आल्याबरोबर एकदम घराचा ताबा घेतला. ताबा घेतला म्हणायचें कारण असें, कीं जसें कांहीं पूर्वी कोणत्याच प्रकारचें भांडण झालें नाहीं असें दाखवून ती नित्यक्रमाला लागली.

तिच्या या वर्तनाचा मला तरी अंदाज आला नाहीं. काकांना किंवा ताईंना विचारावें म्हटलें तर उघडपणें विचारतां येत नव्हतें. चंदू देखील आश्चर्यचकित झाला होता.

मी घरांत आहें हें ती प्रत्यक्ष पहात होती. पुढें कांहीं तरी चकमक झडणार असें तिच्या एकंदर अवसानावरून वाटत होतें. ती मनाचा कांहीं तरी निश्चय करून आली असावी, कोणत्या प्रकारानें वागावें याचें तिनें धोरण ठरविलें असावें, असें तिच्या निर्धाराच्या मुद्रेवरून दिसत होतें. जेवणाची वेळ होतांच आम्ही सर्व हातपाय धुऊन ज्यावेळीं जेवणाच्या जागीं आलों त्यावेळीं पदर खोंचून सरुबाई पुढें आली आणि म्हणाली, “ ऐकलं का? मी आलें आहें आणि माझ्या घरांत भ्रष्टकार नको आहे, हें तुम्हाला माहीत आहे. माझ्या गैरहजेरींत जें काय झालं

असेल त्याचं निराकरण मी उद्यां करीन; पण मी साफ सांगून ठेवतें, कीं माझ्या नजरेसमोर मी हा भ्रष्टाकार चालूं देणार नाहीं. ”

तिचा तो आविर्भाव पाहून चंदू रागानें थरथर कापूं लागला. जेवणाचीं ताटें समोर वाढलीं असतां भांडणाचा प्रसंग येणार हें पाहून मला शरमल्यासारखें वाटलें. चंदू माघार घेणार नाहीं हें मला पूर्णपणें ठाऊक होतें आणि सरुबाईही माघार न घेण्याचा निश्चय करून आलेली आहे, हेंही तिच्या नजरेवरून दिसत होतें. काका नित्याप्रमाणें स्थितप्रज्ञ होते. ताई मात्र घाबरल्यासारखी दिसत होती.

चंदू माझ्याकडे वळून म्हणाला, “ मथू, बैस जेवायला. ”

माझ्या मनाचा निश्चय होईना. मी पाटावर बसायला गेलें आणि तिनें येऊन जर माझा हात धरला तर कुरुक्षेत्र माजणार, असें मला स्पष्ट दिसत होतें.

मी बसत नाहीं असें पाहून चंदू म्हणाला, “ माझा हुकूम आहे. या घरांत मालक मी आहें. माझीच सत्ता इथं चालली पाहिजे. माझ्या मताप्रमाणं ज्याला कुणाला वागायचं नसेल–मग काका असो किंवा ताई असो किंवा दुसरी कुणीही असो– त्यांनीं खुशाल इथून या क्षणीं निघून जावं. ”

सरुबाईची तयारी होतीच. अगदीं निर्भय मुद्रेनें ती म्हणाली, “ कुणाची जितकी इथं सत्ता असेल तितकीच माझीही आहे. मी म्हणतें, कीं बाडगीं माणसें माझ्या घरांत जेवायला नको आहेत. कुणाला कांहीं भ्रष्टाकार करायचे असतील ते त्यांनीं या घराबाहेर जाऊन करावेत. या घरांत अधर्म चालणार नाहीं, हें मी साफ सांगून ठेवतें. ”

चंदू रागानें थर थर कांपत होता. त्याच्या डोळ्यांतून नुसत्या ठिणग्या उडत होत्या. आम्ही समोर नसतों तर त्यानें कदाचित् सरुबाईच्या अंगावर हात टाकला असता.

चंदू मला उद्देशून म्हणाला, “ मुकाट्यानं पाटावर बैस. ”

मी स्वस्थ राहिलें. त्यासरशी तो माझ्या अंगावर खेंकसून मोठ्यानें ओरडला.

तरीही मी बसत नाहीं, असें पाहून तो काकांना उद्देशून म्हणाला, “ तुम्ही वडील माणूस आहां. तुम्हीच काय तें सांगा. तुम्ही हिच्या पंक्तीला बसतां आहां, ताई हिच्या पंक्तीला बसते आहे, तरी तुम्हांला तो अधर्म वाटत नाहीं. हिला आज वाटतो–तसाच पूर्वीही वाटत होता. मथू घरीं असेल तर मी त्या घरांत पाऊलसुद्धं

टाकणार नाहीं, अशी भीष्मप्रतिज्ञा करून ही इथून निघून गेली होती. मी तिला बोलवायला पाठवलं नव्हतं. आतां ती आली तर मी कांहींच बोललों नाहीं. मला वाटलं, कीं तिला पश्चाताप झाला असेल; पण तिनं हा वेगळाच आव आणला आहे. हा तत्त्वाचा प्रश्न आहे. इथं मी तसूभरही माघार घेणार नाहीं. ”

काका म्हणाले, “ यांत मी काय सांगणार ? प्रत्यक्ष माझी कृतीच साक्ष आहे. मथूला पंक्तीला घेणं म्हणजे मला भ्रष्टाकार वाटत नाहीं. या बाबतींत तुला जें वाटत असेल तें तूं खुशाल कर. माझ्या मताप्रमाणें कुणी वागावं, अशी आजपर्यंत मी कुणावरही सक्ति केली नाहीं आणि यापुढेंही करणार नाहीं. ”

सरुबाईला उद्देशून चंदू म्हणाला, “ ऐकलंस ? ही वडील माणसांची आज्ञा आहे असं मी म्हणत नाहीं; कारण काकांना तसं म्हणायचं नाहीं—पण माझ्या दृष्टीनं ती आज्ञा आहे. त्यांचीं मतं मला माहीत आहेत. तीं त्यांची नुसती मतं आहेत म्हणून नव्हे—पण मला तीं पटतात म्हणून मी तसा वागत आलों आहें. माझा समज आहे, कीं तुला कुणीतरी पढवून पाठवलं आहे. इथं येऊन आपली सत्ता गाजीव, अशी तुला भर दिलेली आहे. पण ती भर खोटी आहे. इथं प्रत्यक्ष तुझामाझा संबंध आहे. कुठल्याही दुसऱ्या माणसाला—मग प्रत्यक्ष ते काका कां असेनात—त्यांना देखील या बाबतींत हात घालतां येणार नाहीं. माझ्या मनाप्रमाणें वागायचं असेल तर ठीक, नाहींतर या क्षणीं आपल्या माहेरचा रस्ता सुधार, हें माझं शेवटचं सांगणं आहे. ” तो माझ्याकडे वळून म्हणाला, “ चल ! मथू, जेवायला बैस. जेवण थंड होतं आहे. ”

काका आणि ताई पाटावर बसलीं. चंदूही बसला. मी मागेंपुढें करीत होतें पण काकांनी मला डोळा घातला, तशी मीही जाऊन पाटावर बसलें.

वाघिणीसारखी चवताळून सरुबाई माझ्या अंगावर आली. तिनें एकदम येऊन माझ्या दंडाला हात घातला—त्या सरशींच चंदूच्या हाताचा फटका तिच्या हातावर बसला. तिचा हात सुटला पण तिनें पुनः माझा हात धरला, असें पाहतांच चंदूनें तिच्या दंडाला धरून लेटून तिला पुढल्याच खोलींत लोटलें आणि दाराला बाहेरून खीळ घातली.

आम्ही जेवायला बसलों. जेवायला सुरवात केली. पण अन्न घशाखालीं कसलें जातें ? सरुबाई आंतून मोठमोठ्यानें दार ठोठावित होती. ठोठावणें सारखें सुरू होतें;

तरी चंदू तें ध्यानीं घेईना. बिचारा भटजी देखील घाबरून थरथर कांपत होता. गड्याची पुढें जायची छातीच नव्हती.

आम्ही जेवणाचा फार्स चालविला होता असें म्हटलें तर तें जास्त सयुक्तिक होईल. कसेबसे दोन घांस खाऊन आम्ही जेवून उठलों. आंचवून हॉलमध्यें आलों त्यावेळीं चंदूनें जाऊन दाराची कडी काढली. सरूबाई जी बाहेर आली ती धांवतच हॉलमध्यें आली. तिच्या अंगांत वारें संचारल्यासारखें झालें होतें. तिनें एकदम येऊन हात धरून मला घराबाहेर लोटण्यास सुरवात केली. मी मुकाट्यानें बाहेर जात आहें, असें पाहून चंदू पुढें सरसावला आणि त्यानें बखोटीला धरून सरूबाईला मागें ओढलें.

त्या ओढण्यासरशीं ती खालीं पडली—खालीं पडली म्हणण्यापेक्षां तिनें मुद्दामच घालून घेतलें असें म्हटलें तर तें जास्त बरोबर होईल—आणि तिथूनच मोठ्यानें भोकांड पसरून तिनें रडायला सुरवात केली.

काय करावें हें मला कांहींच सुचेना. काका देखील अगदीं स्तंभित झाले होते.

पण ताईनें मात्र यावेळीं बरेंच जोराचें अवसान आणलें. सरूबाई पडली होती त्या जागीं जाऊन तिनें तिला बळेंच वर उठवून बसविलें. कांहीं केल्या ती उठून बसेना. जबरदस्तीनें उठवून बसविली तर पुन्हां जमिनीवर अंग टाकूं लागली. पण ताईनें निर्धारच केला होता. तिनें पुन्हा पडण्याचें अवसान आणलें तर ताई तिला पुन्हा उठवून बसवीत होती.

हा क्रम सारखाच सुरू होता. तें पाहून चंदू म्हणाला, “ खुशाल रडूं दे किंवा ओरडूं दे; मला मुळींच गय करायची नाहीं. मुळांतच हें बीज मला नाहींसं करून टाकलं पाहिजे. मथू आतां इथं राहणार हें ठरलेलंच आहे. तिला नोकरी लागली आहे आणि मी इथं असतां तिनं स्वतंत्र बिऱ्हाड करून रहावं हें मला केव्हांही पटणार नाहीं. जें कांहीं व्हायचं असेल तें याच घटकेला होऊन जाऊं दे. तिला इथं रहायचं असेल तर तिनं मथूच्या हाताखालीं वागलं पाहिजे. तसं वागायचं नसेल, तर याच क्षणीं खुशाल निघून जावं. माझी कांहींच हरकत नाहीं. ”

सरूबाई रडत रडत म्हणाली, “ मी कां जाईन ? चांगल्या देवाधर्माच्या साक्षीनं तुमच्याशीं लग्न लागलं आहे. तुम्ही हात धरून बाहेर काढलीत तरी देखील मी बाहेर जाणार नाहीं. अशी इथं फत्कल घेऊन बसेन. ही इथून बाहेर जाई—

पर्यंत तोंडांत पाणीसुद्धां घेणार नाहीं. असली तुमची शहामत तर काढा मला घरा-बाहेर ! " असें म्हणून ती फत्कल मारून बसली.

तिचें तें ध्यान पाहून रडावें कीं हसावें हेंच मला समजेना. तिला पढवून पाठविली होती हा चंदूचा अंदाज मला बरोबर पटला. मला नोकरी लागल्याची हकीकत मी लीलेच्या पत्रांत लिहिली होती आणि चंदूच्या घरींच मी राहणार हेंही तिला कळविलें होतें. सरुबाई पुण्यांतच असल्यामुळें ती बातमी तिच्या कानीं गेली असावी. कदाचित् खुद्द लीलेनेंच अभिमानानें ती तिला सांगितली असावी आणि त्यामुळेंच हा सर्व प्रकार घडून आला, अशी मला शंका आली.

आतां पुढें काय करावें या बाबतींत आम्हीं सर्वच हतबुद्ध होऊन गेलों होतों. चंदूनें तिला फरफटत ओढीत नेऊन पूर्वीच्याच खोलींत लोटलें आणि पुन्हा बाहेरून खीळ घातली.

तिनें मोठमोठ्यानें रडण्यास सुरवात केली. तें रडें अगदीं भयानक होतें. घरांतील कुणीतरी माणूस मेलें म्हणजे जितकें टाहो फोडून रडत असतात, तशीच ती रडत होती.

तो तिचा आरडाओरडा ऐकून शेजारच्या फ्लॅटमधली मंडळीही चौकशी करण्यासाठीं आली. त्यांना कांहीं तरी सांगून चंदूनें घालवून दिलें. तिला हिस्टेरियाची फीट आली आहे, असें चंदूनें ज्यावेळीं सांगितलें त्यावेळीं मला त्याच्या कल्पकतेबद्दल कौतुक वाटलें. मला वाटतें, शेजाऱ्यांनीं विचारल्यास काय सांगावें याचा त्यानें आधींच विचार करून ठेवला असावा—इतक्या झट्कन् त्यानें उत्तर दिलें होतें.

तसा तिथें आरडाओरडा चालला असतां आपण स्वस्थ बसून राहणें मला तर अगदीं चमत्कारिक वाटलें. काकासुद्धां अस्वस्थ झाले होते. भटजी ताटें वाढून येरझाऱ्या घालीत होता. त्याच्या अंगावर वस्कन् ओरडून चंदू म्हणाला, " जा, जेवून घ्या आणि गड्यालाही वाढा. ती जेवणार नाहीं हें दिसत नाहीं का तुम्हाला ? "

बिचारा भटजी मुकाट्यानें निघून गेला.

आम्ही स्वस्थ बसलों होतों आणि दार ठोठावणें व रडणें सारखें सुरू होतें. तें पाहून काका म्हणाले, " आतां काय करणार आहेस चंदू ? हें प्रकरण फार विकोपाला गेलेलं दिसतं. मला वाटतं आम्ही उद्यां सकाळींच निघून जावं हें बरं. जास्त

चिडीवर प्रकरण नेणं चांगलं नाहीं. उगीच चार चौघांत बभ्रा व्हायचा. मथूला देखील माझं तेंच सांगणं आहे. तिनं सध्यां त्या वुइमेन्स होममधें रहावं आणि नंतर वाटल्यास स्वतंत्र बिऱ्हाड करावं. तुमच्या संसारांत तिनं बिब्बा घातला, असा लोकप्रवाद व्हायला नको. ”

चंदू चिडून म्हणाला, “ हा तुमचा हुकूम आहे का ? ”

त्या तशा परिस्थितींतही काकांच्या चेहऱ्यावर हंसूं झळकलें. ते म्हणाले, “ मी कधींच तुला हुकूम केला नाहीं आणि आजही करणार नाहीं. ही नुसती माझी सल्ला आहे. पटली तर ऐक, नाहींतर सोडून दे. पण मथूच्या बाबतींत तसं नाहीं. तिला मात्र मी हुकूम करतों. ”

क्षणभर सर्वच स्तब्ध राहिले. कुणीच कांहीं बोलत नाहीं असें पाहून मी म्हटलें, “ मला वाटतं, मी आतांच होममधें जावं हें बरं. तिथल्या सुपरिन्टेन्डंट-बाई माझ्या परिचयाच्या आहेत. या रात्रीच्या वेळीं देखील त्या माझी सहज सोय करतील. ”

चंदू आवेशानें म्हणाला, “ नाहीं ! मी तुला जाऊं देणार नाहीं. ते हुकूम करीत नसले तरी मी हुकूम करतों आहें. हा माझ्या अब्रूचा प्रश्न आहे. माझ्या साऱ्या पुढल्या भवितव्याचा प्रश्न आहे. या वेळीं मी माघार घेतली तर माझं सारं आयुष्य पुढं दुःखांत जाईल, हें मला ढळढळीत दिसतं आहे. आजच्या आज या गोष्टीचा काय तो सोक्षमोक्ष झाला पाहिजे. ” असें म्हणून त्यानें जाऊन दाराची कडी काढली आणि सरुबाईच्या दंडाला धरून तिला फरफटत हॉलमध्यें आणलें.

तिला काकांच्या समोर उभें करून तो म्हणाला, “ तुला काय सांगायचं असेल तें यांना सांग. ते माझे बंधू नव्हत–वडील आहेत. त्यांनीं मला लहानांचं मोठं केलं आहे आणि ते जसा हुकूम करतील तसाच मी वागत आलों आहें आणि यापुढंही वागत जाणार. मी जशी त्यांची आज्ञा पाळतों, त्याचप्रमाणें तुलाही पाळली पाहिजे. आतां तुम्हीच हिला काय तें सांगा. ” असें काकांना सांगून त्यानें तिचा हात सोडला.

काका क्षणभर स्वस्थ राहिले. सरुबाईचें रडणें थांबलें होतें. ताई अगदीं एका बाजूला जाऊन कोंपऱ्यांतल्या एका खुर्चीवर बसली होती. काका अगदीं धीरगंभीर

वृत्तीनें म्हणाले, " सरु, माझं ऐक. जसे तुझे वडील तसाच मी. या घरांत तुला बापाच्या जागीं मीच आहें-आईच्या जागींही आहें आणि बहिणीच्या जागीं मथू आहे, असं समज. हीं नातीं कायमची जडलीं आहेत. तीं आतां तोडलीं जाणार नाहींत. तूं कितीही हट्ट केलास तरी चंदू माघार घेणार नाहीं. तुला भरीला घालणारे लोक मूर्ख आहेत. त्यांना आमची वृत्ति माहीत नाहीं. आम्ही सारीं माणसं मोठीं करारी आहोंत. प्राण गेला तरी दांतीं धरलेली गोष्ट सोडणार नाहीं, असा आम्हां सर्वत्रांचा बाणा आहे. हा त्रागा करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. सारं आयुष्य अजून तुझ्या पुढं आहे. तें आयुष्य आनंदानं नसलं तरी समाधानानं घालवलं पाहिजे हें तुला कळत नाहीं, असं मी केव्हांच म्हणणार नाहीं. त्रागा करून तें सुख तुला लाभणार नाहीं. चंदूचा अगदीं निश्चय झाला आहे. यावर तूं काय करणार आहेस तें विचार करून मला उद्यां सांग. आतां कांहींच उत्तर देऊं नकोस—"

" मी आतांच उत्तर देणार!" सरूबाई म्हणाली, " तुम्ही माझ्या वडिलांच्या जागीं आहांत ना? मग मी माझ्या बाबांकडे जसं बोलतें तसंच तुमच्याशीं बोलणार. मीही करारीच आहें. पण माझा करारीपणा ज्या कारणासाठीं आहे, तें कारण मात्र निराळें आहे. तुम्हांला तुमचीं मतं जशीं गाजवयाचीं आहेत, तशींच माझींही मतं मला आवडतीं आहेत. प्राण गेला तरी मी माघार घेणार नाहीं. मला सर्व हकीकती कळल्या आहेत. यांना ही इथं कां हवी आहे, तेंही मला माहीत आहे—"

" खबरदार फाजील बोलशील तर!" चंदू कडाडला, " जीभ लांब झाली तर ती उखडून काढीन. काकांची देखील पर्वा ठेवणार नाहीं!"

" मग काढाच ती उखडून!" असें म्हणून जीभ बाहेर काढून ती त्याच्यासमोर उभी राहिली.

दुसऱ्या कुणाच्या घरीं हा प्रकार झाला असता तर मला हंसूंच कोसळलें असतें, इतकें तिचें अवसान मूर्खपणाचें होतें!—पण एकंदरींत ही समस्या बिकट होती यांत संशय नाहीं.

चंदू कांहींतरी अविचार करील अशी मला भीति वाटूं लागली. पण तो मोठमोठ्यानें हंसला हें पाहून माझा जीव थोडा खालीं पडला.

तो म्हणाला, " असलं अवसान आणल्यानं मी घाबरून जाईन असं मुळींच

समजूं नकोस. तुला घरांतून बाहेर काढायला कायद्याचा आधार घ्यावा लागला तरी देखील मी माघार घेणार नाहीं, हें पक्कं ध्यानांत ठेव. "

" आणि मीही कायद्याचा आधार घेईन ! " सरूबाई म्हणाली, " माझ्याही वडिलांना कायदा माहीत आहे. तुमच्या साऱ्या हकिगती नानासाहेबानीं मला सांगितल्या आहेत—"

माझ्या डोक्यांत चक्क प्रकाश पडला.

ती पुढें म्हणाली, " नानासाहेबांनीं सर्व कांहीं माझ्या बाबांना सांगितलं आहे. मी माहेरीं निघून गेलें म्हणजे तुम्हांला हिच्याशीं पुनर्विवाह करायचा आहे, हें नानासाहेबांच्या सांगण्यावरूनच मला उलगडलं—"

चंदूचा राग भडकणार असें पाहून काका म्हणाले, " सरु, इकडे ये. अशी माझ्यासमोर या खुर्चीवर बैस—"

रागारागानें येऊन ती खुर्चीवर फत्कल मारून बसली.

काका म्हणाले, " नानासाहेबांचं आणि मथूचं नातं कोणत्या प्रकारचं आहे हें तुला माहीत नाहीं. माझ्यावर तुझा विश्वास असेल, तर मी सर्व हकीकत सांगतों. तुझी ऐकायची तयारी आहे का ? "

सरुबाई म्हणाली, " तुम्हीं कांहीं सांगितलं तरी तें मला खरं वाटायचं नाहीं. नानासाहेब दुष्ट माणूस असेल, अगदीं अधम असेल, राक्षस असेल, इतर बाबतींत तो वाटेल तितका खोटं बोलणारा असेल, पण त्यांचं सांगणं मला पटतं आहे. मला तें खरं वाटतं आहे. यांचा स्वभाव मला ठाऊक आहे. यांचीं मतंही मला ठाऊक आहेत—यांच्याच तोंडानं मला कळलीं आहेत. ज्या दिवशीं ही बया विलायतेहून आली त्याच दिवशीं यांनीं काय तारे तोडायचे ते तोडले आहेत. तें तुम्हांला माहीत नाहीं—"

" होय चंदू ? " काकानीं चंदूला विचारलें, " तूं हिला काय सांगितलंस ? "

चंदूनें मान खालीं घातली. त्याच्या तोंडून शब्द निघेना. तो अविचारानें भलतेंच कांहीं बोलून गेला असावा असें मलाही वाटलें. मी आलें त्या दिवशीं दोघांचें भांडण झालें असावें अशी मला शंका आली होती; पण त्या भांडणांत त्यानें असा भलताच अविचार केला असेल असें मला वाटलें नव्हतें.

काका म्हणाले, " समजलों. ही तुझीच चूक आहे. तुझ्या चुकीचं प्रायःश्चित तुला भोगल्यावांचून गत्यंतर नाहीं. आतां हिची समजूत घालणं माझ्या आटोक्यांत राहिलं नाहीं. "

चंदू मट्कन् खुर्चीवर खालीं बसला आणि दोन्ही हातांनीं त्यानें तोंड झांकून घेतलें.

सरुबाई म्हणाली, " नानासाहेब जर चांडाळ तर मग यांना काय म्हणायचं ? तुम्हीं सांगत नसाल, तर मी सांगतें ऐका. यांनीं अगदीं उघड उघड मला सांगितलं, कीं मी हिच्याशीं पुनर्विवाह करणार होतों पण तीच कबूल झाली नाहीं. "

सर्वत्र स्तब्धता झाली. कुणीच कांहीं बोलेना.

चंदूनें कपडे घातले आणि बाहेरचा रस्ता सुधारला. सरुबाई खोलींत जाऊन दाराला आंतून खीळ घालून बसली. आम्हीं कितीतरी वेळ एकमेकांच्या तोंडाकडे पहात स्वस्थ बसलों होतों.

रात्रीचे बारा वाजले तरी चंदू आला नाहीं. मला भीति वाटूं लागली.

साडेबारांच्या सुमाराला तो परत आला आणि कपडे काढून कांहीं न बोलतां एका कोचावर आडवा झाला.

तो आला असें पाहून आमच्या जिवांत जीव आला. आम्हीही दिवे मालवून झोंपी गेलों.

## प्रकरण दहावें ........................................ खळबळ

दुसऱ्या दिवशीं सकाळीं आम्हीं उठलों तरीही सरुबाईनें खोली उघडली नव्हती. कांहींच झालें नाहीं अशी कल्पना करून सर्वांचे सर्व व्यवहार चालले होते.

चहा घेऊन भटजीनीं दार ठोठावलें पण आंतून उत्तर येईना. ते नुसते ताईकडे पहात उभे राहिले. ताईनें दार उघडण्यास पुनः पुनः सांगितलें पण आंतून कांहींच उत्तर आलें नाहीं.

मी घाबरून गेलें. कदाचित् तिनें कांहीं तरी भलताच प्रकार तर केला नसेल, अशी शंका मनांत आली. मी ताईकडे पाहिलें आणि माझ्या त्या पाहण्याचा आशय तिच्या ध्यानीं आला.

ताई पुनः पुनः दार ठोठावूं लागली त्या वेळीं चंदू म्हणाला, " मरूं दे तिला ! कशाला दार ठोठावतेस ? "

कांहीं उत्तर न देतां ताईनें हाका मारणें आणि दार ठोठावणें सारखें सुरू ठेवलें होतें.

शेवटीं एकदांची तिला वाचा फुटली. सरुबाई तिच्यावर ओरडून म्हणाली, "कांहीं

मी मेलें नाहीं. एवढं घाबरायला नको. चांगली जिवंत आहें आणि जागीही आहें—पण एकदांच सांगून ठेवतें, कीं ती बया असेपर्यंत मी बाहेर येणार नाहीं."

ताई अगदीं काकुळतीनें म्हणाली, "हें बरं नव्हे. सरुबाई, किती वेळ अशी आतां बसून राहशील? कांहीं हातपाय धूणं, तोंड धूणं आहे कीं नाहीं? नित्याचे व्यवहार नकोत का व्हायला? असं काय करावं तें! दार उघड पाहूं."

पुन्हा उत्तर यायचें बंद झालें. ताई सारखी काकुळतवाणीनें बोलत होती. चंदू तिला दरडावितच होता. काका मात्र हॉलमधें अगदीं स्वस्थ बसले होते.

मी हॉलमधें आलें आणि काकांना उद्देशून म्हणालें, "हें असं किती वेळ चालणार? माझ्यानं कांहीं हें पाहवत नाहीं. तुम्हाला रहायचं असेल तर तुम्ही रहा. मी जायचं ठरवलं आहे."

काका म्हणाले, "तेंच तुला मी सांगणार होतों. ती अगदीं हट्टाला पेटली आहे. तूं ठरवलास तोच विचार बरोबर आहे!"

मी हळूच गड्याला खूण केली आणि पाऊलसुद्धां न वाजवितां मुकाट्यानें जिन्या-खालीं उतरलें.

वुइमेन्स होममधल्या बाईंनीं मोठ्या प्रेमानें माझें स्वागत केलें. मी आलें ती अगदीं बाहेर गांवाहून आल्यासारखीच आलें, त्यामुळें चंदूच्या घरीं झालेल्या प्रकाराबद्दल त्यांना कांहीं शंका आली नाहीं. माझी व्यवस्था झाल्याचें मी जातांना गड्याला सांगितलें.

त्या दिवशीं मी माझ्या नोकरीवर रुजू झालें. शाळेंत शिकवीत असतां माझें चित्त ठिकाणावर नव्हतें. तो पहिलाच दिवस असल्यामुळें असें चित्त व्यग्र ठेवणें इष्ट नव्हतें, हें हळुहळू माझ्या ध्यानीं आलें. मनाचा धडा करून मी माझ्या कार्याला प्रवर्तलें. हेड मिस्ट्रेस या नात्यानें मला शिकवण्याचे तास फार थोडे होते. इतर ऑफिस वर्क्चा बोजा बराचसा होता. त्यांत मन घातल्यामुळें झाल्या गोष्टी विसरणें मला कठीण गेलें नाहीं.

स्मिथबाई मधल्या सुट्टींत येऊन मला भेटून गेल्या. त्यांनीं माझ्या कामाची मला संगतवार माहिती करून दिली. शिक्षकिणीचें काम मी यापूर्वी केलें नव्हतें आणि ऑफिस वर्क्ची तर मला मुळींच कल्पना नव्हती.

स्वतः विद्यार्थीदशेंत असल्यामुळें शिक्षणाच्या कामाची कल्पना करणें मला अशक्य झालें नाहीं. पण ऑफिस वर्कमध्यें बुद्धिःपुरस्सर मन घालणें भाग पडलें. माझ्या पूर्वीच्या बाई ब-याच दिवसापूर्वी नोकरी सोडून गेल्या असल्यामुळें बराच पत्रव्यवहार शिल्लक होता. त्याचा निकाल लावणें हें पहिलें काम होतें. तें काम करीत कसतां आपोआपच झाल्या प्रकाराची विस्मृती पडली.

शाळा सुटण्यापूर्वी शेवटचा एक तास मला घ्यावयाचा होता, तो घेऊन मी होममध्यें आलें

घराचा आसरा मिळतांच पुन्हा साऱ्या गोष्टी समोर उभ्या राहिल्या. सारें चित्त चंदूच्या घराकडे ओढ घेत होतें. मी गेल्यानंतर चंदूनें काय केलें असेल, सरुबाई बाहेर आली असेल कीं नाहीं, काका आहेत कीं ताईला घेऊन निघून गेले वगैरे गोष्टी जाणण्याची मला तळमळ लागली होती.

एकदां वाटलें, कीं स्वतःच जाऊन पाहून यावें; पण झाल्या प्रकारामुळें तसें करणें मला इष्ट वाटलें नाहीं. पुन्हां तसाच कांहीं तरी प्रकार व्हायचा आणि पुन्हां कुरुक्षेत्र माजायचें, तें मला नको होतें.

मी विचार करीत बसलें होतें. इतक्यांत शिपायानें मला चंदू आल्याची वर्दी दिली. होमच्या नियमांप्रमाणें पुरुषांच्या गांठीभेटी होममध्यें घेणें अशक्य होतें म्हणून मी बाहेर आलें.

चंदूला तें माहीत होतें. तो म्हणाला, " जरा बाहेर येतेस का? मला पुष्कळ बोलायचं आहे. कुठं तरी बाहेर जाऊन आधीं बोलून घेऊं. "

मी विचारलें, " काका आणि ताई कुठं आहेत ? काय करताहेत ? "

चंदू म्हणाला, " तीं घरींच आहेत, कुठं गेलीं नाहींत. तूं गेल्यानंतर सर्व कांहीं स्थिरस्थावर झालं आहे. सर्व कांहीं सुरळीत चाललं आहे. तिनं आपला डाव साधला आणि तुला बाहेर घालवलं. पण यांत माझा पराजय झाला आहे. काकांचं समाधान झालं आहे खरं—पण माझा जीव आंतून पेटतो आहे. चल आपण बाहेर जाऊन बोलूं. "

मी बाईंना सांगून बाहेर निघालें. कुठें जाऊन बोलावें याची मला कल्पना नव्हती. चंदू म्हणाला, " आपण अपोलो बंदरवर जाऊं. तिथं आपल्याला बोलायला अडथळा होणार नाहीं. "

गाडी करून आम्ही अपोलो बंदरवर आलों. गाडींत कांहींच बोलणें झालें नाहीं. कठड्यावर बसतांच चंदू म्हणाला, " आतां अगदीं प्रांजलपणानें सांग. मी अगदीं हतबुद्ध झालों आहे. मस्तक भडकून गेल्यामुळं काय करावं हें मला कांहींच सुचत नाहीं. तूं जसं सांगशील तसं मी ऐकेन. तुझा एक शब्दही मोडणार नाहीं, असं मी तुला आश्वासन देतों. "

माझ्यावर मोठीच जबाबदारी पडली. मी म्हटलें, " या बाबतींत काकांचं मत काय आहे ? "

" या बाबतींत काका हात धुऊन मोकळे झाले आहेत." चंदू म्हणाला, " तुझं तूं काय वाटेल तें कर, असं त्यांनीं अगदीं स्पष्ट सांगितलं. "

मी कांहीं वेळ स्तब्ध राहिलें. पुष्कळ वेळ मी मनाशीं विचार करून पाहिला. या कामीं त्रागा करणें इष्ट नाहीं, असेंच माझ्या मनोदेवतेनें मला सांगितलें.

मी म्हटलें, " ऐक चंदू, तूं सारा भार माझ्यावर टाकला आहेस तेव्हां तुला तात्पुरतं बरं वाटावं म्हणून मी तोंडदेखलं बोलणार नाहीं. मला हें पूर्वीच वाटलं होतं आणि म्हणूनच मी स्वतंत्र बिऱ्हाड करून रहावं, असा विचार केला होता. या क्षणींही मला तसंच वाटत आहे. तूर्त कांहीं दिवस मी होममधें राहणार आहें. तोपर्यंत कसं काय होतं तें पाहूं आणि मग बिऱ्हाड करायचं ठरवूं. "

चंदू बराच वेळ स्तब्ध राहिला. त्याचा चेहरा अगदीं उतरला होता. मी असेंच कांहीं तरी सांगणार याची त्याला कल्पना होती. पण कांहीं तरी करून माझें मन वळवावें या उद्देशानें तो आला असावा आणि त्या कामीं आपणाला यश येणार नाहीं असें माझ्या उत्तरानें त्याला वाटलें असावें, असें त्याच्या मुद्रेवरून दिसून आलें.

कांहीं वेळानें तो म्हणाला, " तूं होममधें राहण्यापेक्षां स्वतंत्र बिऱ्हाड करशील तर बरं, असं मला वाटतं. होममधें राहिल्यानं मला तुझी भेट घेतां येणार नाहीं. रोज असं येऊन तुला घेऊन जाणं हेंही बरं नाहीं–किंवा संकेतानं कुठं तरी येऊन भेटणं, हेंही योग्य होणार नाहीं. तूं आतां मास्तरीण झाली आहेस. तुझ्या विद्यार्थिनी चोहोंकडे फिरत असणार. त्यांची तुझ्यावर नजर असणार आणि तूं कुणा तरी परक्या माणसाशीं नित्यनियमानं येऊन बोलत बसत असतेस असं त्यांनीं पाहिलं, तर ती चर्चा सर्वतोमुखी झाल्यावांचून राहणार नाहीं. मला हेंच मोठं संकट आहे. त्यापेक्षां तूं बिऱ्हाड केलंस तर उजळ माथ्यानं येऊन मला तुला भेटतां तरी येईल.–"

"" तेंच मला नको आहे," मी म्हटलें, ""कांहीं दिवस तरी आपण एकमेकांना न भेटलेलंच बरं. भेटून तरी काय होणार ? भेटण्याचा जो उगाच बभ्रा होईल त्याचा परिणाम तुझ्या गृहस्थितीवर झाल्याशिवाय राहणार नाहीं. सरुबाई सदोदीत तुझ्यावर पाळथ ठेवणार, तशीच माझ्यावरही पाळथ ठेवणार. सहज भेटी होतील खऱ्या, पण त्याचा परिणाम मात्र भयंकर होईल—"

माझें बोलणें चंदूला पटलें नाहीं, असें मला दिसून आलें. तोंड वाकडें करून तो उगीच राहिला असें पाहून मी म्हटलें, " ही चूक तुझी आहे. मुलीची चांगली चौकशी केल्याशिवाय लग्न केलंस ही चूक झाली–नव्हे तो मोठा अविचार झाला. सबंध आयुष्याच्या या गोष्टी आहेत. या बाबतींत असा नुसता त्रागा करून चालत नाहीं. परिस्थितीवर राग करून, जी आली ती मुलगी पसंत केल्याचं तूं सांगितलंस त्याचेच हे परिणाम आहेत. त्या चुकीबद्दल तुझ्याखेरीज दुसरा कुणीही जबाबदार नाहीं. या आततायीपणाचीं फळं तुला भोगलींच पाहिजेत–" बोलावें कीं न बोलावें असा क्षणभर जरी माझ्या मनांत विचार आला तरी मनांत आलेलें किल्मिश अगदीं बाहेर जाऊं दिलेलें बरें, असा विचार करून मी पुढें म्हटलें, " दुसरी चूक मी आलें त्या दिवसाची. काय जरूरी होती तसं बोलायची ? तिनं आततायीपणा केला, म्हणून मागल्या काळांतली भलतीच गोष्ट तूं भलत्याच प्रकारें तिच्यासमोर उच्चारून गेलास ! या पेक्षां दुसरा मोठा अविचार नाहीं. तिनं कां चिडूं नये ? अगदीं उघड उघड तूं तसं बोलून टाकल्यावर तिला कां मत्सर वाटूं नये ? नानासाहेबांचा दुजोरा मिळाला ही नंतरची गोष्ट आहे–पण आधीं तूं जर तसं बोलला नसतास तर नानासाहेबांच्या बोलण्याचा विशेष परिणाम झाला नसता. तुला नाहीं असं वाटत ? "

एक दीर्घ निश्वास सोडून तो म्हणाला, " असं कांहीं झालं खरं. कसा मी बोलून गेलों, याचं माझं मलाच आश्चर्य वाटतं. कुठली मला दुर्बुद्धि झाली, असं आतां मला वाटूं लागलं आहे ! पण आतां वाईट वाटून काय उपयोग ? हातचा बाण निघून गेला आहे. त्याची फळं मला भोगलींच पाहिजेत."

मी म्हटलें, " आतां हा विषय सध्यां एवढ्यावरच सोडून देऊं. तूं आपल्या प्रपंचाला लाग. मी माझा प्रपंच पाहतें. मुद्दाम होऊन माझी केव्हांही चौकशी करूं नकोस. माझा पत्ता बदलला गेला तर वेळोवेळीं मी तुला कळवीत जाईन. मुद्दाम

होऊन तूं चौकशी करायला केव्हांही येऊं नकोस. तुझ्या येण्याची जरूरी वाटली तर मी तुला पत्र पाठवून मुद्दाम बोलावून घेईन. तोंपर्यंत मी सुखरूप आहें, असेंच समजत जा. ”

त्यानंतर तो कांहींच बोलला नाहीं. कांहीं वेळ धक्क्यावर बसून नंतर एक गाडी करून आम्हीं निघालों. त्यानें मला होममधें सोडलें आणि नंतर तो आपल्या घरीं निघून गेला.

मी दुसऱ्या दिवसापासून माझ्या नित्य कार्यक्रमाला प्रारंभ केला.

## प्रकरण अकरावें ........................ बिचारी लीला

दुसऱ्याच दिवशीं ताई मला भेटायला आली. चंदूनें सांगितल्यामुळें काका आले नाहींत. पुरुषांच्या भेटी घ्यायला आमच्या होममधें बंदी होती.

ताई एकदोन दिवसांत निघून जाणार होती. मी निघून आल्यानंतर सर्व कांहीं सुरळीत व्यवहार सुरू झाला होता. सुरळीत म्हणजे एवढेंच, कीं भांडणें होत नव्हतीं. सरुबाई 'शांत' करायची गोष्ट बोलत होती, तरी त्या वेळेपर्यंत तिनें तसा कांहीं विधी किंवा होमहवन मुद्दाम होऊन करण्याचा प्रयत्न केला नाहीं. कदाचित् काका आणि ताई निघून गेल्यानंतर ती तसा कांहीं तरी विधी आपल्याच जबाबदारीवर करील, असा ताईचा समज होता.

ताई म्हणाली, "मी एकदोन दिवसांत कोकणांत जाणार. त्याप्रमाणं तुला भेटायला कदाचित् तुझ्या शाळेंत येणं होईल. सर्वच प्रकार असे कांहीं चमत्कारिक झाले आहेत, कीं कुणाचंच मन मोकळं राहिलं नाहीं. चंदूनं फार मोठा अविचार केला. जी गोष्ट त्याच्या पलीकडे दुसऱ्या कुणाला माहीत नव्हती, तिचा आपल्या बायकोसमोर उच्चार करून त्यानं भलत्या बातमीला तोंड फोडून दिलं आहे. त्याचा

परिणाम आतां त्याला भोगावा लागणार. माझी खात्री आहे, कीं ती सर्वत्र ही हकीकत सांगत सुटणार आणि त्यामुळं तुम्हां दोघांमधील अंतर हळुहळू दुरावत जाणार. तसं झालं तर मला बरंच वाटेल. लोकापवाद मोठा कठीण आहे. मनाचा निर्मळपणा कुणी पहात नाहीं. जो तो आपापल्या मताप्रमाणें जगाकडे पहात असतो. पाप सर्वांच्या नजरेला आधी येतं. जिथं नाहीं तिथून पाप हुडकून काढण्याची लोकांची प्रवृत्ति असते–इथं तर प्रत्यक्ष तुझ्या शब्दाचाच आधार. तुझ्या म्हणण्यापेक्षां चंदूचा शब्दच म्हटला तर जास्त बरोबर होईल. बायकोनं बातमी पिकवली आणि त्यामुळं लोकांनीं कांहीं विचारलं, तर तें धुडकावणं चंदूला कठीण जाईल. होय म्हणतां यायचं नाहीं किंवा नाहीं म्हणतां यायचं नाहीं. त्यानं आपण होऊन आपली अडचण करून घेतली आहे. त्याचा संसार सुखाचा होणार नाहीं, हें तर मला उघड उघड दिसतं आहे. पण झाल्या गोष्टीला आतां काय करणार ? आल्या प्रसंगाला मान वांकवण्याखेरीज आतां गत्यंतर नाहीं. ”

मी तरी याच्यावर काय बोलणार होतें ? चंदूला मी जें सांगितलें होतें तें हेंच होतें. माझ्याशीं काय भाषण झालें तें चंदूनें ताईला सांगितलें नव्हतें. मी त्या दिवशींच्या भाषणाची सर्व हकीकत ताईला सांगितली, तेव्हां तिलाही आनंद झाला. ती तेवढ्याचसाठीं मुद्दाम आली होती. चंदूनें आणि मी यापुढें एकमेकांना भेटूं नये, अशीच तिची इच्छा होती. पण मी आधींच ती व्यवस्था केल्याचें पाहून तिला मनःपूर्वक आनंद झाला.

सुपरिन्टेन्डंट बाईंची आणि ताईची मी ओळख करून दिली. होमची सर्व व्यवस्था तिनें पाहिली. बाईंनीं तिला त्या दिवशीं जेवायला राहण्याचा आग्रह केला आणि मीही त्याला दुजोरा दिला. माझें जेवण वगैरेंची व्यवस्था कशी आहे याची त्यामुळें तिला कल्पना यावी, एवढाच माझ्याप्रमाणें बाईंचाही उद्देश होता.

जेवणखाण झाल्यानंतर ताई निघून गेली. ती रात्र मी सारखी विचारांत घालविली. कांहीं केल्या मला झोंपच येत नव्हती. मस्तक कसें भणाणून गेलें होतें. चंदूनें अविचारानें काढलेल्या उद्गाराबद्दल मला अतिशय उद्वेग उत्पन्न झाला होता. पूर्वीचें नातें ध्यानीं ठेवण्याइतका प्रामाणिकपणा जर माझ्या अंगीं नसता तर यापुढें मी त्याचें तोंडसुद्धां पाहिलें नसतें, इतकी त्यावेळीं मला त्याची चीड आली होती. भावनेला बळी पडून त्यानें मला कांहीं तरी विचारलें; पण तें विचारल्यामुळें माझ्यावर

केवढा भयंकर आघात झाला, हें प्रत्यक्ष पाहिलें असतां त्यानें आपल्या बायकोजवळ या गोष्टीचा उल्लेख करावा, याचें मला फारच वाईट वाटलें. माझी वृत्ति संसारी नव्हती, हें त्याला पूर्णपणें माहीत होतें. समाजसेवेसाठीं आपलें आयुष्य सर्वस्वी वहायची माझी प्रतिज्ञा त्याला माहीत होती. भावनेलाच बळी पडून त्यानें आपल्या बायकोसमोर उद्गार काढले, ही त्याची भावनात्मकता त्याला जन्माचा दुःखी करायला कारणीभूत झाली होती, असाच माझा समज झाला. दुसरें कोणतेंही नातें त्याला लावतां आलें नसतें का ? ती माझी मानीव बहीण आहे, असें म्हटलें असतें तरी देखील त्याला हवा होता तो परिणाम करून घेतां आला असता. शिवाय ताईचें आणि माझें नातें होतेंच. नुसत्या नात्याचा उल्लेख देखील पुरेसा झाला असता, असें असतां त्या एका विवक्षित गोष्टीचा त्यानें सरूबाईसमोर उल्लेख करावा, याला मूर्खपणाखेरीज दुसरें कांहीं नांव द्यावें असें मला वाटेना.

कुठेंही दैव मला सुखासमाधानानें राहूं देत नाहीं का ? विलायतेंतील दिवसच काय ते सुखांत गेले, असेंच म्हणणें भाग होतें. तिथें हे उपद्व्याप तरी नव्हते. धर्माधर्माचा प्रश्न तिथें कुणी काढीत नव्हता. माणुसकीच्या व्यवहारावर सर्व कांहीं व्यापार चालला होता. मी कोण आहें, पुढें काय करणार आहें, याची चौकशी कुणीच करीत नव्हता. एक विद्यार्थी या नात्यानें मी आलें आहें आणि विशेष प्रकारचा अभ्यासक्रम संपवून मी परत हिंदुस्थानांत जाणार आहें, एवढेंच प्रत्येक जण पहात होता. तो माझा अभ्यासक्रम सर्वांगीण व्हावा म्हणून अभ्यासक्रमाबाहेरील गोष्टी मला प्रत्येक जण कळकळीनें दाखवून देत होता. माझ्या मैत्रिणींच्या कुटुंबांतून मी वावरत होतें. त्यांच्याबरोबर नाटकें आणि नाच पाहायला जात होतें. निरनिराळीं पाहण्याजोगी स्थळें पाहतांना त्या माझ्या मैत्रिणी आपल्या घरची सर्व मंडळी बरोबर घेत होत्या. प्रत्येक गोष्ट प्रत्यक्ष रीतीनें दाखवून देण्याच्या कामीं त्या माझ्या मैत्रिणींच्या भावांचा, वडिलांचा किंवा नवऱ्यांचा मला पदोपदीं उपयोग होत होता. तिथें ही इथल्यासारखी टवाळी कुणी केली नाहीं.

हिंदुस्थानांतून जाणाऱ्या विद्यार्थ्यांबद्दल इंग्लंडांतील समाजांत सर्वस्वी चांगलें मत नसतें. अभ्यासक्रमाकडे पूर्ण लक्ष पुरवून इतर गोष्टींकडे दुर्लक्ष करणारे कांहीं विद्यार्थी होते. ते नुसते आपल्या कॉलेजांत येत असत, घरीं अभ्यास करीत असत, परिक्षा पास होत असत आणि नंतर मातृभूमीला फिरून जात असत.

विद्यार्थ्यांचा दुसरा एक प्रकार होता. त्यांची राहणी निराळ्या प्रकारची होती. कॉलेजच्या अभ्यासक्रमाबाहेर सामाजिक आणि राजकीय वातावरणांतली माहिती करून घेण्याकडे त्यांचा कल असे. निरनिराळ्या समाजांतून मिसळायचें, निरनिराळ्या सभांना हजर रहायचें, पार्लमेंट कसें चालतें तें पहायचें वगैरे गोष्टींकडे त्यांचें लक्ष असे. त्यामुळें हिंदुस्थानांत जायला निघायच्या वेळीं बहुश्रुतता संपादन करून ते हिंदुस्थानच्या भूमीवर पाय ठेवीत असत.

तिसऱ्या प्रकारचे जे होते त्यांची संख्या थोडीशी जास्त होती. अभ्यासक्रमाच्या बाहेर चैनी करण्याकडे त्यांचें लक्ष जास्त असे. हे विद्यार्थी बहुतेक सुखवस्तु घराण्यांतले असत. पत्र पाठवलें किंवा तार केली, कीं तारेनें पैसे येण्याइतकी त्यांची गृहस्थिती असे. अशा विद्यार्थ्यांचें लक्ष आपल्या अभ्यासाकडे बहुधा कमीच असे. नाटकें तमाशे पाहणें, बाहेर गांवच्या ट्रिप्स काढणें, अशा वेळीं जातांना बरोबर उनाड मुली गोळा करून घेऊन जाणें, याच्याकडे त्यांचें लक्ष विशेष असे.

प्रत्येक समाजांत बऱ्याबरोबर वाईटही असतेंच. स्वातंत्र्य जास्त असल्यामुळें तिकडे चांगल्याबरोबर वाईटाचाही फैलाव होणें स्वाभाविक होतें. स्वातंत्र्याचा उपयोग बाणेदार वृत्ति बनविण्याकडे जितका होतो तितकाच पापाकडे प्रवृत्ति झुकविण्याला होतो. तिथें कांहीं कांहीं कुटुंबें अशीं आहेत, कीं त्यांना चरितार्थासाठीं कोणत्याही प्रकारें वागण्यांत काडीचाही संकोच वाटत नाहीं. उदरनिर्वाह करणें, ही गोष्ट तिकडे इतकी बिकट झालेली आहे, कीं उदरनिर्वाहासाठीं धंदा करतांना पापा–पुण्याची कल्पना कित्येकांच्या मनांत मुळींच येत नाहीं.

श्रीमंत समाजांत हा स्वैराचार फारच बोकाळलेला मला दिसून आला. पैशाची अनुकूलता वाजवीपेक्षां जास्त असल्यामुळें ते कसे उधळावेत याचीच कित्येकांना काळजी लागून रहात असे आणि म्हणूनच कौटुंबिक सौख्यापेक्षां स्वैराचारांतच आनंद आहे, असें हा वरचा समाज मानीत असल्याचें मला दिसून येत होतें. असलीं माणसें हिंदुस्थानांतून जाणाऱ्या विद्यार्थ्यांना एक खेळणें म्हणून आपल्या हातीं पकडीत असत.

त्याचप्रमाणें पोटभरू वृत्ति ठेवणाऱ्या दरिद्री समाजांतील घसरलेल्या कांहीं बायकाही अशा विद्यार्थ्यांना आपल्या पकडींत धरीत असत. हिंदुस्थानच्या विशिष्ट प्रकारच्या वातावरणामुळें गोऱ्या कातडीबद्दल उत्पन्न झालेला आदर विलायतेंत गेल्यावर

या अशा विद्यार्थ्यांच्या नाशाला कारणीभूत होत असे. आपण काळ्या कातडीचे लोक असतांही गोऱ्या कातडीला आकर्षक होतों, असा उत्पन्न होणारा अभिमान त्यांना पापाच्या खाईत लोटण्याला कारणीभूत होत असे. त्यांच्या या वेड्या अभिमानाचा फायदा घेऊन त्यांच्याकडून पैसा उकळणारीं अशीं जीं कांहीं माणसं असत त्यांना बळी पडणाऱ्या पुष्कळ विद्यार्थ्यांचें चरित्र पाहून माझें अंतःकरण तिळतीळ तुटत असे.

अशी जरी सर्व परिस्थिती होती तरीही विलायतेंतील वातावरण इकडल्या वातावरणापेक्षां जास्त निर्मळ वाटलें. चांगल्या मार्गानें वागणाऱ्या व्यक्तीला उत्तेजन मिळण्याजोगी परिस्थिती तिथें भरपूर होती. वाईटाचें आकर्षण असणाऱ्यांना तशीही परिस्थिती मिळत असे, पण तो कोणत्याही प्राण्याचा झाला तरी सहजधर्म आहे. तें विलायतेचें वैशिष्ट्य नव्हतें. पण हिंदुस्थानचें वैशिष्ट्य मात्र यापेक्षां निराळें असल्याचें मला अनुभवावें लागत होतें. चांगल्या मार्गानें वागूं म्हणेल त्यालादेखील पाय धरून खेचून कसा खालीं ओढावा, ही वृत्ति हिंदुस्थानांत जितक्या प्रमाणांत दिसून येते तितक्या प्रमाणांत विलायतेंत आढळत नाहीं. विलायतेंत प्रत्येकजण उद्योगी असतो. भरपूर काम केल्याशिवाय पोटभर अन्न मिळणें तिकडे कठीण होऊन बसलें आहे. आमच्या इकडच्या मजुरापेक्षां तिकडचा मजूरदेखील मला जास्त प्रामाणिक दिसून आला. आमच्या हिंदुस्थानांतल्या नोकरांना—मग तो कारकून असो कीं घरचा गडी असो—कामचुकारूपणा कसा करावा याचा मार्ग शोधून काढण्यांतच आनंद वाटत असतो. मी आपल्या धन्याला कसें चकविलें, याचाच अभिमान हिंदुस्थानांतला नोकर बाळगित असतो.

विलायतेंत तसें नाहीं. तिथला नोकर–मग तो पुरुष असो कीं स्त्री असो–धन्याची मर्जी संपादन करण्यासाठीं जिवाची आटापीट करीत असतो. लावून दिलेल्या नियमाच्या बाहेर तो एक तसूभरही जात नाहीं. नेमलेलीं कामें ठराविक वेळीं, ठराविक पद्धतीनें करण्यांत तो सदा तत्पर असतो, त्यामुळें प्रमोशनसाठीं त्याला धन्याच्याजवळ जिकीर करावी लागत नाहीं. चुकारतट्टू सर्वत्रच आहेत-तसे विलायतेंतही नाहींत असें नाहीं. पण लावून दिलेलें काम अन्तःकरणपूर्वक बजावणारा वर्ग विलायतेंत ज्या प्रमाणांत दिसून येतो, त्याच्या एक शतांशही हिंदुस्थानांत दिसून येत नाहीं.

विलायतेंत स्वतंत्रता आहे—स्वराज्य आहे—याचा तो परिणाम आहे, असें कित्येक मानतात; त्यांतही बराचसा तथ्यांश आहे यांत शंका नाहीं. येथील कारकून काम करीत असतांना ज्यावेळीं चुकवाचुकवी करतो त्यावेळीं, मी परक्या वरिष्ठाला फसवीत आहें, असें समाधान त्याला मिळत असतें. विलायतेंत तसें नाहीं. तिथल्या नोकराला आपला वरिष्ठ परकीय आहे असें वाटण्याचें कारण नसल्यामुळें तो वरिष्ठाचें काम तें आपलेंच काम अशा भावनेनें तें बजावीत असतो, आणि म्हणूनच आपलें कर्तव्य पार पाडण्याचे बाबतींत तो इकडल्या नोकरापेक्षां श्रेष्ठ ठरतो. याचें कारण विलायतेंत स्वराज्य आहे, हेंच म्हणण्यास हरकत नाहीं.

तीच स्वतंत्र बाण्याची वृत्ति मला विलायतेंत उत्तेजक वाटली. सर्व प्रकारचे समाज मी तिथें जाऊन पाहिले होते. पुण्यात्मे जसे भेटले होते, तशीच पापी मनुष्याशीं ओळख करण्याची मी कुचराई केली नाहीं. विलायतेच्या समाजाचें ज्ञान मला पूर्णत्वानें मिळायला पाहिजे होतें. अशा रीतीनें सर्व प्रकारचे समाज दाखवून देणाऱ्या संस्थाही तिथें पुष्कळ आहेत. या समाजाच्या आश्रयानें कमलपत्रावरच्या पाण्याच्या बिंदुप्रमाणें संस्कारशून्य राहून भिन्न भिन्न प्रकारच्या समाजांचें अवलोकन करणें तिथें अशक्य नव्हतें.

हे सर्व समाज पाहिले, बऱ्याबरोबर वाईटही पाहिलें, पण हिंदुस्थानांतील वृत्तीशीं त्या लोकांच्या वृत्तीची तुलना केली म्हणजे आपली आपल्यालाच लाज वाटल्यावांचून रहात नाहीं. सनातनी लोक विलायतेंतही आहेत. पण त्यांच्या दुराग्रहाचा पीळ आमच्या हिंदुस्थानी नमुन्याचा असल्याचें मला दिसून आलें नाहीं. नानासाहेबां-सारखीं माणसें तिथें नाहींत असें नाहीं. पण त्यांचें प्रमाण चांगल्या माणसांशीं तुलना करितां अल्प आहे, असें मला वाटलें. दुसऱ्याचा अनुभव कदाचित् निराळा असेल. पण माझ्या परिस्थितीप्रमाणें मी जें तिथल्या परिस्थितीचें अवलोकन केलें, तें हिंदुस्थाना-बद्दलचा अभिमान नजरेस येण्याइतकें विलक्षण झालें, असें म्हटल्यावांचून गत्यंतर नाहीं.

हिंदुस्थानाबद्दलचा माझा अभिमान इतका तीव्र होता कीं, त्यामुळें आपल्या मायभूमीबद्दलचा अनादर माझ्या मनांत उत्पन्न झाला नाहीं. आमच्या लोकांच्या वृत्तीबद्दल दुःख वाटलें, पण तिटकारा आला नाहीं. आमच्या लोकांची वृत्ती अशा प्रकारची व्हायला आमचें परावलंबित्वच सर्वस्वी कारणीभूत आहे हें मी केव्हांही विसरलें नाहीं. हा दोष परिस्थितीचा होता. व्यक्तिविषेशाचा नव्हता. ही परिस्थिती

बदलण्यासाठींच हिंदुस्थानांत परत गेल्यावर आपल्या अल्पशक्तीप्रमाणें प्रयत्न करावयाचे, असें मी ठरविलें होतें.

पण पहिल्याच पदक्षेपाला मला धक्का बसला. माझ्या पुढें जें कोडें येऊन पडलें तें इतकें बिकट होतें, कीं तें सोडविण्याची कोणतीही योजना माझ्या नजरेसमोर येईना. चंदूबद्दल मला आदर होता. लीलेबद्दल वात्सल्य होतें. पण दोघांच्यासाठीं कांहीं तरी करणें मला अशक्य होऊन बसलें होतें. चंदूनें स्वतःला आपण होऊनच एका विलक्षण परिस्थितींत गुंतवून घेतलें होतें. लीलेचें तसें नव्हतें. स्वतःच्या कोणत्याही चुकीनें ती पेंचाच्या परिस्थितींत आली नव्हती. तरीही तिला सोड-विण्याचा उपाय मला दिसून येईना. चंदूला मला दोष देतां आला असता पण लीला सर्वस्वी निर्दोष होती. लीलेला मी मुंबईला बोलावून घेतलें असतें. माझ्याबरोबरच ठेवून घेतलें असतें, तर तिचा पुढील अभ्यास सुखासमाधानानें झाला असता. पण तसें करणें मला शक्य नव्हतें. ती जरी माझी पुतणी होती तरीही तिच्यावर माझी सत्ता कायद्याच्या दृष्टीनें पूर्णत्वाची नव्हती. तिचे वडील जोंपर्यंत ह्यात होते आणि जोंपर्यंत ती कायद्याच्या दृष्टीनें सज्ञान झाली नव्हती तोंपर्यंत तिच्यासाठीं कांहींही करणें मला अशक्य होतें. सज्ञान होईपर्यंत वाट पहावी तर आयुष्यांतील दिवस फुकट जात होते. किंबहुना मिळविलेलें सर्व शिक्षण या मधल्या अवधींत विसरून जाण्याचा संभव होता. तोंपर्यंत तिनें कां वाट पहावी ?

चंदूपेक्षां लीलेचें कोडें मला जास्त बिकट वाटलें. लीलेसाठीं माझा जीव तिळतिळ तुटत होता. ज्ञानार्जनाची हांव असावी आणि तिची पूर्ती होऊं नये हें केवढें दुर्दैव ! एक प्रकारें माझें उदाहरण तिच्या नजरेसमोर होतें. माझें अनुकरण करण्याची उत्कंठा तिला उत्पन्न झाली होती. मी तिला हाताशीं धरलें असतें तर ती तिची उत्कंठा मूर्त स्वरुपांत येण्याचा संभव पुष्कळच होता.

ती एक बुद्धिवान् मुलगी होती. बुद्धिमत्तेला ज्ञानाच्या हव्यासाची जोड मिळाल्या-मुळें कर्तबगारी दाखविण्याला वाव भरपूर होता. तिच्यासाठीं असाच प्रयत्न केला असता तर तिला विलायतेला पाठवितां येणें अशक्य झालें नसतें. ज्या प्रयत्नानें मी माझा कार्यभाग सिद्धीला नेला त्याच प्रकारचे प्रयत्न करून विलायतेंत जाऊन ज्ञानार्जन करणें तिला माझ्याहून सुलभ होतें. कारण माझ्या अनुभवाचा फायदा तिला मिळणार होता.

पण नानासाहेबांच्या दुराग्रहामुळें ती गोष्ट आज अशक्य होऊन बसली होती. त्यांतून मार्ग कसा काढावा याचा मी आपल्याशीं विचार करीत होतें. काकांची भेट झाली तर या कामीं त्यांचा सल्ला घ्यावा, असें मी मनाशीं ठरविलें.

आणि दुसऱ्या दिवशीं काका भेटलेही. त्यांनीं चंदूची गृहस्थिती जी सांगितली ती ऐकून माझ्या डोळ्यांना पाणी आलें. आपल्याच घरीं बिचारा परकी होऊन बसला होता. खाणावळींत जेवायला जाणारा माणूस खाणावळवाल्याशीं तरी रहस्य करीत असतो; पण इथें तुरुंगांतल्या कैद्यासारखें पानावर वाढलें तें जेवावें आणि नंतर आपल्या कामावर निघून जावें, असें चाललें होतें. काकांशींही तो धड बोलत नव्हता. यापूर्वीं काका येत असत त्यावेळीं तासचे तास तो त्यांच्याशीं गप्पागोष्टी करीत रात्रीच्या रात्री काढीत असे; पण आतां जेवण झाल्याबरोबर तो आंत जाऊन पडत असे. ताई आणि काका तरी काय बोलत बसणार ?

काका म्हणाले, " त्याची मला जितकी कींव येते तितकाच राग येतो आणि तितकीच दया येत नाहीं. त्याच्या चुकांची फळं तो भोगतो आहे. पण त्यापायीं माझ्यासारख्याला ज्या निष्कारण यातना होत आहेत त्याची काय वाट ? लग्नाच्या बाबतींत सारी जबाबदारी मी त्याच्यावर टाकली–पुनः पुनः बजावून टाकली–असं असतांही त्यानं अविचार कां केला ? बरं, तो एक अविचार झालाच पण हा दुसरा अविचार अत्यंत अक्षम्य असा झाला आहे. त्यांतून मुक्त होणं आतां अशक्य होऊन बसलं आहे. हें विष पसरत जाणार आणि त्या विषाच्या वृक्षाचीं पाळं आम्हां सर्वांनां त्याच्याबरोबरच गुरफटून टाकणार. "

मी म्हटलें, " चंदूचं एक राहूं द्या. पण लीलेचं काय करायचं ? आजच्या परिस्थितींत तिला इथं आणून ठेवणं मला शक्य आहे पण साध्य नाहीं. त्याला उपाय काय ? "

काका कांहीं वेळ विचारांत पडले. ते म्हणाले, " त्याला कांहींच उपाय नाहीं. ती सज्ञान होईपर्यंत वाट पाहण्याखेरीज गत्यंतर नाहीं. "

काकांचें हें उत्तर ऐकून माझी सर्वतोपरी निराशा झाली.

काका निघून गेले. मी अगदीं निष्क्रिय होऊन बसलें. शाळेंत शिकविण्याचें काम करीत होतें. आफिसचेंही काम करीत होतें. पण माझा जीव अगदीं बेचैन झाला होता. चंदूपेक्षांही लीलेकडे माझें लक्ष जास्त लागलें होतें.

तिचीं पत्रें मला वारंवार येत असत. तिनें शाळा सोडली होती. शाळा सोडण्याखेरीज तिला कांहींच गत्यंतर नव्हतें. शाळा सोडल्यामुळें तिच्या जिवाची झालेली तळमळ लांब लांब पत्रें मला लिहून कशीबशी हलकी करण्याचा प्रयत्न ती करीत होती.

असेच कांहीं महिने निघून गेले.

त्या मुदतींत विशेष असें कांहीं घडलें नाहीं. शाळेंतील मुलींचें प्रेम मी संपादन करीत होतें आणि त्यांतून कांहीं नवे धागे निर्माण होतील कीं काय अशी भीति मला वाटत होती.

## प्रकरण बारावें ::::::::::::::::::::::::::::::::::::::::: एक कोडें

दिवसावर दिवस जात चालले आणि महिनेही उलटले. पत्रव्यवहारापलीकडे जिव्हाळ्याच्या कुणाही माणसाचा संबंध आला नाही. मधल्या सुट्टींतसुद्धां मी ताईच्या गांवीं गेलें नाहीं.

एका अर्थी मी मुंबईत होतें हें बरें होतें. जो तो माणूस आपल्या कामांत चूर झालेला असे, त्यामुळें दुसऱ्याच्या उठाठेवी करण्याची त्याला सवडच नसे. शेजारीं शेजारीं राहणारी माणसेंसुद्धां कित्येक दिवसांत एकमेकांस भेटत नसत.

तोच फायदा मला मिळाला. चंदू जरी त्याच्या गांवीं होता तरी या मधल्या मुदतींत त्याची माझी कधींच भेट झाली नाहीं. रस्त्यांत चुकून केव्हां तरी त्याची गांठ पडावी असें मला वाटत असे; पण माझ्या सुदैवानें तसें कधींच झालें नाहीं. ताईला आणि काकांना मी पत्रें पाठवीत असें. लीलेलाही पत्रें जात असत. पण गांवांतल्या गांवांत असल्यामुळें चंदूला पत्र पाठविण्याची कल्पनाच मनांत येत नव्हती आणि अशी कल्पना मनांत आली असती तरीही पत्र मी पाठविलें नसतें. पत्र सरुबाईच्या हातीं पडेल ही भीति नव्हती—कारण तिला इंग्रजी येत नव्हतें. इंग्रजी पत्र

लिहिणें मला शक्य होतें. पण चंदूला पत्रच पाठवायचें नाहीं, कांहीं कालपर्यंत त्याच्याशीं कोणत्याच प्रकारचा संबंध ठेवायचा नाहीं, असें मी मनाशीं पक्कें ठरविलें होतें.

दिवाळीची सुट्टी जवळ आली होती. त्या सुट्टींत गांवीं येण्यासाठीं ताईनें आग्रह करून पत्र पाठविलें होतें. जावें कीं जाऊं नये, याचा निश्चय करतां येत नव्हता; पण ताईचा आग्रह होता म्हणून मला एक प्रकारें संकट पडल्यासारखें झालें होतें.

गांवीं गेलें तर पुन्हां तिथें ग्रामण्य प्रकरण माझ्या येण्याची वाट पहातच होतें. सुखासमाधानासाठीं म्हणून जावें आणि गांवचीं भांडणें भांडत बसावीं, हें मला बरें वाटत नव्हतें. पण ग्रामण्याचा प्रश्न आतां निघणार नाहीं असें ताईनें पत्रांत लिहिलें होतें. कोणत्या आधारावर तिनें असें लिहिलें, याचा मला मुळींच अंदाज करतां येईना.

सहसा मी अपोलो बंदरावर फिरायला जात नसें. पण एके दिवशीं सहज गेलें आणि तोच योगायोग ठरला. अगदीं ओढून न्यावें त्याप्रमाणें त्या पूर्वीच्याच जागेकडे मी गेलें आणि पाहतें तों चंदू तिथें बसलेला मला दिसून आला.

त्याची नजर आपल्याकडे नाहीं असें पाहिलें न पाहिलेंसें करून निघून जावें, असें माझ्या मनांत आलें. इतक्यांत त्यानें मला पाहिलें. मला पाहतांच त्याचा चेहरा आनंदानें फुलून निघाला. आतां चुकवून जाणें शक्य नव्हतें.

मी पुढें झालें त्यावेळीं तो म्हणाला, " शेवटीं आज भेटलीस. तूं इथं केव्हांतरी भेटशील या अपेक्षेनें दररोज मी इथं येऊन बसत असतों. पावसाळासुद्धां चुकवला नाहीं–पण तूं कधींच आली नाहींस. आज माझी अपेक्षा सफळ ठरली. कसं काय चाललं आहे ? "

" काय चालायचं ? " मी म्हटलें, " नोकरी करतें आहें, मुलींना शिकवतें आहें, होममध्यें जेवतें, खातें, आराम करतें, याच्यापलीकडे माझ्या आयुष्यांत आणखी विशेष तें काय घडणार आहे ? "

चंदू क्षणभर माझ्या चेहऱ्याकडे सारखा पहात राहिला आणि म्हणाला, " असं उदासवाणं कांहीं बोलूं नकोस. उदासवाणे उद्गार तुझ्या तोंडीं शोभत नाहींत. असा एक काळ होता, कीं त्यावेळीं तुझ्या तोंडच्या उत्तेजनानं मला स्फुरण येत असे. माझ्या दुर्दैवानं तो काळ गेला. तुझ्या सहवासांत राहून माझ्या आयुष्याला कांहीं दिशा लागेल, अशीं मला फार आशा होती, पण माझ्या प्राक्तनानं ती फोल ठरली—"

" पण तुझं कसं काय चाललं आहे ? " मी मधेंच विचारलें.

" माझं काय चालायचं ? " चंदू म्हणाला, " तूं पाहिलंच आहेस, त्यापेक्षां आणखी कांहीं विशेष नाहीं. धंदा ठीक करतों आहें, चार पैसे मिळताहेत पण वकिली सोडून पुन्हां डॉक्टरीच्या परिक्षेला बसावं असं पुन्हां हल्लीं माझ्या मनांत येऊं लागलं आहे. मी कां वकिलीकडे वळलों हें माझं मलाच समजत नाहीं. पहिल्यापासून डॉक्टर होण्याची माझी आवड. अगदीं शेवटच्या वर्षापर्यंत येऊन पोंचलेला, पण नुसती लहर आली आणि तो कोर्स मी सोडून दिला. ती सोडून दिलेली डॉक्टरी मला पुन्हां बोलावते आहे. आयुष्यांत कांहींतरी फरक पाहिजे, एकाच प्रकारचा जीवनक्रम माणसाला दुःसह होतो. रोज रोज कोर्टांत जायचं, खोटंनाटं कांहींतरी बोलायचं आणि कुळाकडून पैसा उकळायचा, या गोष्टीचा मला आतां कंटाळा येऊं लागला आहे. यांत परोपकार होत नाहीं. स्वतःच्या मनालाही समाधान मिळत नाहीं. आतां वाटतं, डॉक्टरी सोडली ही चूक झाली. डॉक्टर झालों असतों तर चोवीस तास गुंतून पडतां आलं असतं. दिवसरात्र काम असतं त्या धंद्यांत. घरीं येणं म्हणजे मोठं भयंकर वाटतं आणि वकिलींत घरीं यायचं चुकवणं साध्य नाहीं. म्हणून पुन्हां शेवटच्या परिक्षेला बसावं असं हल्लीं कांहीं दिवस मनांत येतं आहे. ती इच्छा बळावत चालली तर कदाचित् पुन्हा परिक्षेला बसेन. टर्म्स पूर्वीच भरल्या गेल्या आहेत, तो प्रश्न आतां राहिला नाहीं. "

त्याच्या म्हणण्याचा उद्देश माझ्या ध्यानीं आला. घरीं रहाणें त्याला दुःसह झालें होतें हें अगदीं स्पष्टपणें दिसून आलें.

मी विचारलें, " मग कोकणांत कां जात नाहींस ? तुमच्या कोर्टांना आमच्या शाळेसारख्याच भरपूर सुट्या असतात. "

" यंदाच्या उन्हाळ्याच्या सुट्टींत जाणार होतों पण तूं तिकडे गेली असशील अशी शंका आली. काकांना विचारणं बरं वाटलं नाहीं. पण तूं गेलीच होतीस असं धरून चाललों आणि म्हणूनच गेलों नाहीं. " चंदूनें उत्तर दिलें.

" तरीही माझी वाट पहात इथं अपोलो बंदरावर बसतोस ना ? " मी म्हटलें.

एक दीर्घ निश्वास टाकून तो म्हणाला, " मी काय करतों हें माझं मलाच कळत नाहीं. सुकाणूं तुटलेल्या गलबतासारखा जिकडे वारा वाहील तिकडे मी वाहत चाललों आहें. आयुष्याला ध्येय नाहीं, मनाची गती कुंठित झालेली,

उत्तेजनाला जिव्हाळा नाहीं. कुणासाठीं जगूं ? या आयुष्याच्या लढ्यांत कुणासाठीं म्हणून घुसून लढाया मारूं ? स्वतःच्या जिवाचं समाधान मर्यादित असतं. मनुष्य कार्याला प्रवृत्त होतो तो दुसऱ्या कुणाच्या उत्तेजनाच्या अपेक्षेनं. निदान जनतेचं उत्तेजन तरी त्याला पाहिजे असतं. आशेच्या पाठीमागं एक जिव्हाळा तरी पाहिजे किंवा जनता तरी पाहिजे, त्या शिवाय माणसाच्या हातून कांहीं कार्य घडत नाहीं. सार्वजनिक कार्यांत पडावं म्हटलं तर मनाला तेवढा उत्साह नाहीं. तसल्या उत्साहाला प्रवर्तक होणारी शक्ति पाठीशीं नाहीं—"

तो सारखा बोलत चालला होता पण त्यांत तेंच तेंच पालुपद पुनः पुनः गायिलें जात होतें. उत्तेजनाच्या अभावीं त्याचा लढवय्या जीव खचत चालला होता, एवढाच निष्कर्ष त्याच्या बोलण्यांत निघत होता.

विषयांतर करण्याच्या उद्देशानें मी विचारलें, "सरुबाई आतां कशी काय आहे ?"

कपाळाला आंठ्या घालून तो म्हणाला, "चांगली विरंगुळ्याची गोष्ट बोलत असतां हा विषय कशाला काढलास ? एवढं मी बोललों यावरून तुला कांहीं कल्पना नाहीं का आली ? तूं उदासवाणं बोलूं नकोस असं मी म्हटलं पण माझ्या तोंडून यावेळीं निघतें आहे तें मूर्तिमंत औदासिन्य आहे, एवढं तरी तुला कळलं पाहिजे होतं. काय व्हायचंय् तिचं ? एका घरांत राहणारीं आम्ही दोन परकी माणसं आहोंत. तूं गेल्यापासून हा वेळपर्यंत तिचं आणि माझं भाषणसुद्धां झालं नाहीं. घरच्या नोकरांच्या तें ध्यानीं येतं. ते माझी कींव करतात, हें उघड उघड मला दिसतं पण माझा निरुपाय झाला आहे. तिला माझा तिटकारा येतो आणि मला तर तिच्या डोळ्याला डोळाही देववत नाहीं. आम्ही एका घरांत रहात आहोंत खरे पण मला वाटतं कांहीं दिवसांनीं मी तिची ओळखसुद्धां विसरून जाईन, इतकी ती माझ्या दृष्टीआड झाली आहे. काय हें माझं आयुष्य ? असलं आयुष्य घेऊन जगायचं तरी कशाला ? माझ्या जागीं दुसरा कोण असता तर अशा परिस्थितींत त्यानें आत्महत्या देखील केली असती, इतकं माझं जिणं कंटाळवाणं होऊन बसलं आहे."

अपोलो बंदराइतकी उघडी जागा नसती तर मला वाटतें तो ढसढसा रडला असता. त्याच्या डोळ्याच्या टोकाशीं आसवें डोकावत होतीं, तीं पुसून त्यानें चष्मा काढून तो रुमालानें पुसण्याचें ढोंग केलें.

त्याची ती स्थिती पाहून मला काय वाटलें हें शब्दानें सांगतां येण्याजोगें नाहीं. तो समोर दिसत असल्यामुळें पूर्वींचा एकेक प्रसंग नजरेसमोरून सारखा जात होता. त्या वेळची त्याची ती उल्हसित वृत्ति आणि आजची उदासीन वृत्ति, या दोहोंचा पडताळा घालतांना माझें काळीज तिळतिळ तुटत होतें.

तो म्हणाला, " विधवा झाल्यामुळं तूं सुखी तरी झाली आहेस! बिचाऱ्या पुरुषांच्या नशिबी वैधव्यासारखी एकादी स्थिती नाहीं. पुरुषांची विधुरदशा आणि स्त्रियांचं वैधव्य, या दोहोंची तुलना होणार नाहीं. स्त्रियांचं वैधव्य नवऱ्यावर आहे. पुरुषांची विधुरावस्था सापेक्ष आहे. पुरुष विधूर झाला तर त्याची कोणी कींव करीत नाहीं. विधवा स्त्री जगाच्या दयेला पात्र होते. म्हणूनच मला तुझा मत्सर वाटतो. " असें म्हणून तो तोंड फिरवून स्वस्थ बसला.

पुढें काय बोलावें हें मला सुचेना. मी जातें म्हणून निरोप घेऊं लागलें तेव्हां तो म्हणाला, " इतक्या दिवसांनीं भेटलीस तर घटकाभर बोलत बसावं असं तुला नाहीं का वाटत? पुन्हां दोघें दोन बाजूला झालों तर परत भेट होण्याची संधी केव्हां येईल हें सांगतां यायचं नाहीं. आम्ही होऊनच आमच्या भेटीला बंधन घालून घेतलं आहे. अशी चुकारू भेट होईल तेव्हांच कुठं चार शब्द बोलायचा योग यायचा. आतां भेटलीस, क्षणभर मन हलकं करण्याचा प्रयत्न केला–तर निघून जाईन म्हणतेस. हें तुला शोभतं का? पूर्वींच्या नात्यासाठीं नव्हे पण आजच्या माझ्या परिस्थितीकडे पाहून तरी तुला माझी दया येत नाहीं का?"

मी उत्तर दिलें, " दया येऊन काय होणार आहे? प्रत्यक्ष भेट झाली नाहीं तरीही तुझ्या परिस्थितीची कल्पना मला चांगली येत होती. त्याचवेळीं तुझी दयाही येत होती. मला नुसती तुझी दया आल्यानं कांहीं तुझं समाधान व्हायचं नाहीं किंवा कल्याणही व्हायचं नाहीं. त्यापेक्षां एकमेकांनीं एकमेकांना न भेटणं हेंच बरं!"

पुन्हां क्षणभर आम्ही स्वस्थ राहिलों. बोलण्याचा कंटाळा वाटत होता तरी कांहीं तरी बोलावें असें मनाला वाटत होतें. पण बोलायचें काय हेंच कळेना! तेंच तेंच रडगाणें गायचें ना? तें गाणें गाऊन कुणाचेंच कांहीं समाधान होणार नव्हतें. उलट असमाधानच वाढणार होतें.

कांहींच न बोलतां बसणें मला दुःसह झालें आणि त्याचा निरोप घेऊन उत्तराची अपेक्षा न करतां मी तिथून चटकन् निघालें. मागें वळून पाहिलें त्यावेळीं तो खालीं मान घालून समुद्राच्या लाटाकडे पहात होता, असें मला दिसून आलें.

मी घरीं आलें त्यावेळीं माझें चित्त कुठेंच लागेना. मन अगदीं उद्विग्न होऊन गेलें होतें. त्याचा तो उदासीन चेहरा पुनः पुनः माझ्या नजरेसमोर उभा राहून मला भेवडावीत होता. त्याचें दुःख दूर करण्यासाठीं काय करावें याबद्दल मी पुष्कळ विचार करून पाहिला; पण कांहींच योजना सुचेना. विचारावें म्हटलें, तर तसें कुणी जिव्हाळ्याचें माणूस जवळ नव्हतें.

ताईच्या आमंत्रणाचा फायदा घ्यावा आणि गांवीं जावें, असें मी ठरविलें.

दिवाळीची सुट्टी पडतांच मी गांवीं गेलें. ताईला अगदीं पोट भरून आनंद झाला. माझ्या येण्याकडे ती सारखी डोळे लावून वाट पहात बसली होती. काका होते तसेच स्थितप्रज्ञ होते. आनंद झाला असला तरी त्यांनीं तो दिसूं दिला नाहीं.

मला आश्चर्य वाटलें तें हेंच, कीं ताईचें म्हणणेंच खरें ठरलें. मी येऊन राहिलें तरीही बहिष्कार ग्रामण्याची कोणतीच चळवळ सुरू झाली नाहीं. घरीं पुराणिकबुवा होते, त्यांनीं देखील मला कोणत्याही प्रकारें तोडून वागविलें नाहीं.

मी ताईला विचारलें त्यावेळीं ती म्हणाली, " हा पुन्हा दैवी चमत्कार झाला आहे. मुंबईहून आम्हीं परत आलों त्यावेळीं पुन्हा ग्रामण्याचा प्रश्न निघाला. अपंक्तांच्या पंक्तीला आम्ही जेवून आलों असल्यामुळं आम्हाला वाळींत टाकण्याचा ठराव पास केला गेला. तितक्यांत आमच्या पुराणिकबुवाला लहर आली. त्यांनीं त्यावेळीं कौल लावण्याचा बूट काढला. सर्व पुजारी गोळा झाले आणि गांवच्या देवळांत कौल लावला. वाळींत टाकूं नये म्हणून कौल मिळाला. कौलाच्या कळ्या पुराणिकबुवानीं आपल्या हातानं लावल्यामुळं ती त्यांची हातचलाखी आहे अशी शंका कित्येकांनीं काढली. पुराणिकबुवा खरोखरीच या बाबतींत निर्दोषी होते. ते जरी आमचे आश्रित होते तरी त्यांची पुराणप्रियता इतकी जाज्वल्य होती, कीं आम्हाला वाळींत टाकण्याविषयींचाच कौल मिळावा, अशी त्यांची आत्यंतिक इच्छा होती. पण संशय उत्पन्न झाल्यामुळें दुसऱ्या पुजाऱ्यानें पुनः दुसऱ्यान्दां कौल लावून पाहिला आणि योगायोगानं पुनः पूर्वीसारखाच कौल मिळाला. खेडेगांवच्या लोकांचा देवाच्या या कौलावर किती भरंवसा असतो, याची शहरी माणसांना कल्पना येणार नाहीं. देवाच्या कौलाला मान दिला नाहीं तर देवाचा कोप होतो, असाच खेडेगांवच्या लोकांचा समज असतो. त्याप्रमाणें त्यांनीं ग्रामण्याचं प्रकरण विझवून टाकलं. देवसुद्धां सुधारकांचे पक्षपाती होऊं लागले, असे उद्गार निघूं लागले."

मला त्या हकिकतीचें आश्चर्य वाटलें. हा नुसता योगायोग आहे, कीं खरोखरीच यांत कांहीं दैवी चमत्कार आहे, हें मला कांहींच निश्चित ठरवितां येईना. पण प्रस्तुतच्या परिस्थितींत चार दिवस सुखासमाधानानें काढायचा मार्ग मोकळा झाला, एवढें पाहून माझा जीव खालीं पडला.

चंदूच्या भेटीची हकीकत मी ताईला सांगितली. ती तरी बिचारी काय सांगणार होती? ती म्हणाली, " आल्या प्रसंगाला तोंड दिल्याखेरीज आतां दुसरा उपाय नाहीं. आपलं लग्नच झालं नाहीं असं समजून त्यानं रहावं म्हणजे झालं—" थोडा वेळ विचार करून ती म्हणाली, " असंच समजून रहावं, असं म्हणणं सोपं आहे. मुळींच लग्न झालं नसतं तर आपल्याला लग्न केलं पाहिजे, त्याच्यासाठीं एकादी अनुरूप वधू शोधली पाहिजे, अशी एक आशा जागृत असते. पण हें असलं जिणं म्हणजे ना ब्रह्मचर्य ना विधुरावस्था. घरांत बायको असायची पण तिचं तोंड पहायचं नाहीं. घरांत नवरा असायचा पण त्याला नुसता स्पर्शसुद्धां करायचा नाहीं. यापेक्षां, मला असं वाटतं, कुणब्याच्या घरची काडीमोड बरी. घटस्फोट करून त्यांना नवा संसार तरी थाटतां येतो. आम्हांला तेंही शक्य नाहीं. जन्म असाच घालवला पाहिजे. त्याखेरीज दुसरा उपाय नाहीं. हें कोडं सोडवायचं कसं? चंदूनं तरी जिवाचं रान करून भरल्या घरांत एकाद्या भुतासारखं कां वागावं? सरुनंही आपल्या मनाप्रमाणें वागून कां सुखी होऊं नये? एका मतभेदाखेरीज दुसरं कांहीं कारण नाहीं. कांहीं कुणी रोगी नाहीं, कीं दुराचारीही नाहीं. दोघंही धुतलेल्या तांदळासारखीं अगदीं स्वच्छ आहेत. मग त्यांनीं ही शिक्षा कां भोगावी?"

" हा माझा प्रश्न आहे." मी म्हटलें, "मला तुला जें विचारायचं आहे तें हेंच. उत्तर द्यायच्या ऐवजीं तूं माझाच प्रश्न मला विचारते आहेस—ही चुकवा चुकवी कांहीं चालायची नाहीं."

" आपण तिकडेच विचारूं !" ताई म्हणाली.

संध्याकाळीं जेवणें झाल्यावर आम्ही दोघीही बोलत बसलों होतों. शाळेंतल्या बऱ्याचशा हकिकती झाल्यानंतर मी पुन्हां चंदूची गोष्ट काकांच्यासमोर काढली, तीच हकिकत पुन्हा सांगितली आणि तोच प्रश्न पुन्हा केला.

काका म्हणाले, " हें न सुटणारं कोडं आहे. आधीं हिंदुस्थानांत जन्म घ्यावा कां? त्यांत तो ब्राह्मणाच्या कुळांत कां घ्यावा? आणि घेतला, तर मग मतभेद झाल्या-

बरोबर त्यानं पडतं कां घेऊं नये? माझं मत असं आहे, कीं खरोखर सुखानं संसार करायची जर त्याची इच्छा असेल तर त्यानं तिच्यापुढं नमतं घ्यावं. चांगला एकादा वेदशास्त्रसंपन्न ब्राह्मण बोलावून प्रायःश्चित्त घ्यावं. तेवढ्यानं तिचं समाधान होईल आणि त्यांचा संसार सुखानं चालूं लागेल."

मी म्हटलें, "पण हा प्रायःश्चित्ताचा प्रश्न निघायच्या पूर्वीं तो कुठं सुखी होता? त्याही वेळीं त्याची वृत्ति असमाधानाचीच होती."

काका गालांतल्या गालांत हंसत म्हणाले, "खरं आहे! खरं आहे! पण आतां परिस्थिती बदलली आहे. त्यानं जर प्रायःश्चित घेतलं तर सरुला आपला जय झाल्यासारखं वाटेल. आपल्यापुढं नमतं घेतल्यामुळं तो एकप्रकारें आपल्या कृपेला पात्र झाला आहे, असं वाटूं लागेल—त्यामुळें तिच्या ठिकाणीं त्याच्या बाबतींत एक प्रकारचा जिव्हाळा उत्पन्न होईल. त्या जिव्हाळ्यामुळें ती त्याच्याशीं जास्त लोभानं, जास्त प्रेमानं वागूं लागेल. त्या प्रेमाच्या आंचीनं तोही हळूहळू वितळत जाईल आणि हळू हळू दोघाच्यांत एकप्रकारचा लागाबांध्याचा संबंध उद्भवूं लागेल. पायरी पायरीनं त्याला पदोपदीं पड खाण्याची लाज वाटणार नाहीं. वारंवार तो अशी पड खात गेला असल्यामुळें तिच्या ठिकाणीं त्याच्याबद्दल जो एक स्वाभाविक अभिमान उत्पन्न होईल, त्यामुळं दोघांचं सूत आपोआप जमत जाईल, असा माझा अंदाज आहे."

हें बिकट समीकरण सोडविण्याची काकांची ही रीत पाहून मला खरोखरच हंसूं आलें. या नुसत्या कल्पना होत्या. असें केलें तर असें होईल, असें म्हणण्यानें कांहीं आपल्याला हवी तशी परिस्थिति उत्पन्न होत नाहीं! नुसतें पड खाण्याचें राहून जाईल; पण त्याचा परिणाम मात्र काहींच होणार नाहीं, असें कां समजूं नये? आशावादालाच चिकटून बसावें, असे त्याच्या आयुष्यांत आशावादी प्रसंग कोणते आले होते? समजा, त्यानें प्रायःश्चित घेतलें आणि त्याचा परिणाम मात्र व्हावा तसा झाला नाहीं, तर प्रायःश्चित घेतल्याचा अपमान तेवढा मात्र शिल्लक राहील आणि तिची मुळची वृत्ति आणखीही जास्त बहकेल, अशी कल्पना कां करूं नये?

मी असें उघड उघड बोलून दाखविलें त्यावेळीं काका म्हणाले, "हें तुझं लॉजिक आहे. हें विलायती लॉजिक आपल्याला कांहीं पटत नाहीं. मी एक आशावादी माणूस आहें. प्रत्येक गोष्टीचा प्रयोग करून पहावा, असं मला वाटत

असतं. म्हणूनच ना तुझ्या बाबतींत इतकं कांहीं करतां आलं ? ज्या ज्या गोष्टी पूर्वीच्या माझ्या आशावादीपणामुळं घडल्या, त्या गोष्टींच्या बाबतींत जर मी अशाच शंका कुशंका काढीत राहिलों असतों तर आज तूं ज्या परिस्थितींत आहेस, त्या परिस्थितींत केव्हांही राहिली नसतीस ! हा एक प्रयोग आहे आणि मला वाटतं, तो करून पाहण्यासारखा आहे. तो प्रयोग केला आणि त्याचा परिणाम चांगला झाला तर ठीकच झालं–नाहीं तर आहे त्यापेक्षां जास्त वाईट कांहीं होणार नाहीं. मनुष्य आसन्नमरण झाला म्हणजे त्याच्यासाठीं वेशीवरच्या देवाला कोंबडं बळी द्यायला एकादा सुधारक म्हणविणारासुद्धां तयार होतो तसंच हेंही आहे. चंदू तुला भेटला, तर त्याला म्हणावं, कीं हा प्रयोग करून पहा. ”

बोलणें तेवढ्यावरच राहिलें पण माझ्या मनांत तें एकप्रकारें ठसून गेलें.

# प्रकरण तेरावें ............ पळपुटी

लीला एके दिवशीं अचानक येऊन दाखल झाली. तिला माझ्या होमचा पत्ता चंदूनें दिला, असें तिनें सांगितलें. ती पुण्याहून आली ती सरळ चंदूच्या घरीं आली होती. तिथें राहणें शक्यच नव्हतें. चंदू त्यावेळीं घरीं होता म्हणून बरें झालें, नाहीं तर माझा पत्ता मिळणें तिला कठीण गेलें असतें.

नानासाहेबांनीं तिच्या लग्नाचा बेत बहुतेक ठरविल्यासारखा केला होता. तिला तें स्थळ पसंत नव्हतें. योजलेला वर तिच्या माहितीचा होता.

तो गांवांतला एक उनाड मुलगा होता. त्याचें चरित्र सर्वतोमुखीं असतांही नानासाहेबांनीं त्याच्याशीं लग्न ठरविलें कसें, याचें मलासुद्धां आश्चर्य वाटलें.

लीलेची आईसुद्धां त्या लग्नाला विरुद्ध होती. पण नानासाहेबांचें वाक्य म्हणजे ब्रह्मवाक्य, असें असल्यामुळें कुणाचेंच कांहीं चालेना. शेजाऱ्या-पाजाऱ्यांनींही सांगून पाहिलें पण नानासाहेबांचा अगदीं निश्चय झाला होता.

म्हणूनच लीलेनें धाडस केलें. आईकडून भाड्यापुरते पैसे घेऊन ती मुंबईला निघून आली. या कामीं तिच्या आईची संमती होती हें पाहून मला थोडेंसें समाधान वाटलें. आपल्या जोखमींत कुणीतरी भागिदार आहे, ही त्यांतल्यात्यांत मला आसऱ्याची जागा होती.

आतां कांहीं तरी कुरुक्षेत्र माजल्यावांचून रहात नाहीं, असें मला वाटून चुकलें. होममध्यें असा प्रकार होणें इष्ट नव्हतें म्हणून लीला आली त्याच्या दुसऱ्याच दिवशीं एक जागा पाहून मी बिऱ्हाड केलें. जेवणासाठीं स्वयंपाकीण मिळेपर्यंत जेवणापुरतें होममध्यें यायचें, असें ठरविलें होतें.

लीला घरीं बसून रहात असे. चार सहा दिवस गेले. तसें बसणें तिला कंटाळवाणें वाटूं लागलें. ती शाळेंत गेलेली बरी, असें मला वाटूं लागलें आणि मी तिला एका मिशनऱ्यांच्या इंग्रजी शाळेंत पाठवून दिलें.

या वेळीं दुसऱ्या कुणाचा तरी आधार पाहिजे होता, असें मला वाटूं लागलें. सुपरिन्टेन्डेन्टबाईंना ही हकीकत सांगणें इष्ट नव्हतें. आपलीं गृहछिद्रें आपणच चव्हाट्यावर कशी आणायचीं? काका आणि ताई इतकीं दूर होतीं, कीं त्यांची सल्ला मिळूनही तिचा आयत्या वेळीं कांहीं उपयोग होणार नव्हता.

राहतां राहिला चंदू. संबंध ठेवायचा नाहीं, असें जरी सांगितलें होतें तरी तो निश्चय मोडणें भाग पडलें. लीला आलेली असल्यामुळें तो निश्चय मोडण्यालाही एक प्रकारचें कारण मिळालें होतें.

मी चंदूला पत्र घातलें. ठरलेल्या वेळीं तो मला भेटायला माझ्या खोलीवर आला. लीलाही तिथें होतीच.

झालेली सर्व हकीकत त्याला सांगितली. ती ऐकून तो विचारांत पडला. हा जोखमीचा प्रश्न होता. पण एक बरें होतें, कीं तो स्वतः वकील होता. वकील या नात्यानें प्रसंग पडल्यास मला मदत करणें त्याला शक्य होतें.

चौकशी करतां असें आढळून आलें, कीं लीलेला त्यावेळीं अठरा वर्षें पुरीं झालीं होतीं. कायद्याच्या दृष्टीनें ती आपली आपण मुखत्यार होती.

तरीही लोकाचार म्हणून कांहीं होताच. मी विलायतेहून आलेली असल्यामुळें मीं तिला पाठिंबा देणें म्हणजे लोकप्रवादाला कारण झालें असतें.

आशेनें जरी ती माझ्याकडे धांवत आली तरी अशा प्रसंगाच्या वेळीं तिला मदत न करणें हें देखील माझ्या लेखीं पाप झालें असतें. नानासाहेबांना त्याची पर्वा नव्हती खरी; पण हा उभ्या आयुष्याचा प्रश्न होता. कळूनसवरून गांवांतल्या एका उडाणटप्पूला मुलगी देण्याइतका निर्घृणपणा नानासाहेबांच्यानें करवला तरी कसा, याचें चंदूलाही आश्चर्य वाटलें.

चंदूच्या घरीं टेलिफोन होता. त्यानें आपला नंबर सांगून ठेवला आणि प्रसंग पडल्यास एकदम टेलिफोन करून त्याला बोलावून घ्यावें, असेंही ठरलें. कोर्टांतील टेलिफोनचा नंबरही तसाच त्यानें देऊन ठेविला.

आणखी दहा बारा दिवस गेले पण नानासाहेबांनीं गडबड केल्याचें कांहींच दिसून आलें नाहीं. हें प्रकरण असें थंडावलें कसें, याचें माझें मलाच आश्चर्य वाटलें. नानासाहेब अशा प्रसंगीं स्वस्थ राहणारे नव्हते, याची मला पूर्ण कल्पना होती. ज्या अर्थीं ते इतके दिवस अगदीं स्वस्थपणानें राहिले आहेत त्या अर्थीं त्यांचा डाव तसाच कांहीं तरी बिकट आहे, असा मला संशय आला.

आणि शेवटीं अनुभवही तसाच आला. एके दिवशीं लीला शाळेंत जात असतां तिला त्यांनीं जबरीनें पकडून गाडींत घातलें आणि स्टेशनवर आणलें. मी शाळेंत होतें. मला कांहींच पत्ता लागला नाहीं. लीलेनें हुषारी करून स्टेशनवरूनच चंदूला फोन केला. चंदूनें घाई करून पोलिसांत वर्दी दिली.

लीलेच्या नशिबानें गाडी निघण्याला बराच अवकाश होता म्हणून सारी मंडळी स्टेशनवर वाट पहात राहिली होती. लीलेनें फारशी नाराजी न दाखविल्यामुळें नानासाहेब आणि त्यांच्याबरोबर आलेले त्यांचे एकदोन स्नेही हेही बेसावध होते.

इतक्यांत पोलीस पार्टी येऊन दाखल झाली आणि त्यांनीं लीलेला आपल्या ताब्यांत घेतलें.

नानासाहेबानीं स्टेशनवरच आरडाओरड करण्यास सुरवात केली पण पोलिसांपुढें त्यांचें कांहीं चाललें नाहीं. चंदूला पाहतांच त्यांचा राग बेफाम भडकला आणि त्यांनीं शिव्यागाळीला सुरवात केली. पोलीसपार्टी निघून गेल्यावरसुद्धां ते शिव्यागाळी देत मागें राहिले होते, असें स्टेशनवर असलेल्या एका चंदूच्या स्नेह्यानें सांगितलें.

मॅजिस्ट्रेटपुढें जाऊन लीलेनें आपली कैफियत दिली आणि त्यांत आपली सर्व हकिकत नमूद करून, आपली इच्छा आपल्या चुलतीकडे राहण्याची आहे, असें स्टेटमेंट केलें.

मॅजिस्ट्रेटकडून मला बोलावणें आलें त्यावेळीं मी शाळेंत वर्ग घेत होतें. मधेंच वर्ग टाकून मॅजिस्ट्रेटच्या बोलावण्यावरून मला जावें लागलें, याची साऱ्या शाळेंत खळबळ उडाली. झांकून ठेवण्याची गोष्ट शेवटीं उघड झाली.

मॅजिस्ट्रेटनें लीलेला माझ्या ताब्यांत दिली आणि मी तिला घेऊन घरीं आलें. त्या दिवशीं त्यानंतर शाळेंत गेलें नाहीं.

मी घरीं येतांच चंदू म्हणाला, " या माणसाला बाप म्हणावं कीं कसाब म्हणावं, हेंच मला कळत नाहीं. आधीं मुलीचं लग्न एका भडभुंज्याशीं ठरवतो काय आणि नंतर भर रस्त्यावरून एखाद्या मवाल्याप्रमाणें मुलीला खेंचून गाडींत घालून नेतो काय ? आतां असं कळतं, कीं ती मंडळी इथं येऊन सात आठ दिवस झाले. बारकाईनं तपास काढून त्यांनीं आम्हां सर्वांवर पाळत ठेवली होती. लीला शाळेंत जाते, हें जेव्हां त्यांच्या उघडकीस आलं तेव्हां त्यांनीं हा असा पकडून नेण्याचा घाट घातला. आतां मात्र या पोरीची बापापासून जन्माची तुटलीक झाली आहे. "

लीला म्हणाली, " सुटलें एकदांची. कसं त्या संकटांतून सुटावं याच काळजींत होतें. सहज माझ्या हातीं पत्रिका लागली म्हणून बरं झालं. त्यांनीं शाळेंत दिलेलं माझं वय कमी आहे, या आधाराजवळ ते खुषींत होते. पण एके दिवशीं फडताळ शोधतांना पत्रिका सहज माझ्या हातीं सांपडली. हिशेब करून पाहिला त्यावेळीं शाळेंत दिलेलं माझं वय खोटं आहे असं मला दिसून आलं. तें तसं मुद्दामच खोटं दिलं होतं असं कांहीं नव्हे, पण कांहींतरी अंदाजानं वय दिलं होतं. तेंच त्यांच्या ध्यानांत होतं. मॅजिस्ट्रेटसमोर पत्रिका दाखवली गेली, त्यावेळीं त्यांचा चेहरा कसा झाला तो न्याहाळतांना, मला वाटे, घरीं गेल्यावर आतां ते मला लाख शिव्या मोजतील. आतां कांहीं का करीनात ? एकदांची त्यांच्या तावडींतून सुटलें ! "

चंदूचे मी आभार मानले त्यावेळीं तो म्हणाला " असं औपचारिक बोलूं नकोस मथू. हें माझं एक पवित्र कर्तव्य आहे. माझ्या आयुष्यांत मी जी चूक केली, त्यामुळं माझ्या संसाराची माती झाली. हें माझं उदाहरण मी सदोदित माझ्या नजरेपुढं

ठेवीत असतों. तूं कोर्टांत येऊन चौकशी कर. हल्लीं माझ्याकडे येणाऱ्या बहुतेक साऱ्या केसीस असल्याच कांहींतरी कौटुंबिक भानगडीच्या असतात. एकप्रकारें मला तें वेडच लागलं आहे. असली केस मिळाली, तर मी तिथं फीचीही पर्वा करीत नाहीं. सांसारिक संकटांतून माणसांना सोडवणं, हेंच माझ्या आयुष्याचं ध्येय आहे, असं हल्लीं मला वाटूं लागलं आहे. ”

झालेली सर्व हकिकत मी ताईला कळविली. याच सुमाराला मला एक स्वयं-पाकीण मिळाली त्यामुळें जेवणाखाण्याची व्यवस्थाही व्यवस्थित लागली. लीलेच्या अभ्यासाकडे लक्ष पुरविणें मला त्यामुळें शक्य झालें.

त्या वर्षीं लीला मॅट्रिक झाली आणि कॉलेजांत जाऊं लागली. बी. ए. होईपर्यंत तरी लग्न करायचें नाहीं असा तिचा निश्चय होता.

त्यावेळीं कॉलेजांत हिंदू मुली फारच थोड्या होत्या. पण कॉलेज मुंबईचें असल्यामुळें लीलेला फारसा त्रास झाला नाहीं. तिच्या जोडीदार विद्यार्थिनी बहुतेक पारशी किंवा ख्रिश्चन होत्या. महाराष्ट्रीय अशी एकाददुसरीच होती. ज्या महाराष्ट्रीय मुली होत्या, त्याही श्रीमंतांच्या होत्या. मध्यम स्थितींतील गृहस्थांच्या मुली त्या वेळपावेतों क्वचित्‌च कॉलेजांत जाऊं लागल्या होत्या.

एके दिवशीं एक चमत्कार घडून आला. आम्ही संध्याकाळीं जेवणाची वेळ होईपर्यंत बोलत बसलों असतां नानासाहेबांची स्वारी एकदम दाखल झाली. मी आश्चर्यचकित झालें. त्यांची मुद्रा अगदीं पालटून गेली होती. त्यांच्याकडे पाहतांच मला कींव आली.

ते येऊन बसले, ते कित्येक वेळपर्यंत आधी बोलेनातच. कां आलां, असें मी त्यांना विचारलें, त्यावेळीं ते म्हणाले, “ येऊं नको तर काय करूं ? प्रसंगच तसा बिकट आला आहे. मला माहीत आहे, कीं मी कांहीं बोललों तरी तुम्हाला खरं वाटणार नाहीं-म्हणूनच ऑफिसांतल्या कुणाला तरी पाठवणार होतों-पण त्यांचं सांगणं तुम्हांला खरं वाटणार नाहीं अशी शंका आल्यामुळं मी आलों. माझ्यावर तरी तुमचा विश्वास कुठं आहे म्हणा ? प्रसंगच तसा आला आहे, तेव्हां तुम्हांला तसं वाटलं तर त्यांत आश्चर्य नाहीं. पण आज आलों आहें, तो अगदीं लाचार होऊन आलों आहें-” असें म्हणून त्यानीं स्फुंदस्फुंदून रडण्यास सुरवात केली.

कांहींतरी बिकट प्रसंग आहे अशी शंका मला आली. पण लीला अगदीं कठोर झाली होती. नानासाहेबांच्या मुद्रेचा माझ्यावर जो परिणाम झाला तो तिच्यावर झाल्याचें दिसून आलें नाहीं.

उपरण्यानें डोळे पुसून नानासाहेब म्हणाले, "हिची आई आसन्नमरण स्थितींत आहे. ती जगणार नाहीं, हे डॉक्टर प्रमाणें देवही बोलून चुकला आहे. मी परत जाईपर्यंत जिवंत असली म्हणजे मिळवली. रात्रीच्या गाडीनं जावं असं म्हणतों आहें. मी हिला बरोबर द्या असं कांहीं म्हणत नाहीं. कारण माझ्यावर तुमचा विश्वास नाहीं. मी आलों आहें तसाच निघून जाणार आहें. आपल्या आईची शेवटची भेट घ्यावी, असं तिला वाटत असेल तर तिनं यावं, वाटत नसेल तर येऊं नये."

मी मोठ्या बुचकळ्यांत पडलें. खरें मानावें कीं खोटें मानावें, याचा निर्णय करतां येईना. लीला यत्किंचितही डगमगली नव्हती. हें नानासाहेबांचें सारें ढोंग आहे, अशी तिची खात्री होती.

मी चंदूला फोन केला आणि बोलावून घेतलें. झालेली हकिकत ऐकतांच तोही माझ्याप्रमाणें बुचकळ्यांत पडला, त्यावेळीं लीला म्हणाली, "असं मन मागंपुढं होऊं देऊं नका. मी तुम्हांला सांगतें, कीं हें सारं ढोंग आहे. तिथं गेलों तर, हे कोणत्या पकडीत पकडतील हें सांगतां यायचं नाहीं. खरोखरीच आई अत्यावस्थ असेल तर माझं दुर्दैव म्हणून मी म्हणेन. माझी भेट न होतां तिनें देह ठेवला तरी त्याचं मला कांहीं वाटणार नाहीं. ती आई मला असून नसून सारखीच होती. तिनं मला जन्म दिला म्हणूनच तिला आई म्हणायचं झालं. केव्हांही तिनं मला प्रेमानं वागवलं नाहीं. तसं वागवतां येणं तिला शक्यच नव्हतं मुळीं! नानासाहेबांचा दराराच एवढा मोठा असे, कीं त्यामुळं ती असून नसल्यासारखीच झालेली आहे. शेवटीं मी तिला भेटायला गेलें काय, आणि न गेलें काय दोन्हीही सारखींच आहेत."

माझ्या मनाची विलक्षण खळबळ उडाली. बिचारी खरोखरीच आजारी असली, लीला भेटण्यासाठीं तळमळत असली, तर तिचा शाप माझ्या माथीं राहील. लोक खील मलाच नांवें ठेवतील. लीला आज जें म्हणते आहे तें कांहीं लोकांच्या कानीं णार नाहीं. तिचें न जाणें तेवढेंच मात्र सर्वांच्या आठवणींत राहील आणि अपेश ड्या माथीं येईल.

चंदुचें मत तसेंच पडलें. लीलेला घेऊन पुण्याला जावें असें आम्हीं दोघांनीं ठरविलें. आधीं दुसऱ्या कुठें तरी उतरायचें, स्वतः जाऊन पाहून यायचें आणि मग लीलेला घेऊन जायचें, असा बेत आम्हीं केला.

लीलाही मोठ्या नाखुषीनें यायला तयार झाली.

दुसऱ्या दिवशींच्या कोर्टाच्या कामाची व्यवस्था करून चंदू आमच्याबरोबर आला. आम्हीं आगगाडीच्या डब्यांत येऊन बसलों. त्यानंतर थोड्या वेळानें नानासाहेब प्लॅटफॉर्मवर खेटे घालीत असल्याचें दिसून आलें. त्यांच्याबरोबर आणखी दोन गृहस्थ होते. पहिल्यापासूनच संशय आल्यामुळें लीला गाडींत बसतांच बिछाना पसरून पांघरूण घेऊन निजली होती.

नानासाहेबांना पहातांच माझ्या मनांत किंतू आला. तें ढोंगच असावें असें आतां मला वाटूं लागलें. मी या बाबतींत चंदूचें मत घेतलें. कांहीं वेळ त्यालाहीं निश्चित ठरवितां येईना.

गाडी चालू झाली, तशी लीला पांघरूण टाकून उठून बसली. आम्ही खिडक्यांचे दरवाजे लावून घेतले. योगायोगानें त्या डब्यांत आम्हां तिघांखेरीज दुसरें कुणीच नव्हतें.

लीला म्हणाली, " कल्याणला उतरून मी परत निघून जातें. तुम्हीं पुण्याला जा आणि आई खरोखरीच आजारी असली तर मला तार करा म्हणजे मी लगेच निघून येईन. ज्या ठिकाणीं उतरणार आहांत तेवढा पत्ता मला लिहून द्या म्हणजे झालं. ती खरोखरीच आजारी असेल आणि तितकीच अत्यावस्थ असेल—तसंच माझ्या नशिबीं असेल तर तिची आणि माझी भेट व्हायची असेल तर होईल. न झाली तर मला त्याचा धक्का बसणार नाहीं. तुमची तार आली नाहीं तर सर्व कांहीं सुरळीत आहे असं मी समजेन. "

लीलेच्या धाष्टर्याचें मला कौतुक वाटलें. मी म्हटलें, " तूं एकटीच रात्रीच्या वेळीं परत जाशील. "

उत्तरादाखल ती नुसती हंसली आणि म्हणाली, " काकू, तूं एवढी विलायतची सफर मारून आलीस, एकटीच जाऊन आलीस आणि मला नुसतं कल्याण ते मुंबई देखील प्रवास करतां येऊं नये ? कां तुला असं वाटलं ? "

लीलेच्या उत्तरानें माझी मलाच लाज वाटली.

कल्याण स्टेशन येतांच ती शालजोडी पांघरून खालीं उतरली. तिचें तें सोंग पाहून त्या तशा परिस्थितींतही मला हसूं आलें. चंदू तितक्यांत खालीं उतरला होता. त्यानें सर्व डब्यांतून एकवार नजर टाकली. नानासाहेब आणि त्यांचे मित्र एका डब्यांत चंच्या काढून मोठमोठ्यानें हंसत गप्पा मारीत होते. त्यांची नजर चंदूकडे गेली नाहीं आणि गेली असती तरी त्याच्या साहेबी पोषाखांत त्यांनीं त्याला ओळखलें नसतें.

त्या डब्यांतच एका बाजूला एक फेरीवाला फळें विकीत होता. त्याच्याकडचीं कांहीं फळें विकत घेण्याचें मिष करून चंदू त्यांचें भाषण ऐकत राहिला. त्यांच्या बोलण्यांतील जें कांहीं चार शब्द कानीं पडले त्यावरून चंदूचीही खात्री झाली.

तो पुनः येऊन डब्यांत चढला, तो नानासाहेबांना सारख्या शिव्या देतच चढला. मी विचारलें त्यावेळीं त्यानें सर्व हकिकत सांगितली. तो म्हणाला, "कसं आम्हाला बनवलं म्हणून नानासाहेब मारे शेफारून बोलत होते. मला वाटतं स्टेशनवर उतरतांच पुन्हां लीलेला पकडून न्यायचा त्यांचा बेत असावा. त्या अर्थाचीं कांहीं वाक्यं माझ्या कानीं आलीं. लीला गेली तें एकंदरींत बरंच झालं. आतां आपण असंच माघारी फिरावं कीं काय, हें ठरवलं पाहिजे. कर्जत स्टेशनवर उतरलों तर पुन्हा परत यायला रात्रीची गाडी आपल्याला मिळेल."

मी विचारांत पडलें. मलाही चंदूसारखेंच वाटत होतें. पण नानासाहेबांची लबाडी सुद्यापत्त्यानिशीं त्यांच्या पदरांत घालून देणें आधीं अवश्य आहे असें मला वाटलें.

त्याप्रमाणें मी चंदूला सांगितलें आणि चंदूलाही तें पटलें.

त्यानंतर त्या डब्यांत दुसरें कुणी आलें नाहीं.

सारी रात्र मला झोंप लागेना. पुन्हां तोच प्रसंग आला होता. तो एकांत मला दुःसह वाटला. बोलतां बोलतां विचार मनांत येऊं लागले. खरें पाहिलें तर त्या विचारांना कांहीं आधार नव्हता. पण मनासारखा वैरी दुसरा कोणी नाहीं असें म्हणतात, त्याचा त्या रात्रीं मला प्रत्यय आला. अर्ध्या रस्त्यावरून लीलेला मुंबईंत पाठवून आम्ही दोघेंच पुण्यास गेलों, हें जर सरूबाईला कळलें तर त्याचा काय परिणाम होईल ?

माझ्या अंगावर कांटा उभा राहिला. डब्यांतील दिवे मालवले होते. मी उठलें आणि दिवे पेटविले.

तसें करण्याची माझी मलाच लाज वाटली. दिवे पेटविलेले पाहतांच चंदूही उठून बसला. त्यालाही झोंप लागली नव्हती. माझ्याप्रमाणेंच त्याच्याही मनांत विचार येत होते काय?

तो म्हणाला, "झोप नाहीं का येत? हा गाडीचा खडखडाट फार वाईट. त्यांतून जरा डोळा लागलाच तर स्टेशनवर गाडी उभी रहातांच आपोआप जाग येते. म्हणूनच मला हा रात्रीचा प्रवास आवडत नाहीं."

मी म्हटलें, "मलाही तसंच झालं आहे. पुण्याला जाईपर्यंत आपण आपलीं बोलतच बसूं."

चंदू म्हणाला, "काय बोलायचं? बोलायचं तेवढं सर्व होऊन गेलं आहे. आतां बोलायला विषयच राहिला नाहीं. लीला जर बरोबर असती तर नानासाहेबांच्या गोष्टी तरी बोललों असतों–पण नानासाहेबांची गोष्ट बोलण्यांत आतां स्वारस्य राहिलं नाहीं."

काय बोलावें हें मला सुचेना आणि बिछान्यावर अंगही टाकवेना. त्या एकांताचा मला संकोच वाटत होता.

पुन्हां वाटलें, कर्जतला उतरून मागें परत जावें. पण तसें करणें भ्याडपणाचें झालें असतें. नानासाहेबांचा गुन्हा त्यांच्या पदरांत घालणें अवश्य होतें.

जिवाचा धडा करून मी पुन्हां बिछान्यावर पडलें. चंदूनेंही डोक्यावरून पांघरूण ओढून घेतलें.

त्या रात्रीं मला चांगलीशी झोंप लागली नाहीं. पहाटे गाडी स्टेशनांत आली त्यावेळीं चंदूचे मित्र आपली मोटार घेऊन स्टेशनवर आले होते. आम्ही सेकंड क्लासांत असल्यामुळें नानासाहेब आपल्या डब्यांतून उतरून दरवाज्यावर येण्यापूर्वींच आम्हीं मोटारींत बसून निघून गेलों होतों. आम्ही जाईपर्यंत ते उतरल्याचें आम्हांला दिसून आलें नाहीं.

आम्हीं सरळ गेलों ते चंदूच्या मित्रासह नानासाहेबांच्या घरीं गेलों.

दरवाजा बंद होता. आम्ही ठोठावतांच तो उघडला गेला.

दारांतच लीलेची आई उभी होती. आम्हांला पहातांच ती मोठ्यानें ओरडली, "अगबाई! तुम्ही? लीला कुठं आहे?"

## प्रकरण चौदावें : तरुण पिढी

सर्व्या गोष्टींचा एकदम उलगडा झाला. नानासाहेबांची ही लबाडी बेमालूम होती, हें पुराव्यानिशीं ठरलें.

मी म्हटलें, " लीला कुठं आहे म्हणजे ? "

ती कांहीं वेळ माझ्या तोंडाकडे नुसती पहातच राहिली. जसे कांहीं माझे उद्गार तिला कळलेच नाहींत. मी पुन्हां विचारलें, " असा प्रश्न कां केला ? "

ती म्हणाली, " लीला फार आजारी होती ना ? "

" छान क्लृप्ति ! " चंदू उद्गारला. " इकडे आम्हांला सांगायचं, कीं तुम्ही आजारी आहांत म्हणून—अत्यावस्थ आहांत म्हणून—आणि तिकडे तुम्हाला सांगायचं लीला आजारी आहे म्हणून—युक्ति छान यांत शंका नाहीं ! "

" म्हणजे ? लीला आजारी नाहीं तर ? " तिनें पुन्हा विचारलें.

आम्ही उत्तर देणार इतक्यांत नानासाहेबांची स्वारी थडकली. आल्याबरोबरच त्यांनीं जमदग्नीच्या अवताराचा आव घातला. ते मोठ्यानें ओरडले, " चालते व्हा

माझ्या घरांतून. हरामखोर ! माझी मुलगी पळवली ती पळवली आणि वर इथं येऊन माझी बदनामी करतां का ? ”

चंदू म्हणाला, “ अजून बदनामी केली नाहीं. विचारा तुमच्या बायकोला ? तुम्हाला यायला तसा वेळ लागला असता तर बदनामी नव्हे—तर तुमचा कांगावा तुमच्या कुटुंबाला योग्य शब्दांत सांगितला असता ! ”

नानासाहेब तशाच उग्र स्वरूपांत म्हणाले, “ माझा कांगावा का ? कुणी कांगावा केला ? कसला कांगावा केला ? ”

“ तेंच सांगतों आहें ,” चंदू म्हणाला, “ तुम्ही मथूच्या घरीं जाऊन जे रडलां, आसन्नमरण आहे म्हणून जिच्याबद्दल सांगितलं, ती हीच ना ? ही आसन्नमरण आहे का ? ”

“ बरं, बरं ! सांगितलं—” नानासाहेब म्हणाले, “ काय बिघडलं त्यांत सांगितलं म्हणून ? तुम्ही माझ्याशीं डाव केलात कां ? स्टेशनवरून माझी मुलगी पळवून आणलीत—”

“ थांबा—कुणी मुलगी पळवून आणली ? ” चंदू म्हणाला, “ तुमची मुलगी आपणहून आमच्याकडे आली होती. तुम्ही गावांतल्या एका गांवगुंडाशीं तिचं लग्न करून देण्याचं ठरवण्याइतका निर्घृणपणा केला, म्हणून ती तुमचं घर सोडून आश्रयासाठीं आपल्या काकूकडे आली. ती शाळेंत जात होती. चांगली मार्गाला लागली होती. असं असतां, ती शाळेंत जात असतांना तिला रस्त्यांत गांठून तुम्हीं गाडींत घालून पळवून नेण्याचा प्रयत्न केला. मग मुलीला पळवलं कुणी ? तुम्हीं कीं आम्हीं ? ती होऊन आमच्याकडे आली होती. आम्हीं कांहीं तिला धरून पकडून गाडींत घालून आमच्या घरीं घेऊन गेलों नव्हतों ! ”

नानासाहेब बोलतांना चाचरूं लागले. ते म्हणाले, “ असेल, असेल, तसंही असेल. मुलगी माझी आहे. माझी तिच्यावर सत्ता आहे. मी तिचं काय वाटेल तें करीन. माझा मी मुखत्यार आहें. तुम्ही कोण माझ्या मुलीची उठाठेव करणार ? ”

“ तें कोर्टानंच ठरवलं ! ” चंदू शांतपणें म्हणाला, “ मुलगी तुमची खरी पण तिचं वाटेल तें करीन म्हणणं सोपं नाहीं. मुलगी पोटची असली तरी विकतां येत नाहीं. सज्ञान असेल तर तिच्या इच्छेविरुद्ध तिला वाटेल त्याच्या गळ्यांत बांधतां

येत नाही. ती अज्ञान असतांना तिचं लग्न करून टाकलं असतं, म्हणजे हा प्रसंग आला नसता. ज्याअर्थीं सज्ञान होईपर्यंत तिला राहूं दिलीत त्याअर्थी आतां सर्व गोष्टी तिच्याच मुखत्यारीनं झाल्या पाहिजेत! ”

नानासाहेबांनीं सरळपणानें उत्तर देण्याऐवजीं अद्वातद्वा बोलण्यास प्रारंभ केला. समोर चांगल्या कुटुंबवत्सल बायका आहेत हें सुद्धां ध्यानीं न घेतां त्यांनीं गलिच्छ आणि ओंगळ भाषा वापरण्यास सुरवात केली. आपण बोलत आहोंत तें आपल्या मुलीसंबंधीं बोलत आहों, हें सुद्धां त्याच्या ध्यानीं आलें नाहीं, इतकी ती भाषा गलिच्छ होती.

मी चंदूला म्हटलें, “ चला आपण निघून जाऊं. ”

नानासाहेब दरवाजा अडवून म्हणाले “ कुठं चाललांत? मी असा सिध्या बोलानं तुम्हाला जाऊं देईन का? माझ्या इच्छेविरुद्ध तुम्हीं माझ्या घरांत पाऊल टाकलं आहे. कोर्टांत तुमच्यावर फिर्याद लावून तुमच्या हातांत हातकड्या ठोकीन. तुमची बदमाषगिरी प्रत्येक वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध करायला लावीन. मी कोण आहें हें तुम्ही विसरलांत. वाटेल त्याची बदनामी करण्याची माझी ताकद आहे. हवं तें बालंट घालीन पण तुम्हांला एकदां तुरुंगांत डांबल्याशिवाय सोडणार नाहीं. ”

लीलेच्या आईला तें त्यांचें वर्तन आवडलें नाहीं. तिनें हात धरून ओढून त्यांना घरांत आणलें आणि आम्ही त्यांच्या उंबरठ्याबाहेर पाऊल टाकलें.

चंदूचे मित्र या सर्व गोष्टींना साक्षी होतेच. त्यांनासुद्धां आश्चर्य वाटलें. घरीं जातांच आम्ही सारी हकीकत त्यांना सांगितली. त्यांनाही नानासाहेबांचा तिटकारा आला.

दुपारच्या गाडीनें आम्ही पुन्हां मुंबईला आलों. आलों ते सरळ माझ्या खोलीवरच गेलों. लीला शाळेंत गेली नव्हती. आमची वाट पहात घरींच राहिली होती. आम्हांला परत आलेलीं पाहतांच तिनें पहिले उद्गार काढले, “ झाली ना खात्री? ”

मी म्हटलें, “ एकूण तूंच शहाणी ठरलीस. कशी मी फसलें याचं माझं मलाच आश्चर्य वाटतं. पूर्वीच्या अनुभवावरून तरी मी सावध व्हायला हवं होतं. पण जीव जायच्या गोष्टी ज्यावेळीं त्यांनीं काढल्या त्यावेळीं मला शंका वाटली.

खरोखरच तुझी आई आजारी असती—आसन्नमरण असती आणि नुसत्या संशयानं आम्ही तुला पाठवलं नसतं तर जन्मभर तें मनांत डांचत राहिलं असतं. जाण्याची खेप उगीच पडली पण तेवढ्यानं शहाणपणा मिळवला. ”

लीलेनें चहा ठेवला आणि चहा घेऊन चंदू जायला निघाला. जातांना त्याचें तोंड अगदीं गोरेमोरें झालें होतें. घटकाभर रहावें आणि बोलत बसावें, असें त्याच्या चेहऱ्यावरून त्याला वाटत असावें असें दिसलें. तो जाण्यासाठीं मागें पुढें करीत होता, तें पाहून मी म्हटलें, “ घरीं काय सांगून निघाला होतास ? ”

“ खोटंच बोललों होतों. ” चंदू म्हणाला, “ खोटं बोलल्याखेरीज गत्यंतर नव्हतं. खरं बोललों असतों तर मला तुझ्या बरोबर येतां आलं नसतं. उद्यां सकाळीं परत येईन असं मी सांगितलं आहे आणि आतांच जर परत गेलों तर तिला संशय येईल. कोर्टांतच काम आहे म्हणून सांगितलं आहे. कोर्टाचीं कामं दुपारीं असतात, असं असतां भर दुपारींच निघून येणं मला शक्य झालं, हें तिला खरं वाटणार नाहीं. ”

“ मग राहानात का ? ” लीला म्हणाली, “ केलंत ते ढोंग पुरं करा. उद्यां सकाळींच उठून निघून गेलं म्हणजे सरुबाईला खरं वाटेल. ”

जायला निघालेला चंदू पुन्हां खुर्चीवर बसला. लीलेनें जरी माझ्या मनांतलीच गोष्ट सांगितली होती, तरीही तिनें तसें म्हटलेलें मला आवडलें नाहीं. माझ्या मनांतील या परस्परविरुद्ध अशा दोन लहरी पाहून माझें मलाच आश्चर्य वाटलें.

मी म्हटलें, “ तारीख लांबवली असं सांगून गेलास तर नाहीं का चालायचं ? ”

चंदू क्षणभर डोकें धरून बसला. त्याच्या कपाळाला आठ्या पडल्या होत्या.

लीला म्हणाली, “ तुझं आपलं भलतंच काकू. काय झालं एक रात्र इथं राहिले तर ! मी आहें ना इथं ? ”

लीलेचा तो उद्गार बाणासारखा माझ्या वर्मी बसला. तिनें कां म्हणावें ? ‘ मी आहे ना इथं ? ’ एकूण तिला देखील कळूं लागलें. माझा संकोच कुठें आहे याची कल्पना लीलेच्याही ध्यानांत आलेली पाहून मला शरम वाटली. काय करावें हें मला कांहींच सुचेना.

चंदू खुर्चीवर आपलें कपाळ चोळीत बसला होता. चटकन् कांही तरी निश्चय करून उठून त्यानें डोक्याला टोपी घातली आणि 'मी जातों' असें अगदीं तुटकपणानें म्हणून खोलीबाहेर पडला.

तो रस्त्यावरून दिसेनासा होईपर्यंत लीला बाहेर गॅलरींत रस्त्याकडे पहात होती. तो दृष्टीआड होतांच ती आंत आली आणि म्हणाली, " वडील माणसं आहेत म्हणून म्हणूं नये—पण हा शुद्ध मूर्खपणा आहे. मन निर्मळ असेल तर जगाची पर्वा कां बाळगावी ? "

मी म्हटलें, "मनाच्या निर्मळपणाचा आणि लोकप्रवादाचा यत्किंचितही संबंध नाहीं. मन कोण पाहतं आहे ? प्रत्येकजण दर्शनी पुराव्यावर लक्ष देतो, म्हणून जगाला भ्यावं लागतं. त्यांतूनही ज्याला सार्वजनिक आयुष्य कंठायचं असतं त्यानं आपल्यावर प्रवाद न येऊं देण्याबद्दल फार खबरदारी घ्यावी लागते. साधारणतः कोणत्याही सार्वजनिक मनुष्यावर आरोप करण्यासाठीं लोक अगदीं टपून बसलेले असतात. म्हणूनच त्यांना इतर कुणापेक्षांही जास्त सावध राहणं भाग असतं. चंदूनं जाऊं नये, असं मलासुद्धां वाटत होतं; पण मी कांहीं त्याला आग्रह केला नाहीं—"

लीला मधेंच म्हणाली, " हा तुझा भेकडपणा आहे काकू ! कसंही वागलं तरी नांव ठेवायचीं असलीं, कीं लोक मागंपुढं पहात नाहींत. मनाकडे तर कुणीच पहात नाहीं. असं जर आहे तर लोकांना भ्यावं तरी काय म्हणून ? लोक नांवं ठेवतील म्हणून भिऊन जर मी राहिलें असतें, तर जन्माची दुःखी होऊन बसलें असतें. व्हायचा तो सारा बोभाटा झाला. वर्तमानपत्रांतून माझी सारी हकीकत आली. लोक चार दिवस चर्चा करतील आणि उद्यां स्वस्थ रहातील. कुणाच्या ध्यानांतसुद्धां राहणार नाहीं माझी गोष्ट ! उद्यां मी तसंच कांहीं नांव गाजवलं तर पूर्वीच्या गोष्टी कुणी काढणार सुद्धां नाहीं. कदाचित् ती पूर्वीची गोष्ट माझी तारीफ करण्यासाठीं पुढं आणतील. तुला नाहीं असं वाटत ? "

मी म्हटलें, " फार दिवस विलायतेंत राहिल्यामुळं इकडल्या लोकांची मनःस्थिती मी विसरून गेलें आहें. हें कांहीं वेळानं माझ्या ध्यानीं येतं. माझं आयुष्य सर्वस्वीं दुःखांत गेलं होतं म्हणून पूर्वीचे ते दुःखाचे दिवस विसरून टाकायचा मी सराव केला आहे. आठवण करायची म्हणून मुद्दाम प्रयत्न करावा लागतो, इतकी त्या हकीकतीवर मी माती ओढली आहे. त्यामुळं इथल्या माणसांच्या मनोवृत्तीची

मला केव्हां केव्हां विस्मृति होते. दोन्ही प्रकार मी अनुभवले आहेत. माझी निंदाही झाली आहे, स्तुतीही झाली आहे; पण त्या निंदास्तुतीची मी पर्वा केली नाहीं आणि म्हणूनच आज ही अशी उभी आहें. हें जेव्हां आठवतं तेव्हां तुझं म्हणणं बरोबर आहे, असं वाटूं लागतं—"

लीलेच्या चेहऱ्यावर अभिमानाचें हंसे झळकलें. तिला वाटलें कीं आपण आपल्या विद्वान काकूवर मात केली—म्हणूनच मी म्हटलें, " तात्त्विक दृष्ट्या तुझं म्हणणं जरी बरोबर असलं, तरी सार्वजनिकदृष्ट्या तें ग्राह्य ठरणार नाहीं. फार कशाला, माझं मलाच वरं वाटेना. तूं इथं आहेस तरीही चंदूनं या वेळीं इथं रहावं असं कांहीं केल्या माझ्या मनाला पटेना. तुझ्याकडून लपवून कशाला ठेऊं ? पण तूं गाडींतून निघून गेलीस आणि आम्ही डब्यांत दोघं एकटीच होतों त्या वेळीं देखील मी बेचैन झालें. सारी रात्र मला स्वस्थपणानं झोंप लागली नाहीं. हा मनावरचा धर्म मनुष्याला कसा अस्वस्थ करतो, तें तुला आज सांगून कळायचं नाहीं. तशी परिस्थिति यावी लागते. ईश्वर करो आणि ती परिस्थिती तुझ्या नशिबीं न येवो म्हणजे झालं. विधवेचं जिणं मोठं दुर्धर आहे!"

माझे ते उदासीन उद्गार ऐकून लीलेला वाईट वाटलें. ती अगदीं ओशाळून म्हणाली, " माफ कर काकू. माझी चूक झाली. मी तसं बोलायला नको होतं. हें तूं कुंकूं लावतेस ना—त्यामुळं तूं विधवा आहेस हें माझ्या ध्यानांतच येत नाहीं. "

त्या औदासीन्याच्या छायेंतसुद्धां माझ्या चेहऱ्यावर हास्याची छटा आलेली लीलेला दिसून आली. मला एकप्रकारचा अभिमान वाटला. एक कुंकूं लावल्यामुळें अगदीं जिव्हाळ्याच्या नातेवाइकांना सुद्धां माझ्या वैधव्याची विस्मृति झाली, हा माझ्या प्रयोगाचा मोठा जय झाला, असें मला वाटलें.

लगेच पुन्हां मनांत आलें, कीं लीलेला विस्मृति झाली हें ठीक झालें. पण हें कुंकूं लावण्याचा चंदूच्या मनोवृत्तीवर परिणाम होतो आहे का? माझें वैधव्य तो विसरतो आहे का? किंवा विसरत नसून बळेंच त्याच्या उलट समज करून घेतो आहे ?

लीला म्हणाली, " कसला विचार करते आहेस काकू ? "

मी उत्तर दिलें, " विचार करण्याजोग्या पुष्कळच गोष्टी माझ्या आयुष्यांत घडल्या आहेत. त्या केव्हां केव्हां अशा जाग्या होतात. मला ती पूर्वीची एक गोष्ट आठवली.

तुला मी इंग्रजी शिकवीत होतें त्यावेळीं ती इंग्रजी अक्षरांची पाटी पाहून नानासाहेबांनीं लाथ मारून फोडून टाकली होती. तुला इंग्रजी शिकवणं मी तेव्हांपासून बंद केलं होतं. पण मी विलायतेला गेल्यानंतर तूं नुसती इंग्रजी शाळेंत जाऊं लागलीस--नव्हे नानासाहेबांनीं आपखुषीनं तुला इंग्रजी शाळेंत कसं पाठविलं आणि इतकं शिक्षण कसं दिलं, याचंच मला आश्चर्य वाटतं."

"तें असं आहे," लीला म्हणाली, "हा केसरी ऑफिसचा परिणाम आहे. तिथली हवा हल्लीं बरीच निवळूं लागली आहे. पूर्वीच्या इतकी कर्मठता तिथं राहिली नाहीं. केसरी ऑफिसांतल्या मोठमोठ्या संपादकांच्या मुली इंग्रजी शाळेंत जाऊं लागल्या आहेत. मला शाळेंत पाठवतांना त्यांनीं तोच आधार घेतला होता. हल्लींचे तिथले संपादकही जुन्या नव्याच्या सीमेवर उभे राहणारे आहेत. त्यांच्या मताचा परिणाम नानासाहेबांवर झाल्यामुळं माझं दैव उघडलं."

मी हंसून म्हटलें, "एवढ्याच कारणावरून जर मुलींना शिक्षण मिळत असेल तर ईश्वर करो आणि असेच संपादक केसरीला कायमचे लाभोत, असं मी म्हणेन. मला हें मोठं कोडं होतं पण तें इतक्या सोप्या रीतीनं उलगडेल असं मला वाटलं नव्हतं. केसरीचं नांव घेतलं, तेव्हां आतां मुळीं बोलायचं कांहीं राहिलं नाहीं. नानासाहेबांना तें वेदवाक्य आहे, हें मला माहीत आहे."

जुन्या गोष्टींच्या आठवणी काढून प्रस्तुत परिस्थितीशीं तुलना करीत आम्हीं त्या रात्रीं किती तरी वेळ बोलत बसलों होतों. नानासाहेबांच्या स्वभावांतला दुराग्रह लीलेच्या स्वभावांत उतरला आहे, हें मला स्पष्ट दिसत होतें. पण योग्य कामीं लावल्यामुळें त्या दुराग्रहाचें चिकाटींत रुपांतर झालें होतें, एवढेंच.

आम्हीं बोलत बसलों आहोंत इतक्यांत चंदू परत आला. दरवाजा ठोठावला गेला त्याचवेळीं मला शंका आली. इतक्या रात्रीं माझ्या दारावर कोण दुसरें ठोठावणार?

दरवाजा उघडला आणि चंदू आंत आला.

त्याचा चेहरा अगदीं भयानक झाला होता. आंत येतांच त्यानें एका आराम खुर्चीवर अंग टाकलें.

मी कांहींच विचारलें नाहीं. त्याच्या त्या मनःस्थितींत त्याला कांहीं विचारावें असें मला वाटलें नाहीं. लीला मात्र कारण जाणण्यासाठीं अतिशय उत्सुक झाली होती, असें तिच्या मुद्रेवरून दिसत होतें.

तो आपण होऊनच म्हणाला, " शेवटीं व्हायचं तेंच झालं. तिला त्याचा संशय आला. पुन्हा आमचं रण माजलं. ती आज इतकं कुचकट बोलली, कीं तीं तसलीं बोलणीं ऐकल्यानंतर एक क्षणभरही तिच्या आसपास रहावं असं मला वाटलं नाहीं म्हणून निघून आलों. तिला सांगून आलों आहें, कीं उद्यां सकाळीं ती निघून गेल्याचं कळल्याशिवाय मी पुन्हां घरीं पाऊल टाकणार नाहीं. त्यानंतर तिनं जे उद्गार काढले, ते इतके घाणेरडे होते, कीं त्यांचा उच्चार न करणंच बरं ! "

त्या उद्गारांची मला कल्पना होती.

पण मला मोठें कोडें पडलें. जें नको होतें तेंच घडून आलें. चंदूला मी घालवून दिला होता. तो रहावा असें मला वाटत असूनही घालवून दिला होता, ही माझी चूक झाली का? सकाळपर्यंत तो राहिला असता तर हीं रणें माजलीं नसतीं. आतां जें व्हायचें तें झालें—आणि जें होऊं नये होतें, तें झाल्याशिवायही गत्यंतर नाहीं, असा प्रसंग येऊन ठेपला.

माझ्या आयुष्यांत येणाऱ्या या वेगवेगळ्या विकट समस्या पाहून माझें मन बावरून जात असे. कधींच कांहीं सुरळीत होऊं नये, असा हा माझा योगायोग तरी काय?

किती तरी वेळ आम्ही बोलल्याशिवाय स्वस्थ बसलों. लीलेच्या उतावीळ स्वभावाला ती स्तब्धता कठीण वाटली. ती शेवटीं बोललीच.

लीला म्हणाली, " तुम्हां दोघांपेक्षां शेवटीं मीच शहाणी ठरूं लागलें आहें. जाऊं नका, म्हणून मी तुम्हांला सांगत होतें पण तुम्ही गेलांत. काकूंनंही तुम्हांला जायला भाग पाडलं ! पण आतां काय झालं? दोन पिढ्यांच्यामधलं हें अंतर असं आहे. मला वाटतं लहान मुलांनीं वडील माणसांचं ऐकायचे दिवस आतां हळू हळू मागं पडत जाऊन वडील माणसांनीं उलट लहान मुलांच्याच मतानं वागायचे दिवस येऊं लागले आहेत. मला वाटतं, असे दिवस येणार असं आगरकरांनींच भविष्य वर्तवलं होतं. आगरकरांचं नांव आमच्या घरांत वर्ज आहे.—नानासाहेब केसरी ऑफिसांत असतात कीं नाहीं?—असं हें वर्ज झालेलं नांव आहे तरी काय, याचा तपास मी जेव्हां करूं लागलें, त्यांचीं पुस्तकं जेव्हां वाचूं लागलें, तेव्हां माझ्या डोक्यांत प्रकाश पडला. त्यामुळंच ना मी ही अशी झालें?— "

लीला सारखी आगरकरांच्या लेखांबद्दल बोलत होती. निरनिराळ्या विषयावरचीं त्यांची निरनिराळीं मतें, पोषाखाच्या प्रकारांत देखील फरक करण्याची त्यांची सूचना, सकृद्दर्शनीं वाटणारा त्यांचा विक्षिप्तपणा, जुन्या पद्धतीच्या लोकांकरवीं हयातींत झालेला त्यांचा छळ आणि मेल्यानंतर त्यांच्या लेखावर पडलेला बहिष्कार वगैरे गोष्टींचें तिनें सारखें पुराण लावलें होतें. त्या मनःस्थितींत तिच्या त्या बडबडण्यानें जिवाला विरंगुळा आला.

चंदू म्हणाला, " मी इथं या खुर्चीवरच झोंप घेतों. झोंप कसली येणार आहे म्हणा—तिच्या कुचक्या शब्दांचं भाषण असं भेदून गेलं आहे, कीं झोंप येणं आतां शक्य नाहीं. पडेन असाच खुर्चीत सारी रात्र तळमळत ! सकाळीं ती गेली तर मला येऊन कळीव, असं गड्याला सांगून ठेवलं आहे. येतांना पैसे फेंकून आलों आहें. माझी खात्री आहे, कीं ती बहुतेक रहाणार नाहीं."

" माझी खात्री आहे कीं ती कांहीं केलं तरी जाणार नाहीं !" लीला ठांसून म्हणाली.

" तुला फार अभिमान झाला आहे ! " लीलेला चंदू म्हणाला, " एकाददुसऱ्या गोष्टींत तुझं भविष्य बरोबर उतरलं म्हणून तें आतांही उतरेल, असं मात्र समजूं नकोस. "

लीला म्हणाली, " एक-दोन-तीन ! दोन गोष्टी बरोबर आल्या तिसरीही आलीच पाहिजे. माझी अगदीं खात्री आहे. "

चंदू कपाळाला आठ्या घालून म्हणाला, "तिथं काय झालं तें तुला माहीत नाहीं म्हणून असं बोलते आहेस. जाऊं द्या. हातच्या कांकणाला आरसा कशाला ! "

ती रात्र तशीच गेली. मला त्या रात्रीं झोंप लागली नाहीं. लीला मात्र अगदीं सुश्रांत झोंपीं गेली होती.

दुसरा दिवस उजाडला. आम्ही चहा घेत बसलों होतों. इतक्यांत गडी आला. चंदूचा चेहरा खुलला. लीला उत्कंठित झाली.

गडी म्हणाला, " बाई गेल्या नाहींत आणि म्हणतात कीं जाणार नाहीं. शेटना त्यांनीं बोलावलंय् ! "

चंदूचा चेहरा पडला.

लीला म्हणाली, " काकू, दे टाळी ! "

## प्रकरण पंधरावें ........................ पांढरें पातळ

चंदू पुन्हां डोकें धरून बसला. ती जाणार अशी त्याची खात्री होती. त्या खोट्या आशेमुळें त्याला जास्त धक्का बसला.

पहिल्यापासूनच मला संशय होता, त्यामुळें मला त्याचें फारसें आश्चर्य वाटलें नाहीं.

एक उसासा टाकून चंदू म्हणाला, " नाहींच तें ! नाहींच तें ! पुन्हां परीक्षेला बसलं पाहिजे. कुठली मला ही बुद्धि झाली वकिलीची ? यापेक्षां डॉक्टरींत असतों तर दवाखान्यांत चोवीस तास डांबून तरी घेतां आलं असतं. कांहीं कुणाला कळलं नसतं. डॉक्टरांच्या गृहस्थितीकडे सहसा कुणी पहात नसतं, पण वकिलाचा धंदा म्हणजे खुंटावरच्या न्हाव्यांची सभा. रिकामे वकीलच फार. त्यामुळं गांवच्या कुचाळ्या करायला त्यांना फावतं. आतां कोर्टांत तोंड दाखवायची सोय नाहीं. घरीं जायचं नाहीं, हा तर माझा निश्चय आहे. कुठं तरी माधवाश्रमांत नाहीं तर सरदारगृहांत जाऊन राहीन ! मग चालवूं दे कसं घर चालवते ती ! दमडीसुद्धां देणार नाहीं. घरवाला भाड्यासाठीं आला म्हणजे आपोआप डोळे उघडतील. मग जाईल

आपोआप निघून माहेरीं. त्याखेरीज आतां उपाय नाहीं. ती त्रागा करते आहे? मीही आतां त्रागाच करणार!"

मी तरी काय सांगणार होतें. माझ्याकडे येऊन रहा, असें म्हणणें मला शक्य नव्हतें. तसें असतें तर मीच नाहीं का त्याच्या घरीं जाऊन राहिलें असतें? त्याची स्थिति पाहून मला फार कींव आली.

पण नुसती कींव करून त्याचें दुःख थोडेंच हलकें होणार होतें? त्याचें दुःख त्यानेंच सोसल्याखेरीज आतां दुसरा उपाय नव्हता. समाधानाचे चार शब्द बोलावे म्हटले, तर त्यालाही जागा नव्हती.

लीला म्हणाली, "एवढ्याचसाठीं मला वाटतं, कीं लग्न करूं नये. कोण कसा मिळेल, हें कांहीं सांगतां यायचं नाहीं. जन्मभर नवराबायको सुखासमाधानांत राहिलेलीं दिसतात. पण अगदीं मातृपदाच्या सीमेवर त्यांचं वितुष्ट आलेलं दिसून येतं; आणि मग कांहीं त्या गांठी तोडतां येत नाहींत!—नकोच तें लग्न!"

चंदू उठला आणि कपडे करूं लागला.

मी म्हटलें, "आतां कुणीकडे जाणार आहेस?"

कांहींच न बोलतां तो कपडे करून बाहेर गेला. त्याचा कांहीं निश्चित बेत ठरला असावा, असें त्याच्या मुद्रेवरून दिसत नव्हतें.

मी पूर्वीची आठवण नजरेसमोर आणूं लागलें. ती पूर्वीची धीर गंभीर वृत्ति आतां कुठें गेली? एका विषमविवाहापायीं सरळ आणि सुध्या जिवाची काय माती झाली ही! आणि हें कोडें आतां सुटावें कसें? अशा परिस्थितींत चंदूनें काय करावें? मी पुष्कळ योजना नजरेसमोर आणून पहिल्या पण प्रस्तुतच्या प्रसंगाला जुळेल अशी एकही योजना मला सुचेना.

लीला म्हणाली, "कसला विचार करते आहेस काकू?"

मी उत्तर दिलें, "आतांच्या या परिस्थितीचा. तूंच सांग, चंदूनं आतां काय करावं?"

"रडावं!" लीला म्हणाली, "अगदीं मनसुराद रडावं. जीं माणसं पुढला विचार न करतां लग्नाच्या पाशांत सांपडतात, त्यांची कशाला कुणी कींव करावी? काय हा निर्बुद्ध होता? काय याला डोळे नव्हते? कीं तपास करतां येत नव्हता? मुलगी कशी आहे? तिची गृहस्थिती कशी आहे? घरचीं माणसं कोणत्या मताची

आहेत ? आपलं आणि तिचं जन्माचं नातं जुळेल कीं नाहीं, याचा चांगला विचार करून, चांगली कसोटी लावून, मग त्यानं कां रुकार दिला नाहीं ? आणि आतां हा प्रसंग आला तर दोष दुसऱ्या कुणाला द्यायचा ? मग आहेच कीं प्राक्तन ! माझ्या प्राक्तनीं तसं नव्हतं, असं म्हटलं, कीं सारीं कोडीं आपोआप उलगडतात. पण चुलींत हात घालून भाजायचा आणि मग पूर्वकर्माला रडायचं कशाला ?"

लीलेचे ते उद्गार ऐकून मी शरमिंधी झालें. एवढीशी कालची मुलगी या नात्यानें जिला मी पहात होतें ती आज मला बुद्धि शिकवूं लागली ! आणि तिला कांहीं उत्तर मला देतां येईना याचें मला मोठें कौतुक वाटलें. पुढील पिढी मागल्या पिढीची जनक आहे, असें एका आधुनिक तत्त्वज्ञान्यानें म्हटलें आहे, तें यावेळीं मला पटूं लागलें.

मी शाळेंत गेलें आणि लीलाही शाळेंत गेली. शिकवण्याकडे माझें लक्ष लागत नव्हतें. चंदूचें काय झालें असेल याचा विचार सारखा नजरेसमोर उभा रहात होता. तो जेवला असेल कीं उपाशी असेल, कोर्टांत गेला कीं दुसऱ्या कुठें भटकला, त्या दिवशीं त्याची कोर्टांत केस असली तर तिची काय वासलात लागली, कीं दुसऱ्या एकाद्या वकीलाला सांगून त्यानें आपल्या केसची व्यवस्था करण्याइतकी तरी आपल्या धंद्याची आठवण ठेवली होती का ? असे एक ना दोन, हजारों विचार समोर येऊं लागले. माझें अवधान शिकवण्याकडे नाहीं, हें मुलींना देखील समजल्यासारखें दिसलें. एका मुलीनें तर प्रत्यक्ष 'प्रकृति बरी नाहीं कां बाई ?' असा उघड उघड प्रश्न केला.

मी सावध होण्याचा प्रयत्न केला आणि मनांतले विचार बाजूला झुगारून शिकवण्याच्या कामावर चित्त स्थिर केलें.

संध्याकाळीं घरीं आलें त्यावेळीं लीला आधींच आली होती. मी येतांच तिनें पाहिला प्रश्न केला, "कांहीं हकिकत कळली का ?"

मी मानेनेंच नाहीं म्हटलें आणि आपल्या खोलींत गेलें. लीला माझ्या मागोमाग खोलींत आली आणि म्हणाली, "मी जाऊन त्यांच्या घरीं चौकशी करून येऊं का ?"

मला प्रश्न पडला. चंदूच्या घरची हकिकत कळण्याविषयीं मला तळमळ लागली होती; पण लीलेनें त्याच्या घरीं जावें असें वाटत नव्हतें. सरुबाई तिला कांहीं टाकून बोलली तर ? मी स्वतः असतें तर एक सहन करून घेतलें असतें पण लीला ताड--

कन् उत्तर दिल्यावांचून राहणार नाहीं, अशी माझी खात्री होती. उगीच भांडणें जुंपायचीं—त्यापेक्षां चौकशी न करणेंच बरें असें ठरवून मी लीलेला म्हटलें, " मला वाटतं थोड्या वेळानं चंदूच इकडे येईल. तोपर्यंत आपण धीर धरूं. तुझ्यासारखीच मीही उतावीळ झालें आहें. पण तीथं तूं जाणं कांहीं बरं नाहीं. "

लीला म्हणाली, " मी जाऊं नये असं तुला कां वाटतं, त्याची मला कल्पना आहे. पण त्याची काळजी तूं करूं नकोस. माझी मी चांगली खंबीर आहें. सरुबाई मला कांहीं बोलली तर त्याची मी मुळींच पर्वा करणार नाहीं. तिला उत्तरही देणार नाहीं. मला अगदीं तळमळ लागली आहे. अगदीं उगीच मन दुःश्चित झालं आहे. एकदां जिवाची खात्री करून आल्याशिवाय मला समाधान वाटणार नाहीं. तुझी हरकत नसेल तर मी एकदां जाऊन येतें. "

माझी इच्छा नव्हती, तरीहि तिच्या शब्दासाठीं मी कबुली दिली आणि ती चंदूच्या घरीं जायला निघाली.

ती जाऊन पोंचून दहा मिनिटें झालीं नाहींत तोंच चंदू आला. त्याला पाहतांच मी विचारलें, " काय खबर आहे ? "

कांहीं न बोलतां तो खुर्चीत बसला आणि बसत असतां डोक्यावरची टोपी एकीकडे आणि काठी एकीकडे फेकून देऊन म्हणाला, " आतां कसली खबर ? खरं सांगू तुला—सारा दिवस मी उपाशी आहें. स्नानसुद्धां केलं नाहीं. एक दोन वेळां दुकानांत चहा घेतला तेवढाच. पाव मस्का मागवला पण तो देखील घशा-खालीं उतरेना अशी जिभेला कोरड पडली होती. "

मी म्हटलें, " मग स्नान करतोस का ? पाणी तापवायला सांगू का ? जेवण आतां व्हायचं आहे. घासभर गरमसा आमटीभात खाऊन घे. तेवढंच बरं वाटेल. असा उपास करून काय होणार ? जे झालं तें आतां होऊन गेलं. त्याला आतां कांहीं उपाय नाहीं. जिवाला त्रास करून घेण्यांत काय अर्थ आहे ? "

" हेंच—हेंच मला पाहिजे होतं ! " चंदू वेड्यासारखं बोलला.

" काय पाहिजे होतं ? " मी विचारलें.

" कांहीं नाहीं. " असें म्हणून डोक्यावर हात ठेऊन तो स्वस्थ खुर्चीवर पडला.

मी आंत जाऊन बाईना पाणी तापवायला सांगितलें. स्नानासाठीं द्यायच्या धोतराची पंचाईत पडली. आमच्या बायकांच्या संसारांत धोतर कुठलं ?

मी बाहेर येऊन चंदूला विचारलें, "माझं एकादं पांढरं पातळ तुला नेसायला दिलं तर चालेल कीं नाहीं? तोंपर्यंत पिळून लावला तर तुझा पायजमा वाळेल. माझं पातळ कांहीं अठरा हात नाहीं. तसं फारसं मोठं व्हायचं नाहीं. फार तर नागपूरी धोतरासारखं दिसेल.

माझें भाषण ऐकून तो हंसला—पण त्या रडव्या हंसण्यामुळें त्याचा चेहरा जास्तच केविलवाणा दिसूं लागला.

माझ्या मनाची कालवाकालव सुरू झाली. भलत्या भलत्या कल्पना मनांत येऊं लागल्या. माझें पातळ त्यानें नेसावें! काय हा योगायोग?

पडल्या जागींच त्याला झोंप लागली. मीही एक पुस्तक घेऊन वाचीत बसलें.

लीला अजून आली नव्हती. तिचें काय झालें असेल या विचारानें माझें वाचनाकडे चित्त लागेना.

पाणी तापून तयार झाल्याचें बाईनीं सांगतांच मी त्याला जागें होण्यासाठीं हांक मारली. त्याला गाढ झोंप लागली होती. दोन चार हाका मारून पाहिल्या पण तो जागा होईना.

मला भीति वाटली आणि मी त्याला हात धरून हालविलें.

तो जागा झाला—पण मला मात्र धक्का बसला. यापूर्वीं मी त्याला केव्हांही स्पर्श केला नव्हता. त्या स्पर्शानें माझ्या मनांत भलत्या कल्पना येऊं लागल्या. तें आम्हां उभयतांच्या संसाराचें चित्र वाटूं लागलें. जसा कांहीं आमचा दोघांचा संसार थाटला आहे आणि तो बाहेरून थकून भागून येऊन पडला असतां मी त्याला जागा करतें आहें, असें कांहींसें अंधुक अंधुक चित्र माझ्या नजरेसमोर येऊन मला क्षणभर भोंवळ आली.

चंदू स्नानासाठीं निघून गेला तोंच लीला परत आली. तिचा चेहरा हंसतमुख होता. तेवढ्यानेंच मला धीर आला.

मी विचारलें, "काय झालं?"

लीला म्हणाली. "ती बाई मोठी खट्याळ आहे. कांहीं थांगपत्ता लागूं देत नाहीं. अगदींच कांहीं मूर्ख दिसत नाहीं. मी गेलें तों माझा तिनं चांगलाच आदरसत्कार केला. चहासुद्धां करून दिला. जसं कांहीं कांहींच झालं नाहीं असा

बहाणा करून ती बोलूं लागली. चंदूकाका कुठं आहेत, असं मी विचारलं, त्यावेळीं ' येतील आतां इतक्यांत कोर्टांतून ! ' असं जेव्हां तिनं उत्तर दिलं तेव्हां मीं तर थक्कच झालें. झालेली हकीकत मला माहीत आहे असं मला दाखवायचं नव्हतं म्हणून ती सांगेल तें ऐकून घेणें मला भाग होतं. मारे गप्पा मारीत कितीतरी वेळ बोलत बसलें. पण झाल्या प्रकाराचा एवढासुद्धां थांग तिनं लागूं दिला नाहीं. मला तिची शर्थ वाटली. मला वाटत होतं तितकी ती साधी भोळी नाहीं. चांगली खंबीर आहे. मी कां आलें याचा अंदाज काढायचा ती आडवे तिडवे प्रश्न घालून प्रयत्न करीत होती. पण मीही कांहीं कच्च्या गुरूची चेली नव्हतें. तिच्याच इतकी मीही मख्ख राहिलें. कांहींच पत्ता लागत नाहीं अशी जेव्हां खात्री झाली, तेव्हां तशीच चहा घेऊन निघून आलें."

ही हकिकत ऐकत असतां चंदू आपल्याशींच खिन्नपणानें हंसत होता. तो म्हणाला, " आतां झाली तुमची खात्री ? "

" कसली खात्री ? " मी विचारलें.

तो उगीच मोठमोठ्यानें हंसून म्हणाला, " बरं वेड पांघरते आहेस ! ती मूर्ख आहे असा तुझा समज होता. ती मूर्ख नाहीं, चांगली पक्की आहे, असं सुचवण्याचा माझा उद्देश होता. आतां काय ठरलं ? झालं कीं नाहीं माझं म्हणणं खरं ? "

" तें सारं खरं, " मी म्हटलें, " पण आतां पुढं तूं काय करणार आहेस ? असाच खाणावळींत राहून दिवस काढणार आहेस ? "

" तर काय इथं राहूं ? " चंदू म्हणाला, " इथंसुद्धां राहिलों असतों पण तें शक्य नाहीं. मग दुसऱ्या कुठं राहणार ? मुंबईत अनाथांचा एकच आसरा–खाणावळ ! अलिकडे हा माधवाश्रम झाल्यापासून मध्यम स्थितीच्या माणसालाही जेवण्याची आणि राहण्याची सोय झाली आहे. सरदारगृह थोडं जड जातं. तेव्हां आपला माधवाश्रमांतच राहीन म्हणतों."

थोडा वेळ विचार करून तो पुढें म्हणाला, " दुसरा एक बेत आतां केला आहे. पुन्हां मेडिकल कॉलेजांत जायचं, डॉक्टर व्हायचं आणि चिरफाड सुरू करायची ! " असें म्हणून तो कपडे करण्याच्या बेतांत होता.

पण चटकन् त्याची नजर नेसलेल्या धोतराकडे गेली आणि तो मोठमोठ्यानें हंसूं लागला. लीलेच्या नजरेलाही तें माझें पांढरें पातळ आलें आणि तीही हसूं लागली. मीच तेवढी काय ती गंभीर राहिलें होतें.

चंदू म्हणाला, " आतां पायजमा वाळल्याशिवाय कांहीं जातां येत नाहीं. या साहेबी पोषाखाचं हें असं आहे. हेंच धोतर असतं तर तेंच नेसून नसतों का गेलों? नाहीं म्हटलं, तरी आतां इथं राहण्याखेरीज गत्यंतर नाहीं. आणि पायजमा वाळेपर्यंत इतका वेळ होईल, कीं मग माधवाश्रमाचा दरवाजा उघडाही मिळणार नाहीं."

त्याच्या मनांत त्या दिवशीं तेथेंच रहावें असें असल्याचें मला स्पष्ट दिसून आलें. पायजमा वाळण्याचें नुसतें कारण, एवढेंच. पायजमा वाळला असता तर त्यानें कदाचित् दुसरें कारण शोधून काढलें असतें.

मला थोड्या वेळा पूर्वीची आठवण झाली. मी त्याला हातानें हालवून जागें केलें! ती आठवण होतांच माझ्या अंगावर कांटा उभा राहिला. स्पर्श करीपर्यंत मला कांहीं वाटलें नव्हतें. पस्र्श केल्यानंतर साऱ्या भावना एकदम उभ्या राहिल्या होत्या. कांहीं केल्या ती आठवण नाहींशी होईना.

आम्ही जेवायला बसलों, जेवून उठलों, जेवीत असतांना इकडच्या तिकडच्या गोष्टी बोलत होतों, तरीही ती आठवण दूर होत नव्हती. असला प्रसंग आला असतांही चंदू त्यावेळीं फार खुषींत असल्याचें दिसून येत होतें.

मला शंका आली. त्याचेंही कारण तेंच का? खरें पाहिलें तर लीलेनें सांगितलेली हकिकत ऐकल्यावर त्याला काळजी वाटायला हवी होती—पंचाईत पडायला हवी होती; पण तसें न होतां तो मोठ्या खुषींत हंसत खेळत गप्पा करीत होता.

पुन्हां पुन्हां मला वाटूं लागलें, कीं कारण तेंच! तेंच मला जास्त डाचूं लागलें. सबंध आयुष्यांत न केलेली चूक त्या दिवशीं प्रसंगोपात माझ्या हातून घडली.

चंदू पूर्वीच्या हकिकती सांगत होता. त्याला पूर्वाश्रमांतील डायमंड लॅाजमधील आठवण झाली होती. डायमंड लॅाजमधें मी जेवायला गेलें होतें, त्यावेळच्या निघालेल्या चर्चेची हकिकत तो तिला सांगत होता.

मलाही ती हकिकत आठवली आणि त्याबरोबरच त्याच्या पूर्वीचीही हकिकत आठवली.

पुरुष मंडळींत मिसळून आपली स्त्री जात विसरून कसें वागावें, याचा पहिला धडा डायमंड लॉजमध्यें नेऊन मला घालून दिल्याची हकिकत ज्यावेळीं चंदूनें सांगितली, त्यावेळीं तो म्हणाला, "त्यावेळीं ही बाटणार होती, ख्रिस्ती होणार होती. मी जर भांडलों नसतों, तर माझी खात्री आहे, कीं ही पंडिता रमाबाई-सारखी आज ख्रिस्ती झाली असती."

मी म्हटलें, "ही तुझी अतिशयोक्ति आहे. ख्रिस्ती व्हावं असं मला वाटलं असतं तर मी केव्हांच धर्मांतर केलं असतं. पण धर्मांतर न करण्यासाठीं मला कसं झगडावं लागलं, याची कल्पना कुणालाच येणार नाहीं. विलायतेंत तर असे प्रसंग फारच आले. पण विलायतेंत जाण्यापूर्वी इथं हिंदुस्थानांत असतांना देखील स्मिथ-बाईंनीं मला किती आमिषं दाखवलीं——पण मी त्याला बळी पडलें नाहीं. आज मला असं वाटत आहे, कीं ही माझी चूक तर झाली नाहीं ? मी बाटलें असतें तर काय बिघडलं असतं ? माझं मन बदललं नसतं, देहाची कातडी बदलली नसती, कीं डोळ्यांतली नजरही बदलली नसती. नुसतं ख्रिस्ती म्हटल्यानं कांहीं कुणी ख्रिस्ती होत नाहीं किंवा हिंदु म्हटल्यानें हिंदु होत नाहीं. नानासाहेबांसारखा हिंदु पुरुष पाहिला, सरुबाईसारखी हिंदु स्त्री पाहिली, कीं कोणत्या समंजस माणसाला हिंदुपणाबद्दल अभिमान वाटेल ? हिंदुधर्माचा जाज्वल्य अभिमान बाळगणारी जीं कांहीं माणसं आहेत त्यांतलेच हे दोन गाळीव नमुने आहेत. हे नमुने 'आमच्या हिंदु धर्माचे नमुने' म्हणून परधर्मांतल्या लोकांना आम्हीं दाखवायचे काय ? या नमुन्याच्या आधा-रावर आम्ही आमच्या हिंदु धर्माची प्रौढी मिरवावयाची काय ? वेदांतला हिंदु धर्म कुणी पहात नाहीं. उपनिषदांची कुणाला ओळख नाहीं. स्मृतीचा आधार द्यायला प्रत्येकजण टपलेला असतो. पण त्या स्मृतींत काय लिहिलं आहे, कुणी लिहिलं आहे आणि कां लिहिलं आहे, याचा कुणाला थांगपत्तासुद्धां नाही. नुसतं 'आमचा हिंदु धर्म, आमचा हिंदु धर्म' तोंडानं म्हणत असतात मात्र. पण उपनिषत्-कालिन हिंदु धर्माचं तत्व जर पहायला गेलं तर आज प्रचलित असलेल्या हिंदुधर्माला 'हिंदुधर्म' म्हणावं कीं काय, हाच संशय वाटायला लागेल. कसला धर्म आणि कसला अधर्म ! जिथं माणुसकीच नाहीं तिथं कसल्या धर्माबद्दल भांडत बसायचं ? साऱ्याच धर्मांचा मला आतां तिटकारा येऊं लागला आहे. कुठल्याच धर्मावर माझा विश्वास बसत नाहींसा झाला आहे. मी नास्तिक होईन कीं काय, अशी भीति मला वाटूं लागली आहे. सत्याला चिकटून जगांत काटेकोरपणानं राहायचा प्रयत्न करीत असतां असा

छळ व्हावा, असा पेंच पडावा, अशी मुस्कटदाबी व्हावी, हाच का आमच्या धर्माचा मथितार्थ ? ”

चंदू मला खिजवण्याच्या उद्देशानें म्हणाला, “ ऐक ! लीले. हें व्याख्यान ऐक आणि सावध हो. फार परिणामकारक व्याख्यान झालं नाहीं का हें ? ”

त्याच्या त्या उथळ उद्गारांचा मला राग आला. मी आंत जाऊन बिछान्यावर अंग टाकलें.

चंदू आणि लीला बराच वेळ बोलत बसलीं असल्याचें मला ऐकूं येत होतें; पण मी त्यांचें भाषण कानीं येऊं दिलें नाहीं. पडल्या पडल्या मला झोंप लागली.

## प्रकरण सोळावें ........................................ त्रागा

दुसऱ्या दिवशीं सकाळीं आम्हीं चहा घेत बसलों असतां अगदीं अनपेक्षित असा एक प्रकार घडून आला.

सरुबाई येऊन आमच्या दारांत उभी राहिली. मी चहा घेत असतां तसाच अर्धा पेला माझ्या हातांत राहिला. लीला पेला खालीं ठेवून उठली. चंदू मात्र अगदीं शांतपणें चहा पीत होता.

दारांत पाऊल टाकतांच ती म्हणाली, "तरी मला वाटलंच होतं. एवढ्यासाठीं तीं सारीं ढोंग सोंगं चालली होतीं का? पुण्याचा खटला तो हाच वाटतं? आणि मला माहेरीं घालवून द्यायची ती एवढ्याचकरतां?—"

तिचें भाषण ऐकून चंदू गालांतल्या गालांत हंसत होता. त्याच्या हंसण्यामुळें तिचा गैरसमज वाढण्यास कारण होत होतें, हें पाहून मी अस्वस्थ झालें. आम्हीं पुण्याला गेलों होतों हें जर खरें होतें, तर चंदूच्या त्या हंसण्यामुळें तिनें ढोंगाचा केलेला आरोप तो कबूल करीत आहे, असें सिद्ध होत होतें.

सरूबाई म्हणाली, " मला सर्व कांहीं माहित होतं. तुम्ही मोठे वकील असाल, कायदा लढवीत असाल पण तिथं कोर्टांत जज्जांच्या डोळ्यांत धूळ टाकणं सोपं आहे. पण बायकांच्या डोळ्यांत धूळ टाकायचा प्रयत्न केला तर ती आधीं डोळे मिटून घेत असते, हें तुम्हांस अजून माहीत नाहीं. चांगली डोळे उघडे ठेवून वावरत असलें तरी तेवढ्यापुरते मी डोळे मिटून घेतले होते. मला हा इथला पत्ता लागूं दिला नाहीं---पण आतां काढलाच कीं नाहीं मी शोधून ? कोंबडं झाकलं तरी तांबडं फुटायचं रहात नाहीं, तें हें असं ! काय सातासमुद्रांपलीकडे निघून गेलां नव्हतां ! मुंबईच्या मुंबईत, गिरगांवांतल्या गिरगांवांत लपून किती वेळ बसाल ? पुरे झालीं हीं ढोंगं ! आतां मुकाट्यानं घरीं चलावं म्हटलं. "

चंदू कांहींच बोलत नव्हता. मी म्हटलें, " अशा दारांत उभ्या कां सरूबाई ? आंत या ना. "

तिनें माझें न ऐकल्यासारखें करून पुन्हां चंदूला उद्देशून बोलायला सुरवात केली, " मी काय म्हणतें तें ऐकूं येतं का ? आतां बरोबर घेतल्याशिवाय मी इथून जायची नाहीं. तोंपर्यंत देणेकऱ्यासारखी अशी उंबरठ्यावर उभी राहीन. स्वतः हलणार नाहीं कीं दुसऱ्या कुणाला हलूं देणार नाहीं. दरवाजा मोकळा हवा असेल तर मुकाट्यानं माझ्याबरोबर बाहेर या ! असलीं हीं थेरं मी कधीं चालूं द्यायची नाहीं."

चंदू अगदीं शांतपणानें म्हणाला, " किती दिवस अशी दारांत उभी राहशील ?"

" त्याचा आतां अनुभवच पहा ना ! " सरुबाईनें उत्तर दिलें.

क्षणोक्षणीं मी फार अस्वस्थ होत होतें. लीला देखील विचार करीत होती पण तिलाही विचार सुचत नसावा, असें तिच्या मुद्रेवरून दिसत होतें.

स्वस्थ होता काय तो चंदू. त्याला कोणत्याच गोष्टीची कदर वाटत नव्हती. त्यानें कांहीं तरी निर्धार केला होता आणि त्या निर्धाराबाहेर जायचें नाहीं असें त्यानें निश्चितपणें ठरवलें होतें असें उघड उघड दिसून येत होतें.

तो म्हणाला, " लीला, बाईना स्नानाला पाणी काढायला सांग पाहूं ?"

दारांतून सरुबाई कडाडली, " स्नान केल्यावर येणार आहां का ? "

कांहीं न बोलतां तो बाथरूमकडे निघून गेला.

लीलेनें सरुबाईला आंत येऊन बसण्याचा पुन्हां पुन्हां आग्रह केला पण ती मुळींच ऐकेना ! दारांत भाजीवाली आली तर भाजी घेण्यासाठीं बाहेर जाऊं देईना.

भाजीवालीच्या समोर शोभा होऊं नये म्हणून मी तिला लावून दिलें.

मी लीलेला घेऊन आंत गेलें तरीही ती दार धरूनच उभी होती.

मी लीलेला म्हटलें, " आतां काय करायचं ? मला वाटतं खरोखरीच ही दारांतून हालणार नाहीं. शाळेंतसुद्धां जाऊं देणार नाहीं. आणि शाळेंत गेलं नाहीं तर उगीच बोभाटा व्हायचा. "

लीला म्हणाली, " तें मी करतें. चंदूकाकांना मीच काय तें सांगतें. तूं स्वस्थ ऐस काकू ! तूं बाहेर जाऊन बसलीस म्हणजे तिला कांहीं शंका यायची नाहीं. "

मी बाहेर येऊन माझ्या लिहिण्याच्या टेबलाजवळ येऊन बसलें आणि शाळेंतील एक्झरसाईज बुकें तपासूं लागलें. ती तशीच दारांत उभी होती. तिच्या निग्रहाचें मला कौतुक वाटलें. केवढा हा दृढ निश्चय ! हाच योग्य कामीं लावला असता तर त्याचा केवढा सुपरिणाम झाला असता ! याच दृढनिश्चयानें जर तिनें मला वागविलें असतें तर मी आनंदानें चंदूच्या घरीं राहिलें असतें. ताईही नसती का राहिली ? तशीच मीही राहिलें असतें.

पण तिच्या मनांत संशयाचें पिशाच्च ठाण मांडून बसलें होतें. पापाच्या नजरेशिवाय दुसरी कोणतीच नजर तिच्या डोळ्यांत राहिली नव्हती. अशा परिस्थितींत पुढें काय करावें, याचा निश्चय ठरविणें फारच धोक्याचें होऊन बसलें होतें.

कांहीं वेळानें चंदू बाहेर आला आणि कपडे करूं लागला. मी मागें वळूनसुद्धां पाहिलें नाहीं. म्हटलें तेवढ्यानेंच तिला संशय यायचा. जें काय व्हायचें असेल तें होईल, अशा वृत्तीनें मी स्वस्थ माझ्या कामाला लागलें होतें.

चंदूनें कपडे केले, हातांत काठी घेतली—आणि तो उंबरठ्याजवळ येतांच सरुबाईही दूर झाली.

तो बाहेर पडला तशी तीही त्याच्या मागोमाग गेली.

ती गेलेली दिसून येतांच लीला आंतून बाहेर आली आणि आम्ही गॅलरींत उभ्या राहून पाहूं लागलों. चंदू पुढें चालला होता आणि सरुबाई त्याच्या मागोमाग जात होती. रस्त्याच्या वळणांत तीं दिसेनाशीं झालीं असें पाहतांच आम्ही पुन्हां आंत आलों. आम्ही वरून पहातों आहों कीं काय हें पहाण्यासाठीं सरुबाईनें

मागें वळून मुळींच पाहिलें नाहीं. तेवढ्यांत चंदू निसटून जाईल अशी भीति तिला वाटली कीं काय न कळे !

आम्ही आंत येऊन बसलों तेव्हां लीला म्हणाली, " इथपर्यंत तरी माझा उपाय लागू पडला. "

" काय सांगितलंस चंदूला ? " मी विचारलें.

ती म्हणाली, " मी चंदूकाकाला सांगितलं, कीं तूं कपडे करून बाहेर हो म्हणजे ती आपोआप तुझ्या मागोमाग जाईल. वाटेल तर बिऱ्हाडीं जा किंवा जाऊं नको. पण आमची शाळेंत जाण्याची वेळ होईपर्यंत मात्र या बाजूला फिरकूं नकोस. एकदां आम्हीं शाळेंत गेलों, म्हणजे मग तुला काय वाटेल तें कर. आजच्या दिवसापुरतं तरी हें संकट दूर झालं म्हणजे मिळवली. "

तेवढ्या वेळापुरतें मला समाधान वाटलें. पण पुन्हां विचार असा पडला, कीं संध्याकाळीं तो इथें आला आणि तीही आली, तर काय करायचें ?

लीला म्हणाला, " चंदूकाका यावर कांहीं तरी तोड काढील असं मला वाटतं. प्रसंग मोठा चमत्कारिक आला आहे यात शंका नाहीं. तो जिथं जिथं जाईल तिथं तिथं ती त्याच्या मागून जाऊं लागली, तर हें लिगाड कसं सोडवावं याची त्यालाही पंचाईत पडेल. मला वाटतं, शेवटीं त्याला घरीं जाणं भाग येईल. पण जातांना तो मला म्हणाला, कांहींही झालं तरी ही निघून जाईपर्यंत मी बिऱ्हाडीं जाणार नाहीं. मला वाटतं, तो सरळ कोर्टांत जाईल. जाईल म्हणण्यापेक्षां जायचा प्रयत्न करील. पण ही चंडिका जर त्याच्या मागोमाग कोर्टांत जाऊं लागली तर तो काय करील, हें कांहीं सांगतां यायचं नाहीं. कोर्टांत देखील जाईल. ती मागंपुढं पाहायची नाहीं. "

एक्झरसाईज बुकें तपासून झाल्यावर मी क्षणभर आरामखुर्चीवर स्वस्थ पडलें. माझें मस्तक अगदीं भणाणून गेलें होतें. हा प्रसंग जरी प्रत्यक्ष 'माझ्यावर' आला नव्हता तरी 'माझ्यामुळें' आला होता. त्यामुळें माझ्यावर एक प्रकारची जबाबदारी आल्याचें मला वाटत होतें; म्हणूनच माझें मन असें अस्वस्थ झालें होतें.

मनांत असें आलें, कीं आपण मुंबई सोडून निघून जावें. कलकत्त्यांत माझ्याबरोबरच्या कांहीं विद्यार्थिनी शिक्षण खात्यांत अधिकारावर असल्याचें मला कळलें होतें.

त्यांच्याकडे जाऊन कांहीं प्रयत्न करावा आणि कलकत्त्यांतच आपला मुक्काम करावा, असें मला वाटूं लागलें.

पण पुन्हा वाटे, कीं तो आपला भ्याडपणा होईल. माझ्या आयुष्यांत आतांपर्यंत मी केव्हांही भ्याडपणा दाखविला नव्हता. अन्तःकरणाला जी गोष्ट पटली, ती निर्भय-पणानें करण्याच्या सात्विक मनोबलावरच मी आजवर या जगांत उभी राहिलें होतें. तेवढ्या एका गोष्टीमुळें मी ती माझी निर्भयता सोडली, तर माझा माझ्या मनो-बलावरचा विश्वास पार उडून गेला असता आणि जगांत पुढल्या संकटांशीं तोंड द्यायला माझ्या दृष्टीनें मी नालायक ठरलें असतें.

तरीही मी म्हटलें, " लीला, तुला कसं वाटतं आपण कलकत्त्याला गेलों तर? मग ही मागची ब्याद तरी सुटेल ! "

" आणि चंदू तिथं आला तर ? " लीला म्हणाली, " आणि त्याच्या मागून ही बयाही तिथं आली तर मग काय करणार आहेस ? तसं झालं तर मग मुंबई आणि कलकत्ता सारखींच होतील. तूं कलकत्त्याला गेलीस तर आज ना उद्यां एकाद्या दिवसा-साठीं चंदू तिकडे आल्यावांचून राहणार नाहीं. आणि ही आतां तर लावसटीसारखी त्याची पाठ सोडायची नाहीं. उगीच भिऊन पळून जाण्यांत अर्थ काय ? त्यापेक्षां आल्या प्रसंगाला तोंड देऊन जागण्यांतच श्रेय आहे असं नाहीं का वाटत तुला काकू ? "

माझ्या विचाराशीं लीलेचे विचारही तंतोतंत जुळल्याचें पाहून मला एक प्रकारचा धीर आला. यावेळीं लीला इथें आहे, हेंच मला समाधान वाटलें. मी एकटीच असतें तर माझा जीव कातावून गेला असता. कदाचित् मुंबई सोडून जाण्याची कल्पना त्या एकलकोंडेपणामुळें बळावली असती. कुणीतरी बरोबर आहे—जोडीला लीले-सारखीं मुलगी बरोबर आहे–हेंच माझें भाग्य असें मला वाटलें. दुसरी कुणी एकादी रडवी रडूबाई असती तर तिनें माझा जीव नकोसा केला असता. मला सावरण्याच्या ऐवजीं—तीच माझा गळ्ग्रह होऊन बसली असती.

दुःखांत एवढेंच सुख वाटलें.

लीला म्हणाली, " मग काय कलकत्त्याला पळून जाणार आहेस ? "

मी उत्तर दिलें, " नाहीं लीले. तशी कल्पना क्षणभर माझ्या मनांत आली होती. पण चंदू आणि सरुबाई माझ्या मागोमाग तिथं येतील–एवढंच नव्हे, तर

केवळ माझ्या मनानेंच माझ्यावर भ्याडपणाचा आरोप करूं नये, एवढ्यासाठीं ती कल्पना मी दूर केली. आपल्या नशिबीं सुखाचे दिवस नाहींत, हें पदोपदीं येत असणाऱ्या या प्रसंगांनीं ठरलंच आहे. त्यांना तोंड दिल्याखेरीज गत्यंतर नाहीं. जर सकटंच यायचीं असलीं, तर कुठंही गेलं तरी तीं तिथंही आल्यावांचून राहणार नाहींत. मग तेवढाच पळपुटेपणा कां पदरांत बांधून घ्या ?"

" तरी म्हटलं माझी काकू आहे ! " लीला हंसत हंसत म्हणाली.

अपत्य स्नेहाचा उमाळा काय असतो तो मला त्यावेळीं कळला. लीलेला मी ओढून जवळ घेतलें, कुरवाळलें आणि तिचे मुके घेतले.

माझ्या गालावर आपले दोन्ही हात ठेवून माझ्याकडे पहात लीला म्हणाली, " काकू, या क्षणापासून तुला काकू न म्हणतां 'आई' म्हणावं असं मला वाटूं लागलं आहे. एवढं आयुष्य झालं–पण एवढ्या जिव्हाळ्याचा हात माझ्या आईनंसुद्धां कधीं लावला नव्हता. आईचा हात लागायचा म्हणजे थोबाडींत मारण्यासाठीं. माझ्या ओळखीचं मातृप्रेम म्हणजे तेंच. शाळेंतल्या पुस्तकांतून आईच्या थोरवीचे किती तरी धडे मी पाठ केले होते. पण ते मला केव्हांच पटले नव्हते. मेलं कांहींतरी पुस्तकांत लिहितात, असंच मला वाटत असे. पुस्तकांतल्या लिखाणावरचा माझा विश्वास पार उडूनच गेला होता. पण आई म्हणजे काय असतं हें मला या क्षणाला कळलं.–" असें म्हणून ती स्फुंदस्फुंदून आसवें गाळूं लागली.

पुन्हां मला आनंदाचें भरतें आलें आणि मी तिला हृदयाशीं घट्ट कवटाळून धरलें. तो अपत्य प्रेमाचा आसरा मला देवाच्या आशीर्वादासारखा वाटला. देवानें मला एक मुलगी धाडून दिली, त्याची माझ्यावर दया आहे, संकटाच्या काळांत त्यानें मला टाकलें नाहीं, असेंच मला त्यावेळीं वाटलें.

नाहीं तर मी काय केलें असतें. अंतःकरणांतील धीराचा मेरू कोसळून पडण्याजोगा तो प्रसंग होता. सकृद्दर्शनीं तो प्रकार क्षुल्लक ‑ दिसत होता–पण तें एक बिकट कोडें होतें–नुसतें वर्णन केलें तर त्या प्रकाराची महती मोठी वाटली नसती–पण मला तो एक जबरदस्त पेंच पडला होता. त्या पेंचांतून कसें पार व्हावें, या संकटांत मी होतें.

आतां त्या पेंचाचें कांहींच वाटेनासें झालें. मला एक अपत्य मिळालें. माझ्या दुःखानें दुःखी होणारें, माझ्या सुखानें सुखी होणारें आणि माझ्या सुखासाठीं

तळमळणारें, असें एक अपत्यहृदय माझ्या हृदयाला येऊन भिडलें. माझी सर्व काळजी दूर झाली.

आतां वाटेल तीं संकटें येवोत-मला त्यांची पर्वा वाटणार नाहीं, एवढा जिवाला धीर आला.

माझी वृत्ति त्या दिवशीं अगदीं उल्हसित झाली होती. शाळेंतल्या मुलींनासुद्धां तें कळून आलें. एका मुलीनें विचारलें देखील, " बाई, आज तुम्हाला प्रमोशन मिळालं का ? "

अशीच वृत्ति राहिली तर माझ्या शिक्षणाचें कार्य सुकर होईल, असें मला वाटूं लागलें. त्या नव्या भावनेच्या उद्रेकानें माझ्या ठायीं नव्या जीवनशक्तीचा संचार झाला. प्रसूतिवेदनेचें दुःख अनुभवल्याशिवाय अपत्यप्रेमाचा पान्हा त्या दिवशीं जो पाझरला, त्यानें माझ्या जीवनांत क्रांती केली.

संध्याकाळीं घरीं येऊन पोंचलें तो चंदू तिथें आधींच येऊन बसल्याचें मला आढळून आलें. मी इकडे तिकडे पाहिलें. ती तर आली नसेल ना ? दुसरें कुणीच नव्हतें. लीलासुद्धां शाळेंतून परतली नव्हती.

मी आलेली पाहतांच चंदू म्हणाला, " घाबरूं नकोस. ती कांहीं आली नाहीं. कोर्टापर्यंत तिनं माझा पाठपुरावा केला. पहिल्यानं मी इराण्याच्या दुकानांत जाऊन बसलों. म्हटलं सोवळेपणामुळं ती दुकानाची पायरी चढणार नाहीं. दुकानाला तीन चार दारं होतीं. चहा घेऊन पुढल्या दारानं झुकांडी द्यावी, असा विचार मी केला होता. चहा घ्यायलासुद्धां मी शक्य तितका जास्त वेळ लावला. तोंपर्यंत ती फुटपाथवर टेहळणी करीत उभी होती. चहा संपून उठलों आणि इराण्याला पैसे देऊं लागलों. सुट्टे पैसे नव्हते म्हणून नोट काढून दिली. नोटीची मोड घेऊन वळतों तर-शेजारीं ही उभी. मी थक्क झालों. दुकानाखालीं उतरतों, तों तीही माझ्या मागोमाग उतरली. दुकानांतील प्रत्येकजण ती आल्यापासून माझ्याकडे सारखा पहात होता. फुटपाथजवळ व्हिक्टोरिया होती. त्यांत उडी टाकून त्याला हांकायला सांगितलें-तर चालत्या व्हिक्टोरियांत ती उडी मारून बसली. फुटपाथवरील लोक तो देखावा पाहून हंसूं लागले. मला मेल्याहून मेलं झाल्यासारखं वाटलं. गाडीवाल्यानं विचारलं, त्यावेळीं त्याला अपोला बंदर म्हणून मी म्हटलं. अपोलो बंदरावर येऊन मी खालीं उतरलों, तशी तीही माझ्याबरोबर उतरली. मी कठड्यावर बसलों, तशी

तीही माझ्याजवळ येऊन बसली. माझा जीव अगदीं कासावीस झाला. ऊन वर येत होतं, त्यामुळं त्या जागीं बसणं जवळ जवळ अशक्य झालं होतं. तरीही निर्धारानें मीं त्याजागीं बैठक मारली. १०–४५ होईपर्यंत वाट पाहिली. मी कांहीं बोललों नाहीं आणि तिनंही एक ब्र काढला नाहीं. १०–४५ च्या सुमाराला एक व्हिक्टोरिया बोलावून त्यांत चढलों. तशी पूर्वीप्रमाणेंच तिनंही आंत उडी घेतली. स्मॉलकॉज कोर्टाजवळ आलों. गाडीखालीं उतरलों. तशी तीही माझ्या मागोमाग कोर्टांत येऊं लागली. यावेळीं मात्र माझी गाळण उडाली. काय करावें तें सुचेना. ओळखीचे दुसरे एक वकील भेटले, त्यांना सांगून त्या दिवसाच्या माझ्या खटल्याची व्यवस्था केली आणि पुन्हां गाडींत बसलों. ती शेजारीं होतीच. गाडीवाल्याला गाडी हांकायला सांगितलं. पण कुठं तें कांहीं सांगतां येईना. तो मन मानेल तिकडे गाडी नेत होता. इतकं झालं तरी तिनं एका शब्दानं मला कांहीं विचारलं नाहीं. तिचा हट्टवादीपणा पाहून मी थक्क झालों खरा–पण यांतून आतां सुटावं कसं, याचीच मोठी पंचाईत पडली. पुन्हां घरीं परतलों. तिनं स्नान केलं नव्हतं. उन्हांतून सारखं हिंडत राहिल्यामुळें मलाही घामाच्या धारा लागल्या होत्या. मी स्नानाला पाणी ठेवण्यासाठीं गड्याला सांगितलं, तेव्हां ती माझ्याकडे पाहून हंसली. पाणी तापेपर्यंत मी खुर्चीवर बसून राहिलों होतों आणि तीही दाराशीं उभी होती. एक क्षणभर विचार करून तिनं जाऊन बाहेरचं दार आंतून बंद करून घेतलं. गड्यानं पाणी काढतांच मी बाथरूममध्यें गेलों आणि तिथें स्नान करून मी बाहेर येईपर्यंत तिनं स्वयंपाक-घराच्या मोरीत अंग धुवून घेतलं. धोतर नेसून मी बाहेर आलों, त्यावेळीं ती लुगडं नेसून तयार होती. तिच्या या झटपटीचं मला मोठं कौतुक वाटलं. हा तातीर आतां मला सोडीत नाहीं असं पाहून, आतां रोजच्या क्रमाला लागावं, असं मी ठरवलं. रोज मी जेवून उठल्यावर ती माझ्या ताटांत बसत असे–पण आज तिनं माझ्या-बरोबरच आपलं ताट वाढायला भटजीला सांगितलं. जेवतांना मी घाई करीत आहें असं पाहून तिनंही तितकीच घाई चालवली. मी जेवून उठतांच तीही जेवून उठली. मी नळाखालीं हात धूत असतां तिचाही हात तिथंच होता. त्या तसल्या प्रसंगांत-देखील मला हंसूं आल्यावांचून राहीना. नंतर येऊन मी खोलींत बिछान्यावर पडलों. एक खुर्ची घेऊन ती माझ्या बिछान्याशेजारीं बसली. झोंप न येण्याचा मी सारखा प्रयत्न चालू ठेवला होता–तरीही तिला कळूं नये म्हणून डोळे मिटून राहणं मला भाग होतें. मधून मधून मधून डोळे किलकिले करून पहात होतों. पाहतां

पाहतां तिला झोंप लागली आणि ती खुर्चीवर हात टेकून तशीच झोपीं गेली. थोडा-सुद्धां आवाज न करतां मी उठलों आणि कोट टोपी चढवून घराबाहेर निघालों. जातांना बाहेरून कडी लावली—" एवढें सांगून तो मोठमोठ्यानें हंसूं लागला.

तो पुढें म्हणाला, "आतां कुणी कडी काढली असेल कीं काय तें सांगतां येत नाहीं. पण आतांच तुमच्या या बाईनं—ती यापूर्वीच इथं येऊन गेली, असं मला सांगितलं. एवढा वेळ गाडी करून साऱ्या मुंबईभर भटकत होतों. झाली हकिकत तुला सांगितली. आतां निघालों. यापुढं मी माधवाश्रमांत राहणार. मला भेटायचं असेल तर तूं गड्याला पाठवून दे." असे बोलून माझ्या उत्तराची अपेक्षा न करतां तो चटकन् बाहेर निघून गेला.

त्याची ही विलक्षण हकिकत ऐकून हंसावें कीं रडावें हेंच मला कळेना.

इतक्यांत लीला शाळेंतून आली.

# प्रकरण सतरावें ........................................ त्रागा–पुढें चालू

लीलेला यायला वेळ लागला, त्याला कांहीं विशिष्ट कारण नव्हतें. एका मैत्रिणी-बरोबर सहज ती तिच्या घरीं गेली होती.

चंदूनें सांगितलेली हकीकत मी तिला सांगितली, तेव्हां ती पोट धरधरून हसूं लागली. तिच्या हंसण्याचा मला राग आला. मी तिला दरडावलें तेव्हां ती म्हणाली, " कसं कुणाला हसूं न येईल ? सावलीसारखी ती मागून हिंडत होती हें कुणी पाहिलं असतं–पाहिलं असतं कां–रस्त्यावरून जाणारायेणाऱ्यांनीं पाहिलंच असलं पाहिजे. काय तरी विलक्षण बाई ? इतकंही करून शेवटीं फसलीच ! बिचारीचा झोपेनं घात घेतला—"

मी म्हटलें, " उगीच मोठमोठ्यानें बोलूं नकोस. कदाचित् ती पुन्हां यायची. आतां तो विषयच नको. तूं आपल्या अभ्यासाला बैस, नाहींतर फिरायला जाऊन यायचं असेल तर जाऊन ये. मी कांहीं आज बाहेर जाणार नाहीं. ती पुन्हां आल्याशिवाय राहणार नाहीं, ही माझी खात्री आहे. उगीच तिला संशय यायला नको. "

लीला म्हणाली, " ती आल्यावर काय गंमत होते ती मला पहायची आहे. बाहेर गेलं पाहिजे होतं खरं–पण मी आतां कांहीं जात नाहीं. वाईट वाटतं ते एवढंच, कीं या विश्रांति घ्यायच्या वेळीं मला अभ्यास करीत बसावं लागणार. "

असें म्हणून ती पुस्तकें घेऊन आपल्या टेबलाजवळ बसली. मीही माझ्या कामाला लागलें.

मी काम करीत होतें तरी माझें सारें लक्ष रस्त्याकडे होतें. डिटेक्टिव्हच्या गोष्टींत असे प्रसंग वाचायला मिळतात. एकादा गुन्हेगार अकस्मात एकाद्या ठिकाणीं येणार, म्हणून एकादा डिटेक्टिव्ह जशी त्याची वाट पहात कांहीं तरी दुसरें काम करीत बसलेला असतो, तशीच मी बसलें होतें.

माझा अंदाज खरा झाला. कांहीं वेळानें ती आली. आली ती दारांतच उभी राहिली.

मी मागें वळून पाहिलें. तिची माझी दृष्टादृष्ट झाली. कांहीं बोलूं नये असें एक वेळ वाटलें होतें, पण गृहस्थाश्रम मोडवेना.

मी म्हटलें, " दारांत कां उभी राहिलीस सरुबाई ? आंत येऊन बैस ना ! "

ती नुसतीच हंसली आणि इकडे तिकडे पाहूं लागली. मी पुन्हां आंत येण्यासाठीं आग्रह केला, त्यावेळीं दार बंद करून त्याला कडी घालून ती आंत आली. या तिच्या करण्याचें मला फार कौतुक वाटलें.

तिनें बाजूचा पडदा दूर करून पाहिलें. आंतल्या खोलींत नजर टाकली. स्वयंपाकाची जागा पाहिली. पुन्हां बाहेर येऊन टेबल कोचाखालीं पहायलाही कमी केलें नाहीं–तेव्हां मी म्हटलें, " आतां बाथरूम आणि शौचकूप तेवढा पहायचा राहिला आहे. तेवढा एकदां पाहून घे. "

माझ्या बोलण्याचा तिला राग आला–तरीही तिनें आंत जाऊन त्या दोन्ही जागा पाहिल्या. बैठकीच्या खोलींत ती पुन्हां येतांच मी म्हटलें, "आतां झाली खात्री ?"

तिनें नकारार्थी मान हालवली. तिला अजून संशय येत होता. एवढा सर्व प्रकार झाला असतां लीलेनें मात्र हातांतलें पुस्तक बाजूला केलें नाहीं–कीं मागें वळून पाहिलें नाहीं.

तिला काय संशय आला कोण जाणे. ती गेली आणि लीलेसमोर उभी राहिली. कांहीं वेळ नुसती ती तिच्याकडे पहात होती. पण लीलेनें नजरसुद्धां वर केली नाहीं.

ती लीलेला म्हणाली, " अहो लीलाबाई, पुरे झाला अभ्यास ! हीं ढोंगं मला कळतात. माझी खात्री आहे, कीं तुला सर्व कांहीं माहीत आहे. कुठं गेले ते ? "

" कोण ते ? " लीला म्हणाली.

" माझे पतिराज ! " सरुबाईनें उत्तर दिलें.

तिच्या डोळ्याला डोळा देऊन लीला म्हणाली, " तुझे पतिराज कुठं गेले, तें मला काय माहीत? जिला आपला नवरा सांभाळतां येत नाहीं, तिनं लग्न कशाला करावं ? "

मला लीलेचा असा राग आला होता-पण त्या वेळीं कांहींच बोलतां येणें शक्य नव्हतें.

सरुबाई म्हणाली, " मला नवरा संभाळतां येत नाहीं का ? मी तशी खंबीर नसतें तर केव्हांच तुम्ही त्याला फुसलावलं असतं-पळवूनसुद्धां नेलं असतं ! पण सारखी पाळतीवर राहिलें म्हणून अजून चाललंय्—"

तिच्या उद्गारांमुळें माझें हसूं बाहेर फुटण्याच्या बेतांत होतें. लीलेला तर हंसण्याची उकळी दाबणें कठीण होत असल्याचें मला स्पष्ट दिसत होतें. सरुबाई रागानें फणफणत होती म्हणून तिच्या लक्षांत तें आलें नाहीं.

लीला पुन्हां अभ्यास करूं लागली असें पाहतांच सरुबाईनें तिच्या हातांतील पुस्तक उडवून दिलें आणि तिला हाताला धरून ओढलें.

लीला तिच्याकडे नुसती टकमक पहात राहिली होती.

सरुबाई म्हणाली, " हे कांगाव पुरे झाले ! सांग-कुठं आहे माझा नवरा ? "

लीला गंभीरपणानें म्हणाली, " मला माहीत नाहीं तर मी कुठून सांगूं? पोलिसांत वर्दी द्या ना. ते देतील तपास लावून. "

सरुबाई संतापानें म्हणाली, " तूं काय समजली आहेस ? पोलिसांतसुद्धां वर्दी देईन. तुम्हां सगळ्यांना कोर्टांत खेचून धिंडवडे काढीन तुमचे. मी इंग्रजी शिकलें नाहीं किंवा तुझ्यासारखी विलायतेलाही गेलें नाहीं-म्हणून अशी तशी आहें असं मात्र समजूं नकोस. "

" मी कुठं गेलें होतें विलायतेला ? " लीला म्हणाली.

सरुबाईच्या बोलण्याचा भावार्थ माझ्या लक्षांत आला. प्रत्यक्ष माझ्याशीं बोलणें तिला अशक्य झालें होतें-म्हणून मला जें बोलायचें तें ती लीलेला उद्देशून बोलत

होती. लीलेला हें कळत नव्हतें असें नाहीं–पण ती मुद्दामच तिच्या बोलण्याचा वाच्यार्थ घेऊन हुज्जत घालण्याचा प्रयत्न करीत होती.

सरुबाई हातवारे करून म्हणाली, " तूं गेली नसलीस तर तुझी काकू गेली असेल विलायतेला ! आणि विलायतेलाच कशाला जायला हवं ? ही इथली इंग्रजी शाळांचीं थेरं कांहीं थोडीं नाहींत ! गांवांतून वारेमाप हिंडायला मिळतं. म्हणे शाळेंत चालली ! कुणाला ठाऊक शाळेंत जातात कीं कुठं जातात त्या ? बऱ्या गोष्टीनं सांगतां मला पत्ता—"

" नाहीं तर काय करशील ? " लीलेनें धट्टपणानें विचारलें.

ती पिसाळून म्हणाली, " काय करीन ? काय करीन आणि काय करणार नाहीं हें कांहीं सांगायला नको. मुकाट्यानं आधी मला पत्ता सांग–नाहींतर माझ्या कामावर गोष्ट पडणार नाहीं. "

लीला संथपणानें म्हणाली, " माहितच नाहीं तर मी सांगूं कुठला ? "

" तुला माहित आहे ! तुला माहित आहे ! " असें म्हणत ती तिला दोन्ही हातांनीं धरून खुदळूं लागली.

माझ्यानें स्वस्थ राहवेना. मी म्हटलें, " सरुबाई, कांहीं माणसाला शोभेल असं वागलं पाहिजे ना ? "

" मी माणूस नाहीं ! " सरुबाई म्हणाली, " समजलं ? मी माणूस नाहीं ! मी कैदाशीण आहें ! वाघीण आहें ! लांडगी आहें ! अशी एकेकांना फाडफाडून खाईन !—"

तिचें बरळणें तसेंच चाललें होतें. पण ती लीलेचे जे हाल करीत होती ते पाहून माझ्यानें स्वस्थ राहवेना. लीला कांहीच प्रतिकार करीत नव्हती.

मी पुढें जाऊन लीलेला तिच्या हातून सोडवायचा प्रयत्न करूं लागलें, तशी ती एकदम हात सोडून खालीं पडली आणि मोठ्यानें भोकांड पसरून रडूं लागली.

काय करावें हें मला कांहींच सुचेना. या बाईला आतां बाहेर कशी काढावी, याचीच मला पंचाईत पडली.

ती रडत असतांना बोलत होती, " मारा ! मारा मला ! मी मेलें कीं तुम्हांला पुनर्विवाह करायला मिळेल. तेवढींच वाट बघतां आहांत ! पण मी जिवंत असेपर्यंत तुमचं कांहीं चालूं देणार नाहीं. अशी आडवी पडेन !—"

ती इतक्या विचकट भाषेंत बोलत होती, कीं त्याचा उल्लेख न करणेंच बरें. तिच्या या आततायी वर्तनाची मला शिसारी आली.

नुसती शिसारी येऊन काय होणार होतें ? हें संकट घराबाहेर कसें घालवावें याचा प्रश्न मला पडला होता. एकदां वाटलें, कीं आतां लीलेला माधवाश्रमांत पाठवावी आणि चंदूला बोलावून घ्यावें. पण तो आला असता तर आमच्या पदरांत खोटेपणाचें माप आलें असतें. आतां एकदा जो शद्ब तोंडांतून निघून गेला, तो खरा करण्याखेरीज गत्यंतर नव्हतें.

मी लीलेला डोळ्यानें खुणावलें आणि ती पुन्हां पुस्तक घेऊन आपल्या टेबलाजवळ बसली. मीही उठून आपल्या टेबलाजवळ गेलें आणि एक्झरसाईज तपासायला लागलें.

तिचें बडबडणें सारखें सुरू होतें. आम्ही दोघीही तिच्याकडे लक्ष देत नाहीं असें पाहून ती धांवतच माझ्या टेबलाजवळ आली आणि टेबलावरील चोपड्या आणि पुस्तकें हातानें भराभर उडवून देऊं लागली.

आत्मसंयमन करणें मला कठीण गेलें. हात धरून तिला जिन्याखालीं लोटून द्यावी, असें मला वाटत होतें. स्वयंपाकघरांतून बाईही धांवत आली.

आणखी एक प्रेक्षक मिळाल्यामुळें तिला अवसान चढलें आणि तिच्या आक्रस्ताळीपणाचा पारा जास्त चढूं लागला.

ती काय बोलत होती हें तिचें तिला तरी समजत होतें कीं नाहीं, याची मला शंका होती. लीला मात्र स्वस्थ बसली होती. काय वाटेल तें झालें तरी उलट उत्तर द्यायचें नाहीं किंवा तिच्या अंगाला हात लावायचा नाहीं, असा मी निश्चय केला होता. लीलेला जरी स्पष्ट तसें सांगण्याची संधी मला मिळाली नव्हती, तरी धोरणानें तिनें माझा उद्देश ताडला होता.

आमच्या सहनशीलतेमुळें तिला अधिकाधिक चेव येत होता. शेजारचीं माणसें येऊन दार ठोठावूं लागलीं, तेव्हां मात्र माझा नाईलाज झाला.

मी हात जोडून तिला म्हटलें, " क्षमा कर. पण हा आरडाओरडा बंद कर. मला कांहीं एक माहीत नाहीं, तूं कितीही ओरडलीस तरी तें फुकट आहे. मला माहीतच नाहीं तर मी तें सांगूं कुठून ? "

मी जाऊन दरवाजा उघडला तेव्हां आमच्या शेजारचे गृहस्थ आंत आले आणि म्हणाले, " हें काय चाललं आहे ? आम्ही कुटुंबवत्सल माणसं शेजारी रहात आहोंत, याची तुम्हांला आठवण आहे का ? "

मी म्हटलें, " या बाईचं डोकं बिघडलं आहे, त्यामुळें ती अशी करते आहे. "

माझ्या तोंडचे ते शब्द ऐकतांच ती बेफाम भडकली आणि तोंडाला येईल तें अद्वातद्वा बोलूं लागली. त्या साऱ्या बोलण्यांत " माझा नवरा ही पळवून नेते आहे ! " हेंच मुख्य पालुपद होतें.

मी त्या शेजारच्या गृहस्थांना म्हटलें, " आतां तरी तुमची खात्री झाली ना ? माझा नाईलाज आहे. हिला कशी हिच्या घरीं नेऊन पोंचवावी, हेंच मला संकट पडलं आहे. "

त्या गृहस्थांचें समाधान झालें आणि ते निघून गेले. ती ओरडत ओरडत त्या गृहस्थाच्या मागें धांवत गेली.

ती गेली असें पाहतांच मी आंतून दार बंद करून घेतलें.

दार बंद केल्याचा आवाज ऐकूं येतांच ती पुन्हां मागें फिरली आणि मोठमोठ्यानें दार ठोठावूं लागली.

माझा जीव अगदीं कासावीस झाला. दुसरें कुणी असतें तर मी पोलिसांना बोलावून घेतलें असतें–पण नातें विसरतां येईना आणि काय करावें हेंही सुचेना. ही अशीच जर दार ठोठावित बसली तर—

मी लीलेजवळ गेलें आणि हळूच तिला विचारलें, " आतां काय करायचं ? "

लीला म्हणाली, " मी तुझा उद्देश समजलें. आतां आपल्याला कांहीं करतां येत नाहीं. काय होईल तें मुकाट्यानं पहात राहिलं पाहिजे. वेळच तशी बिकट आली आहे. आणि ही तर मुंबई ! एवढंसं कुठं खुट्ट झालं तर इथं नगाऱ्यासारखा आवाज होतो. माझं डोकं अगदीं भणभणून गेलं आहे. असं वाटतं, कीं धरावी आणि चांगली बदडून काढावी ! "

" चूप–चूप–ती ऐकेल ! असा काहीं अविचार करूं नकोस बरं. आपण आपलीं स्वस्थ बसूं या. पण ही स्वस्थ तरी बसायला कुठं देते आहे ? शेजाऱ्यापाजाऱ्यांना तर हिनं जागवलंच. त्यांनाच कांहीं दया आली आणि त्यांनीं पोलिसांना कळवलं, तर माझ्या मागचं संकट तरी सुटेल ! "

 

तिचें माथें फिरलें आहे, असें मी शेजाऱ्याला सांगितलें तें नुसती तात्पुरती वेळ मारून नेण्याकरतां होतें खरें–पण आतां खरोखरीच तिला वेड लागलें आहे कीं काय, असें मला वाटूं लागलें. ती सारखी दरवाजावर आदळआपट करीत होती. दरवाजावर डोकें फोडून घेत होती कीं काय, असा आवाजावरून मला संशय आला.

शेजारी पुन्हां धांवून आले आणि त्यांनीं तिला जोराची तंबी दिली. पोलिसांच्या ताब्यांत देईन म्हणून भीतीही घातली.

त्याचा परिणाम झाला असावा, असें मला वाटलें. कारण ती कांहीं वेळ स्वस्थ राहिली.

शेजारी पुन्हां निघून गेले आणि तिची आदळआपटही बंद झाली. बराच वेळपर्यंत सामसूम झाल्यासारखें वाटलें. मी जाऊन दरवाजा उघडून पाहणार होतें पण लीलेनें मला मागें ओढलें आणि हळूच सांगितलें, "दरवाजा उघडूं नकोस. कदाचित् ती बाहेरच असेल. आंत घुसण्यासाठीं स्वस्थ राहून आम्हांला फसवायचा प्रयत्न करीत असेल. कांहीं झालं तरी दरवाजा उघडायचा नाहीं."

संध्याकाळ झाली. चांगला काळोख पडला. बाईनें येऊन दिवे लावले.

पुन्हां एकदां मी कानोसा घेऊन पाहिला. बाहेर कुणी असावें असें वाटलें नाहीं. आमच्या या दरवाजाच्या बाजूला बाहेरच्या भागाला खिडकी नसल्यामुळें आडून पाहणेंही अशक्य झालें होतें. लीला कांहीं केल्या मला दरवाजा उघडूं देत नव्हती.

आणखी कांहीं वेळ गेला. आम्ही जेवायला बसलों, जेवणें लवकर उरकून घेतलीं आणि पुन्हां बैठकीच्या जागीं आलों.

अजूनही सामसूम होती. आतां ती खात्रीनें गेली असावी, असें मला वाटलें. मी दरवाजा उघडायला जात होतें पण लीलाच पुढें झाली आणि तिनें अगदीं यत्किंचितही आवाज न करतां दरवाजाची खीळ काढून अगदीं बारिकशा फटींतून बाहेर पाहिलें आणि पुन्हां दरवाजाला खीळ घातली !

एक पाऊलसुद्धां न वाजवितां ती माझ्याशेजारीं आली आणि हळूच माझ्या कानांत म्हणाली, "अजून ती बाहेर आहे."

मी मटकन् खालीं बसलें. काय करावें हें मला कांहींच सुचेना. चंदूची बायको दाराबाहेर बसून राहिली असतां आपण जेवून खाऊन उठलों याचें माझ्या मनाला

फार लागून राहिलें. दरवाजा उघडून तिला आंत जेवून जायचा आग्रह करावा असें वाटल्यावरून मी लीलेला तसें सांगितलें, तेव्हां ती म्हणाली, " किती वेडी आहेस तूं काकू ! ती तुझ्या घरीं जेवील असं तुला वाटतं का ? तूं घरांत पाऊल टाकलंस म्हणून तिनं उपास केला. ती काय तुझ्या घरीं येऊन जेवणार आहे ? जेवायचं तर राहोच, पण या रात्रीच्या वेळीं पुन्हां अकांडतांडव मात्र करील आणि शेजारच्या लोकांना त्रास होईल. तिचा आग्रह तरी किती निर्धाराचा आहे हें पाहूं ! आपण आतां आपल्या कामाला लागूं. तूं एवढ्या या कविता मला समजावून दे पाहूं. आपण जर बोलल्याशिवाय राहिलों तर तिला वाटेल, कीं आम्ही कानोसा घेत आहोंत. कांहींतरी कामाला लागलं पाहिजे, कांहींतरी बोललं पाहिजे, त्याशिवाय ती कांहीं निघून जायची नाहीं. "

मी लीलेला तिचा धडा समजावून द्यायला सुरवात केली. तिला शिकवतांना मला मन अगदीं घट्ट करावें लागलें होतें. अन्तःकरणाची कालवाकालव चालली असतांना बळेंच निगरगट्टपणा ओढून आणावा लागत होता. मला तें दुःसह होत होतें. पण त्याला कांहीं इलाज नव्हता.

एक तासभर तरी मी तिचा अभ्यास घेतला. आणि ज्यावेळीं आतां पुरे म्हणून म्हटलें त्याच वेळीं हळूच कुणीतरी दार ठोठावलें.

मला वाटलें सरुबाई गेली असावी आणि कदाचित् चंदू आला असावा. तें दार ठोठावणें दांडगेपणाचें नव्हतें. अगदीं हळूच दारावर टिचक्या मारल्या जात होत्या.

लीलेनें मला मागें लोटलें आणि दाराजवळ जाऊन कानोसा घेतला.

ती परत आली आणि मला म्हणाली, " अजून तीच बाहेर आहे. बांगड्या खुळखुळल्याचा आवाज मला स्पष्ट ऐकूं आला. चंदू आला आहे, असं आम्हांला वाटावं म्हणून ती अशा नाजूक टिचक्या मारते आहे. "

मी डोळे मिटून स्वस्थ एका आराम खुर्चीवर पडलें. मला कांहीं सुचत नाहींसें झालें होतें. तासाचे तास एक बाईमाणूस दाराबाहेर राहिली असतां आपण आपले सारे व्यवहार अगदीं कांहीं झालें नाहीं असें समजून चालवीत आहों, याची मला लाज वाटली.

पण त्याला कांहीं इलाज नव्हता. जो एकदां निर्धार केला तो तडीला नेणें भाग

होतें. गडी रात्रीच्या वेळीं कामासाठीं येत नसे म्हणून बरें, नाहींतर तो आला असता म्हणजे अर्थात्च दरवाजा उघडावा लागला असता.

बराच वेळ आम्ही वाचीत बसलों आणि नंतर बिछाने घालून दिवे मालवले. टिचक्या आधींच बंद झाल्या होत्या. कानोसा घ्यावा म्हणून लीला पुन्हां दाराजवळ गेली आणि पहिल्याप्रमाणें हळूच दार किलकिलें करून तिनें पाहिलें. बाहेर कोणी असल्याचें दिसून आलें नाहीं.

हळूहळू दरवाजा थोडा थोडा उघडला आणि बाहेर डोकावलें, त्यावेळीं बाहेर कुणी नाहीं असें दिसून येतांच दरवाजा साफ उघडून ती एकदां बाहेर जाऊन नीट पाहून आली.

सरुबाई निघून गेली होती.

# प्रकरण अठरावें ........................................ रोगनिदान

दुसऱ्या दिवशीं सकाळीं दार उघडतांना देखील आम्ही भीत होतों. कुणी सांगावें ? कदाचित् सरुबाई बाहेर असायची ! लीलेनें कालच्याप्रमाणेंच दार किलकिलें करून पाहिलें आणि कुणी नाहीं अशी खात्री करून घेतल्यावर तें उघडलें.

मला समाधान वाटेना ! दार बंदच करून ठेवलेलें बरें, असें वाटून मी लीलेला तसें सांगितलें.

आठ वाजण्याच्या सुमाराला चंदू आला. त्याला पाहतांच माझ्या काळजांत धस्स झालें. हा आलेला आणि तीही इतक्यांत आली तर? मी त्याला आधीं आंतल्या खोलींत होण्यास सांगितलें.

लीलेनें दरवाजा बंद करून घेतला आणि नांव सांगितल्याशिवाय दार उघडूं नको असें स्वयंपाकीणबाईलाही सांगितलें.

झालेली सर्व हकिकत चंदूला सांगितली तेव्हां तो तोंड झांकून रडूं लागला. तो डोळे पुसून म्हणाला, " माझ्यामुळं तुम्हांला एवढे कष्ट सहन करावे लागले, याचं

मला काय वाटतं तें शब्दांनीं व्यक्त करून सांगतां यायचं नाहीं. या मगरमिठींतून मी कसा सुटणार ? हा त्रास माझ्या मागं असता तर तो मी मुकाट्यानं सहन केला असता पण माझ्यामुळं निष्कारण तुम्हांला त्रास होतो आहे, तेंच मला कठीण जातं आहे ! ”

लीला म्हणाली, “ महिना दीड महिन्याचं भाडं भरावं लागलं तरी बेहेत्तर पण मला वाटतं, दुसरी जागा मिळत असली तर आजच्या आजच बिन्हाड बदलावं. ”

ती लीलेची कल्पना मलाही पसंत पडली. माझा जीव अगदीं बावरल्यासारखा झाला होता. सरुबाईनें पुन्हां येऊन आकांत केला तर शेजाऱ्यासमोर ती शोभा नको. तेव्हांच्या तेव्हां जागा पहायला मी चंदूला सांगितलें. कशी वाटेल तसली जागा मिळो—पण इथून एकदांचें बिन्हाड बदलूं !

चंदू तसाच बाहेर निघाला. आम्ही जेवायला बसून उठायच्या बेतांत होतों—इतक्यांत चंदू परत आला.

आयत्या वेळीं खरी—पण जागा चांगलीच मिळाली होती. मी शाळेंत गेलें पण लीला घरीं राहिली. लगेच बिन्हाड बदलायचें ठरलें. सर्व बिन्हाड बदलून लीलेनें शाळा सुटण्याच्या सुमारास येऊन मला त्या बिन्हाडीं घेऊन जावें, असें ठरल्यावर मी शाळेंत निघून गेलें.

जागा बदलल्यामुळें मनाला एक प्रकारें समाधान वाटत होतें. आदल्या दिवशींच्या मानसिक उद्वेगामुळें माझी मनःस्थिति शाळेंतील मुलींना दिसून आली. तसें आज करावयाचें नाहीं, असा मी निश्चय केला होता—तरीदेखील मधून मधून माझें चित्त ठिकाणावर नसे.

पण मी वेळींच सावध होत होतें आणि कशी बशी वेळ सरसावून नेत होतें.

संध्याकाळीं नव्या बिन्हाडीं आलें त्या वेळीं मला खरोखरीच आनंद झाला. जागा चांगलीच होती. भाडें तेवढेंच असलें तरी पूर्वीपेक्षां दोन खोल्या जास्त होत्या—तितकीच स्वतंत्रताही होती. आजचा दिवस तर भीति नाहीं, असें वाटून आम्ही तेवढ्यापुरतीं निर्धास्त झालों.

चंदू माधवाश्रमांतच राहिला होता. त्याचा पत्ता सरूबाईला लागला नसावा असें दिसून आलें. त्यानें आपल्या एका मित्राला पाठवून अंदाज घेण्यास सांगितलें;

त्यावरून त्याला असें दिसून आलें, कीं सरूबाईला कुणाचाच पत्ता लागला नव्हता. सर्व मंडळी गांवीं कोंकणांत गेली असल्याचें तिनें बेधडक त्या गृहस्थाला सांगितलें. तिनें अजून जागा सोडली नव्हती.

माझ्या शाळेचा पत्ताही तिला मिळाला नसावा. नाहीं तर, मला वाटतें, ती तिथेंही आली असती.

बरेच दिवस निघून गेले. तितक्या मुदतींत कांहीं विशेष असें घडलें नाहीं.

पुढें सुट्टी आली. त्या सुट्टींत आम्ही दोघांनींही कोकणांत जायचें ठरविलें. चंदूला हा बेत मुद्दामच कळविला नव्हता. त्यानें अलिकडे वकिली टाकून पुन्हां मेडिकल कॉलेजांत जायला सुरवात केली होती. त्या वर्षीं तो परीक्षेला बसला होता आणि त्याच महिन्यांत परीक्षेचा निकाल लागणार होता. परिक्षेच्या निकालाच्या बाबतींत तो बराच साशंक होता. पुष्कळ दिवसांची अभ्यासाची संवय सुटल्यामुळें आणि ते विषयच भिन्न प्रकारचे असल्यामुळें, त्याला निकालाची खात्री वाटत नव्हती.

कोंकणांत जाऊन पोंहोचेपर्यंत आम्ही काका आणि ताईला इकडची हकिकत कळविली नव्हती. गेल्यावर सर्व हकिकत सांगितली तेव्हां काका अगदीं स्तंभित झाले. ताईच्या डोळ्यांना तर पाणीच आलें.

ताई म्हणाली, " कशी या संकटांतून निभावली असशील तें तुझं तुलाच ठाऊक ! मी असतें तर अगदीं वेडी झालें असतें. काय पण मेलीचा आततायी स्वभाव ! या असल्या माणसाच्या घरची शिकवणूक तरी कशी असते कोण जाणे ? एकंदर प्रकार पाहतां, ती निर्बुद्ध आहे, असं कांहीं म्हणतां यायचं नाहीं–पण ती बुद्धीचा दुरुपयोग करते आहे, हें मात्र स्पष्ट दिसून येतं आहे. "

काका म्हणाले, " हा आमचा समाज ! आमच्या समाजांतील या विलक्षण चाली रीतीमुळं हे असे प्रकार होतात. आतां तिचं काय झालं असेल ? समजा, ती एकटीच एकादे दिवशीं उठून माहेरीं निघून गेली आणि घर तसंच उघडं पडलं, तर स्वयंपाकी आणि गडी यांनीं काय करावं ? भालू दुसरीकडेच जाऊन राहिलेला. त्याचा पत्ता यांना नाहीं, आणि उद्यां स्वयंपाकी गडीदेखील घर उघडं टाकून निघून गेले, तर काय व्हायचं ? या भालूच्या भेकडपणाचं मला फार आश्चर्य वाटतं. कशी तिला याला ताब्यांत ठेवतां येत नाहीं ?—"

मी मधेंच म्हटलें, " त्याबद्दल मात्र मी त्याला दोष देणार नाहीं. तिला ताब्यांत ठेवणं अगदीं अशक्य झालं आहे, हें मी प्रत्यक्ष अनुभवलं आहे. तिच्या स्वभावाला म्हणावं तरी काय, हेंच सांगतां यायचं नाहीं. आततायीपणाची असली कमाल कुणी कुठंही पाहिली नसेल. "

" बरं ? तुम्ही येतांना भालूला सांगितलं नव्हतं का ? " काकांनीं विचारलें.

" हल्लीं चार दिवस तो आमच्या बिऱ्हाडाकडे आला नव्हता. " मी म्हटलें, " आणि मीही मुद्दाम त्याला बोलवायचं टाळलं. आमची स्वयंपाकीणबाईही गांवीं गेली आहे. बिऱ्हाडाला कुलूप आहे. तेवढ्यावरून अंदाज करून आम्हीं इकडे आलों आहों असा जर त्यानं समज करून घेतला, तर मला वाटतं कदाचित् तो इकडेही येईल. त्याला मुद्दाम कळवणं मला बरं वाटलं नाहीं. सारीच चोराचोरी ! त्या बाईच्या भीतीनं आम्हांला कसं वागावं लागत होतं, याची सांगूनसुद्धां कल्पना यायची नाहीं. तिच्या-पुढं आम्ही अगदीं हात टेकले. माझ्या विलायतेच्या सगळ्या डिग्र्या तिच्यापुढं फुकट गेल्या ! "

माझें भाषण ऐकून लीला हसूं लागली. ताई म्हणाली, " हंसतेस काय ? या हंसायच्या का गोष्टी आहेत ? "

लीला ताईला म्हणाली, " थांब ! मी तुला थोडासा नमुना दाखवतें. मी कांहीं काकूला हंसत नव्हतें. मला सरुबाईची त्या दिवशींची आठवण झाली म्हणून हंसूं आलं. आतां पहा–" असें म्हणून तिनें सरुबाईनें केलेल्या थैमानाची कांहीं सोंगं अगदीं हुबेहुब वठवून दाखविलीं. तीं दाखवितांना तिला माझी मदत घ्यावी लागली होती. मीही तो अभिनय पुन्हां करून दाखविला.

तो प्रकार पाहून ताई हंसत होती खरी–पण काका अगदीं गंभीर झाले होते.

ते म्हणाले, " खरोखरीच जर तिनं असं केलं असेल, तर मला वाटतं, मी तिला चाबकानं हाणलं असतं. मी सहनशील आहें. पण सहनशीलतेला देखील कांहीं मर्यादा आहे. मला वाटतं, भालूनं जर थोडासा प्रतोदप्रयोग केला असता तर हें गाणं सुरावर आलं असतं. "

ताई म्हणाली, " ऐक मथू ! हे सुधारक बरं ! यांच्या डोक्यांतले चाबूक

अजून जात नाहींत! बायका म्हणजे पायांतलीं खेटरं, ही कल्पना अजून यांच्या डोक्यांत आहे—"

"असं मी कुठं म्हणतों आहें?" काका म्हणाले, "जशाला तसं वागल्या-शिवाय या जगांत चालत नाहीं. ती बायको आहे म्हणून हा उपाय मी सांगत नाहीं. मुलगा असता आणि त्यानं अशींच थेरं केलीं असतीं तर मी तोच उपाय सांगितला असता. मारणं मला आवडत नाहीं. मुलांना मारणं म्हणजे पशुत्वाचं लक्षण आहे, असं मी म्हणतों. पण मला वाटतं, असल्या प्रकाराला चाबकाखेरीज दुसरं औषध नाहीं. माझा समज आहे, कीं सरुबाई हिस्टेरिक आहे. हिस्टेरियेला उपाय म्हणजे चाबूक. तें औषध आहे—शिक्षा नव्हे!"

मी म्हटलें, "औषध असेल पण तें माणुसकीचं होत नाहीं. स्त्री असो कीं पुरुष असो—कुणालाही चाबकानं मारणं माणुसकीचं लक्षण नव्हे, असं मला तरी वाटतं. हा संतापाचा अतिरेक माणसाला बेफाम करायला कारणीभूत होतो. चाबकाच्या उपायानं अपायच जास्त होईल, अशी माझी खात्री आहे. याला खरा उपाय म्हणजे एकच आहे—पण तो आपल्या हातीं नाहीं."

"कोणता उपाय?" ताईनें विचारलें.

"तो उपाय म्हणजे—" मी उत्तर दिलें, "ज्या दोन माणसांचं एकमेकाशीं पटत नाहीं, त्यांचं केवळ लग्न लागलं आहे म्हणून सक्तीनं त्यांना एका जागीं रहायला भाग पाडणं, म्हणजे अन्याय आहे. देवाघरीं हा न्याय होणार नाहीं. माणसाच्या घरीं कदाचित् तो अन्याय समजला जात नसेल—माणसाच्या साऱ्या व्यवहारांत सदोदीत पूर्ण माणुसकी असते असं कांहीं म्हणतां यायचं नाहीं—हें एक त्याचंच उदाहरण आहे. Cruelty to animals चा कायदा आहे. जनावरांना निर्दयपणानं वागवलं, तर त्या निर्दय मनुष्याला शिक्षा होते—पण माणसांना निर्दय-पणानं वागवणाराला अशा या प्रकारच्या संबंधांत कुठंच शिक्षा सांगितलेली नाहीं. बापानं मुलीला मारलं तर फिर्याद करणार कोण? नवऱ्यानं बायकोला मारलं तर कदाचित् तिच्या माहेरचीं माणसं तिच्या वतीनं नवऱ्यावर फिर्याद करतील आणि त्याला शिक्षाही करायला लावतील—पण बायको ज्यावेळीं अशा आततायीपणानं नवऱ्याला छळते, त्यावेळीं नवऱ्यानं काय करावं? एकादा नवरा

बायकोला मार देतो त्यावेळीं तो कायदेशीर गुन्हा ठरतो–पण मार न देतां बायकोकरवीं झालेला नवऱ्याचा हा असा छळ, कायद्याच्या कोणत्याच कलमाखालीं येत नाहीं. इथं त्या नवऱ्याचं रक्षण कुणी करायचं, हा मोठा बिकट प्रश्न आहे. कायद्यांत याला कांहीं आधार नसला तर तो कायदा बदलून घेतला पाहिजे, असं हें उदाहरण पाहून मला वाटूं लागलं आहे. ”

“ खरं आहे ! खरं आहे ! ” काका म्हणाले, “ तुझं म्हणणं अक्षरशः खरं आहे. मला आतां पटलं. झालेली हकिकत ऐकून माझं मस्तक भणाणून गेलं होतं म्हणून मी चाबकाचा उपाय सुचवला. पण मी प्रांजलपणानं कबूल करतों, ती माझी चूक होती. तूं म्हणतेस हाच त्याचा उपाय–पण तो उपाय मात्र आज कायद्यांत विद्यमान नाहीं–पण यापुढं अशा प्रकारची सुधारणा कायद्यांत कुणी करील, अशी कल्पनासुद्धां करूं नकोस ! ”

ताई म्हणाली, “ मग आतां चंदूभावजींनीं काय करावं ? या संकटांतून त्यांची सुटका कशी व्हावी ? ”

“ पूर्वकर्मांची फळं भोगतों आहें, असं म्हणून स्वस्थ बसावं झालं ! ” काका म्हणाले, “ पूर्वकर्मांचा आधार समाधानाला फार उत्तम. पण नुसत्या तेवढ्या समाधानानं माणूस स्वस्थ बसत नाहीं. यांत भाल्चा भेकडपणा झाला आहे यांत मात्र शंका नाहीं. त्यानं काय केलं पाहिजे, हें आज निश्चितपणानं जरी मला सांगतां येत नाहीं, तरी त्यानं याच्यापेक्षां जास्त पुरुषार्थ दाखवला पाहिजे होता, असं मला वाटतं आहे. त्याचं धोरण कुठंतरी चुकलं आहे–अगदीं पहिल्यापासूनच चुकलं आहे, असं मला पूर्वीपासूनच वाटतं आहे. पण गोष्टी या थराला येतील ही कल्पना मला पूर्वी नव्हती. नानासाहेबांनीं ठिणगी टाकली नसती तर ही आग खात्रीनं इतकी पेटली नसती. धुसफुस सुरू झाली असती–पण ती धार्मिक बाबीवर. हा असल्या प्रकारचा मत्सर शिरायला नानासाहेब जितके कारण झाले तितकाच अपराध भाल्चाही आहे. पूर्वकर्म दूर राहो–पण त्यानं प्रत्यक्ष याच वेळीं जी चूक केली आहे, त्याचं फळ त्याला भोगलं पाहिजे. त्याच्या चुकीमुळं मथूला आणि लीलेला त्रास भोगावा लागला, याचंच मला काय तें वाईट वाटतं. ”

तो विषय तेवढाच राहिला. पुढें बोलण्याजोगें असें कांहींच राहिलें नव्हतें.

मी आल्यानंतर गांवांतल्या लोकांत थोडथोडें मिसळण्याचा प्रयत्न चालविला. देवाच्या कौलामुळें आतां मला कुणी दोष द्यायला तयार नव्हतें, त्याचा मी फायदा घेतला. जुन्या मंडळींनीं पुन्हां एकदां माझें पुराण व्हावें म्हणून सुचविलें.

जुन्या आठवणींमुळें मला ती सूचना योग्य वाटली नाहीं. नव्या शिक्षणामुळें मला नवी दृष्टि आली होती. पूर्वीच्या काळीं स्वतःच्या बुद्धीच्या बळावर मी पुराणें सांगितलीं होतीं. त्यावेळीं माझी दृष्टि व्यापक झाली नव्हती. त्यावेळचीं माझीं पुराणें लोकांना आवडलीं ती माझ्या आकुंचित बुद्धीच्या प्रभावामुळेंच आवडलीं, असें मला केव्हां केव्हां वाटत असे. पण आतां नवीन मिळालेल्या दृष्टीचा उपयोग करून जर मी पुराणें सांगितलीं, तर त्याचा काय परिणाम होतो हा प्रयोग पाहण्याच्या जिज्ञासेनेंच जुन्या मित्रांच्या आग्रहाला मी मान दिला.

पुन्हां देवळांत माझें व्याख्यान झालें. मी व्याख्यान म्हटलें याचें कारण एवढेंच, कीं जरी त्याला 'पुराण' हें नांव दिलें होतें तरी माझ्या दृष्टीनें तें 'व्याख्यान' होतें. पूर्वी श्लोकाश्लोकावर जशी मी टीका सांगत होतें, तशी यावेळीं सांगितली नाहीं. एकच श्लोक घेऊन त्याच्यावर सबंध चर्चा केली. उदाहरणासाठीं मधून मधून पुराणांतल्या गोष्टी घेऊन त्या नवीन दृष्टीनें–म्हणजे भाविकपणा वगळून–केवळ वास्तवतेच्या दृष्टीनें–मी सांगायला सुरवात केली.

श्रोत्यांवर माझी सारखी नजर होती. त्यांना पटेल तेवढेंच सांगायचें, त्यांच्या शक्तीबाहेर जाईल अशी कोणतीच गोष्ट सांगायची नाहीं, अशी इच्छा धरल्यामुळें मला सर्व श्रोत्यांच्या नाडीवर जसा कांहीं हात ठेवून वक्तृत्व साधावें लागत होतें.

पुराण संपल्यावर जी चर्चा झाली त्यांत भाग घ्यायला पूर्वीच्या श्रोत्यांपैकीं बरीच मंडळी होती. शहरांतून व्याख्यानें झालीं तरी त्याची चर्चा करीत नंतर कुणी बसत नाहीं.

खेडेगांवची स्थिती तशी नाहीं. खेडेगांवच्या लोकांचीं जिज्ञासा तीव्र असते. व्याख्यान किंवा पुराण संपल्यावर त्या वक्त्याशीं किंवा पुराणिकाशीं चर्चा करण्याची त्यांना आवड असते. त्या आवडीला अनुसरून पुष्कळांनीं मन मोकळें करून माझ्याशीं चर्चा केली, आपल्या शंका विचारल्या आणि त्या शंकांचें मी माझ्या बुद्धीप्रमाणें समतोलपणानें विवेचन करून सांगितलें. पुराणांतील कथा सांगतांना त्यांतील अतिशयोक्तिपूर्ण आणि लाक्षणिक भाग मी वगळला होता–किंबहुना अशा

भागाचें वास्तवतेनें विशदीकरण केलें होतें. कित्येक वृद्धांना तें आवडलें नाहीं खरें, पण पुराणानंतर जी चर्चा झाली त्यांत मोकळेपणानें मी पुन्हां प्रत्येक गोष्टीचें विश्लेषण करून ज्यावेळीं सांगितलें, त्यावेळीं सर्वांचेंच समाधान झाल्याचें मला दिसून आलें.

शहरांतील श्रोत्यापेक्षां खेडेगांवचे श्रोते जास्त सहृदय आहेत, असा मला त्यावेळीं अनुभव आला–ते नुसते जास्त सहृदयच नव्हेत तर जास्त जिज्ञासू आणि जास्त प्रामाणिक आहेत, असेंच मला दिसून आलें. उगीच टवाळी करण्याची त्यांची प्रवृत्ति नसते. शहरांत ही प्रवृत्ति फार त्यामुळें एकादा विषय समजून घेण्यापेक्षां नुसती कुचेष्टा करण्याची आवड शहरांतील लोकांत जास्त प्रमाणांत दिसून येते.

खेडेगांवांत देखील कुचेष्टेखोर नाहींत असें नाहीं, पण त्यांची संख्या शहरच्या तुलनेनें अतिशय अल्प आहे, असें माझ्या अनुभवास आलें.

चर्चा करणारांत कित्येक बरेच वृद्ध होते. त्यांचीं मतें ठाम झालेलीं होतीं. तरीही नव्या पद्धतीनें पुराणांतल्या जुन्या गोष्टीचें मी केलेलें विवेचन त्यांना आवडल्यावांचून राहिलें नाहीं. इतकेंच नव्हे, तर त्या प्रकारानें विवेचन केल्यामुळें जी एक नवीन दृष्टी आली, ती पूर्वी आपल्याला अपरिचित होती, असें कबूल करण्यासदेखील त्यांनीं संकोच केला नाहीं.

हा अनुभव घ्यायला मला बरीच संधी मिळाली. आजूबाजूच्या खेड्यांतून मला प्रत्यहीं आमंत्रणें येऊं लागलीं. दररोज कुठें ना कुठें तरी माझें पुराण झालें नाहीं असा एकही दिवस गेला नाहीं. लीला सदोदित माझ्याबरोबर असे आणि माझी पुराणाची पद्धत लक्षपूर्वक अवलोकन करीत असे.

कोणत्याही गांवीं गेलें तरी अनुभव तोच येई. पुराण संपल्यावर श्रोते आपल्या शंका विचारायला उत्सुक असत आणि त्यांच्या शंकांचें समाधान करण्यांत मला मोठा आनंद वाटे.

निरनिराळ्या सामाजिक प्रश्नांच्या अनुरोधानें पुराणांतील कथाभाग निवडून त्यावर मी हीं पुराणें सांगत असें. समाजसुधारणेचा प्रश्न म्हणून जर मी त्यांच्यापुढें व्याख्यानें दिलीं असतीं, तर तीं ऐकायला कुणीही उभें राहिलें नसतें–पण पौराणिक गोष्टी सांगतांना तेच सामाजिक प्रश्न सोडविण्याचा ज्या ज्या वेळीं मी प्रयत्न केला त्या त्या वेळीं तो यशस्वी झाला, असेंच दिसून आलें.

हें एक नवें शस्त्र हातीं मिळालें, असें मला वाटलें. मला सर्व प्रकारची अनुकूलता असती तर नोकरी सोडून देऊन मी याच कार्याला सर्वस्वीं वाहून घेतलें असतें, असें वाटण्याइतका आत्मविश्वास या पुराणांच्या प्रयोगामुळें माझ्या ठायीं उत्पन्न झाला. अशी परिस्थिति आल्यावर नोकरीची बेडी तोडून टाकून याच कार्याला सर्वस्वीं वाहून घ्यायचें असें मी मनाशीं ठरवूं लागलें.

ज्या वेळीं काकांना मी असें बोलून दाखविलें त्या वेळीं त्यांना फार आनंद झाला. ती त्यांची आवडती कल्पना होती. खेडेगांवांतील प्रचाराचीं कार्यें सुशिक्षित स्त्रियांनींच उचललीं पाहिजेत, असा त्यांचा समज होता.

सुशिक्षित स्त्रिया ज्यावेळीं अशा एकाद्या खेडेगांवांतून सामाजिक प्रश्नांची चर्चा करतात, त्यावेळीं पूर्वसंस्कार प्रतिष्ठित झालेल्या खेडेगांवच्या लोकांच्या मनावर आघात बसतील अशा प्रकारची भाषा वापरतात. त्याचाच दुष्परिणाम होतो. ही चूक मी केली नाहीं, हें पाहून त्यांना आनंद झाला.

माझ्या सर्वच व्याख्यानांना ते हजर होते असें नाहीं—पण प्रत्येक व्याख्यानाची हकिकत त्यांच्या कानीं रोज येऊन पोंचत असे. ती हकिकत मी स्वतः सांगण्यापेक्षां त्या श्रोत्यांनींच सांगण्याचा त्यांच्या मनावर जास्त परिणाम होत असे. त्या श्रोत्यांनीं केलेली स्तुति ऐकून घेऊन ते स्वस्थ रहात नसत; तर मी सांगितलें काय, त्यांना कळलें काय, पुराणानंतर त्यांनीं कोणकोणत्या प्रश्नावर चर्चा केली आणि त्यामुळें ऐकणारांचें काय समाधान झालें, या प्रत्येक गोष्टीचा ते अगदीं बारकाईनें पडताळा घेत असत. या पडताळ्यांतून जो सारांश निघे, त्याच्या अनुरोधानें माझ्याशीं पुन्हां चर्चा करून, ते मला नवीन नवीन कल्पना सुचवून देत असत.

पूर्वीच्या गांजणुकीनंतर हा काळ मोठ्या आनंदाचा गेला. लीलाही मोठ्या उत्साहानें मला सदोदित उत्तेजन देत असे. तिला पुराणांतील कथांची बहुधा कांहींच माहिती नव्हती असें म्हटलें तर तें चुकीचें होणार नाहीं. मी तिच्याकडून जुनीं जुनीं पुराणें वाचून घ्यायला सुरवात केली आणि उपनिषदांचा अर्थ रोज तिला समजावून देऊं लागलें. तीही अंतःकरणपूर्वक या अभ्यासांत लक्ष लावूं लागली, त्यामुळें तिला शिकविण्यांत मला एक प्रकारचा कैफ येऊं लागला.

हें आनंदाचें साम्राज्य चालू असतां एके दिवशीं अचानक चंदू येऊन दाखल झाला.

# प्रकरण एकोणीसावें ............................ जन्मभूमींत

चंदू येईल अशी अपेक्षा मला पहिल्यापासून होतीच—त्याप्रमाणें तो आला—याचें मला मुळींच आश्चर्य वाटलें नाहीं.

पण तो आलेला पाहतांच काका आणि ताई यांना मात्र असमाधान उत्पन्न झालें. तो आल्यानें कोणत्याही प्रकारचा त्रास होईल असा त्यांचा समज नव्हता. पण त्यांना जें असमाधान उत्पन्न झालें तें त्याच्या प्रकृतीकडे पाहिल्यामुळें.

त्याची प्रकृती अगदीं ढासळलेली दिसत होती. डोळे खोल गेले होते. गालांना खळग्या पडल्या होत्या आणि बरेचसे केंस पिकलेले दिसत होते. इतक्या थोड्या दिवसांत तो म्हातारा कसा झाला याचें मलाही आश्चर्य वाटलें.

त्यानें हकिकत सांगितली तीही चमत्कारिक होती. सरुबाईनें शेवटीं त्याचा पत्ता लावला आणि येऊन माधवाश्रमांत ठाणें दिलें. अर्थात्च बिन्हाड सोडावें लागलें. माधवाश्रमांत त्यावेळीं कुटुंबवत्सल माणसें येऊन रहात नव्हतीं. हें दंपत्य तिथें येऊन राहिल्यामुळें इतर लोकांत चर्चा सुरू झाली.

चंदू कॉलेजांत जातच होता. जरी परिक्षा झाली होती तरीही तो हॉस्पिटल अटेण्ड करीत असे. जरूरी नसतांही त्यानें तें काम मुद्दामच ओढून अंगावर घेतलें होतें. कोणत्या ना कोणत्या तरी कारणानें सरुबाईपासून शक्य तेवढें दूर रहावें, एवढाच त्याचा उद्देश होता.

तिच्या सक्तीच्या सहवासामुळें त्याला फार त्रास होऊं लागला. एके दिवशीं त्यानें एक उपाय केला.

माधवाश्रमांतील बिऱ्हाड मोडून त्यानें एके दिवशीं स्टेशनचा रस्ता धरला—अर्थात्‌च ती त्याच्याबरोबर आली. दोघांचीही तिकिटें काढून तो पुण्याला जायला निघाला. सामान त्यानें स्टेशनवरच ठेवून दिलें होतें. तिचें तेवढें सामान बरोबर घेऊन तो तिच्या माहेरीं गेला—अर्थात तीही बरोबरच गेली.

दोघेंहीं आल्याचें पाहून त्याच्या सासऱ्याला आश्चर्य वाटलें. दोघांचें कोणत्याही रीतीनें वितुष्ट आलेलें आहे, हें त्यानें सासऱ्याला दिसूं दिलें नाहीं.

यावेळीं मात्र सरुबाई फसली. माहेरीं आल्यामुळें चंदूवर तिला कडक नजर ठेवतां येईना. आपलें भांडण झालें आहे, हें तिला दिसूं द्यायचें नव्हतें—कारण चंदूही कांहीं बोलला नव्हता. दोन प्रहरच्या वेळीं ती येऊन पोंचल्यामुळें ती घरांत गुंतली आहे, असें पाहून चंदूनें एकदम काढता पाय घेतला, स्टेशनवरचें आपलें सामान घेतलें आणि एकदम टांगा करून तो खंडाळ्यास गेला. तिथून दुपारच्या गाडीनें मुंबईला येऊन एका मित्राकडे राहिला आणि दुसऱ्या दिवशीं सकाळीं उठून आगबोटीनें गांवीं आला.

अजूनही त्याला धाकधूक वाटत होती. तो निघून गेल्यावर गडबड उडाली असेल, सरुबाई आणि तिचा बाप स्टेशनवर शोधायला गेले असतील, त्यांनीं प्रत्येक गाडी तपासून पाहिली असेल, अशी अटकळ करतां आली असती.

सरुबाई तेवढ्यावरच थांबणार नाहीं. ती मुंबईला येऊन चौकशी करून तिथें पत्ता न लागल्यास धोरणानें कोकणांत निघून येईल, अशी शंका आम्हां सर्वांना आल्यावांचून राहिली नाहीं.

काका म्हणाले, "इथं येऊन तिनं कितीही धुडगूस घातला तरी त्याचं मला कांहींएक वाटणार नाहीं. घर मोठं आहे, जवळ कुणी शेजारीही नाहींत, गांवांत

माझें वजन आहे, मी इथला खोत आहें तसाच पोलिस पाटीलही आहें—फार गडबड करील तर तिला उचलून रत्नागिरीला वेड्याच्या हॉस्पिटलमधें ठेवून देईन !"

काकांच्या या भाषणानें आम्हाला जरी धीर आला तरी तितकेंच वाईट वाटलें. आपण होऊन आपल्या घरच्या माणसाला वेड्याच्या हॉस्पिटलांत पाठवून देण्याचा प्रसंग यावा, हें दुर्दैवच नव्हे तर काय ?

चंदू आल्यापासून अगदीं स्वस्थ पडलेला असे. झालेली हकिकत सांगण्यापलिकडे तो फारसा बोललादेखील नाहीं. त्याची स्थिती पाहून ताईचें अंतःकरण तिळतिळ तुटत होतें.

पण त्याला कांहीं उपाय नव्हता. काकांनीं अगदीं निर्धारच केला होता, वाटेल तें वजन खर्च करून तिला वेडी ठरवायची आणि रत्नागिरीला पाठवायची !

माझ्या उद्गारांची आठवण येऊन माझें मलाच वाईट वाटलें. मुंबईला आमच्या शेजाऱ्यांनीं ज्यावेळीं चौकशी केली त्यावेळीं मी त्यांना असेंच उत्तर दिलें होतें. तिचा तो धुडगूस पाहून त्यांनाही माझें म्हणणें खरें वाटलें होतें. त्यामुळें काकांच्या या कल्पनेचें मलाही कौतुकच वाटलें. ती ज्या प्रकारचा थयथयाट करीत होती तो प्रकार वेडाच्या नांवाखालीं मोडणें मुळींच अशक्य नव्हतें.

शेवटीं तो प्रसंग आलाच. ती आली आणि तिचा बापही आला.

घर मोठें असल्यामुळें चंदूला वाटेल तिथें एकांत मिळविणें अशक्य नव्हतें. तो एका कोपऱ्याच्या खोलींत जाऊन आंतून खीळ देऊन पडून राहिला होता. जें कांहीं बोलणें झालें, तें काकांचें व सरुबाईच्या बापाचें.

काकांनीं मला बोलावून घेतलें आणि मुंबईची सर्व हकिकत यथातथ्य सरुबाईच्या बापाला सांगायला लावली. त्यालाही त्या प्रकाराची कल्पना नव्हती.

झालेले प्रकार त्याला आवडले नाहींत खरे, पण पोटच्या गोळ्याचा अभिमान त्याला सोडतां येईना. लंगडीं विधानें उत्पन्न करून त्यानें तिच्या वर्तनाचें समर्थन करण्याचा प्रयत्न केला त्यावेळीं काका म्हणाले, "असा हट्ट करण्यांत काय अर्थ आहे ? त्याचं तिचं पटत नाहीं. दोघं एकमेकाशीं बोलत नाहींत. अशा वेळीं दोघांनीं एका जागीं राहून काय अर्थ आहे ? ज्या गोष्टीमुळं कुणालाच सुख नाहीं, त्या गोष्टी करण्याचा दुराग्रह कशाला धरायचा ? तुम्हांला माझी सूचना कठोरपणाची वाटेल पण मी स्पष्ट म्हणतों, कीं कायद्यानं हा संबंध तोडतां येत नसेल तर व्यवहारानं

तोडून टाकण्याखेरीज दुसरा उपायच नाहीं. तुम्ही तिला आपल्या घरीं घेऊन जा. तिच्या चरितार्थाचा भार मी घेतों. तुम्ही ठरवाल ती रक्कम मी दरमहा तुमच्याकडे पाठवून देईन. स्नेही या नात्यानें उपदेश करण्याचा माझा जो हक्क आहे, त्या आधारें तुम्हांला सांगतों, कीं तिला एकाद्या चांगल्याशा शाळेंत घाला, चांगलं शिक्षण द्या आणि स्वतःचा चरितार्थ स्वतः मिळवायला ती समर्थ होईल असं करा. यापुढं त्या दोघांचं पटणं अशक्याहून अशक्य आहे. ''

सरुबाईचा बाप म्हणाला, '' तुम्हीच असं म्हणूं लागलां तर मी काय म्हणावं? मी होऊन मुलीला आणून घरीं ठेवली, असा बभ्रा होईल. एक अधिकारी या नात्यानं गावांत माझं वजन आहे. असा बभ्रा झाला तर लोक मलाच नांवं ठेवतील. तिला दोष देणार नाहींत. पण भालचंद्रपंत मात्र या दोषांतून मोकळे होणं शक्य नाहीं. जें कांहीं करायचं तें त्यांनीं केलं पाहिजे—तुम्ही नव्हे—''

'' तुम्ही चुकतां आहांत—'' काका म्हणाले, '' मी त्याचा वडील भाऊ आहें. मी ह्यात असेपर्यंत कोणताही व्यवहार व्हायचा तो माझ्याच करवीं झाला पाहिजे. त्यानं आपली फिर्याद माझ्यापुढं मांडली आणि मी तिचा निकाल हा असा देतों आहें.''

सरूबाईच्या बापाचा नाइलाज झाला. बराच वेळपर्यंत त्यानें काकाशीं हुज्जत घालण्याचा प्रयत्न केला, पण काका कोणत्याही बाबतींत हार गेले नाहींत. शेवटीं त्यांनीं वेड्याच्या हॉस्पिटलचें भय दाखवून ज्यावेळीं तंबी दिली, त्यावेळीं तो मुकाट्यानें सर्व गोष्टी करायला तयार झाला.

काय करायचें तें काकांनीं लेखी लिहून दिलें आणि त्यानीं कशा रीतीनें वागायचें हेंहीं त्यांच्याकडून लिहून घेतलें. यापुढें एकमेकांचा एकमेकांशीं संबंध पोटगीपलीकडे राहिला नाहीं.

दुसरे दिवशीं सरुबाईला घेऊन तिचा बाप निघून गेला. जाताना तिनें बराच आकांत केला, आदळआपट केली, डोकें फोडून घेऊं लागली, त्यावेळीं तिचा बाप घाबरला.

तिचा हा धुडगुस त्यानें पाहिला नव्हता. प्रत्यक्ष पाहिला त्यावेळीं त्याची खात्री झाली. काकांची तंबी अस्थानीं नाहीं, असें ज्यावेळीं त्याला वाटलें त्यावेळीं त्यानें कशीबशी तिची समजूत घातली आणि तिथून प्रस्थान केलें.

आम्हां सर्वांचा जीव खालीं पडला. आयुष्यांतील एका जोखमीची धोंड गेली, असें चंदूला वाटलें. काका होते म्हणूनच बिनबोभाट हा सर्व ठराव करतां आला. नाहीं-तर स्वतः चंदूच्या हातून कांहींच झालें नसतें, असें माझ्याप्रमाणेंच सर्वत्रांना वाटलें.

त्यानंतर चंदू तिथें एकप्रकारें एकांतवासांत रहात होता. येतांना त्यानें बरीचशीं पुस्तकें आणलीं होतीं. तीं वाचण्यांत तो गर्क झाला होता. पुस्तकें अभ्यासाचीं नव्हतीं. त्या नुसत्या कादंबऱ्या होत्या. त्याही अगदीं साध्या दर्जाच्या होत्या. वाङ्मयाच्या दृष्टीनें यत्किंचित्‌ही महत्त्व नसलेलीं अशीं पुस्तकें वाचण्याइतकी त्याची मनःस्थिती बिघडलेली पाहून मला फार वाईट वाटलें.

तो कुणाशींच बोलत नसे म्हणून मीही मुद्दाम होऊन त्याच्याशीं बोलण्याचें टाळीत असें. ताईनें एक दोन वेळां बोलण्याचा प्रयत्न केला पण त्यानें अगदीं तुसडेपणानें उत्तरें दिलीं, असें पाहून तीही स्वस्थ राहिली. बोललाच तर तो काकांशींच बोलत असे आणि त्याही कायद्याच्या गोष्टी.

माझी पुराणवजा व्याख्यानें सुरू होतींच. पुन्हां पूर्वीचा प्रसंग आला. माझ्या माहेरच्या गावांतून मला आमंत्रण आलें.

पुन्हा मला संकट पडलें. आपल्या गांवीं जायचें आणि आपल्या घरीं आतांसुद्धां उतरायचें नाहीं, हें लोकदृष्ट्या कसें दिसेल ?

काका म्हणाले, " त्याची काळजी तुला नको. पूर्वीप्रमाणें तूं गोपाळभटजींकडेसच उतर. तिथं काय व्हायचं असेल तें होईल. पण गांवचं आमंत्रण नाकारणं केव्हांहीं बरं होणार नाहीं. तूं विलायतेला जाऊन आलीस, त्यामुळं तुझ्यांत काय फरक झाला आहे, हें जाणण्याची सर्वांना जिज्ञासा झाली आहे. पूर्वीं त्यांनीं तुझी पुराणं ऐकलीं आहेत आणि आतां विलायतेहून आल्यावर तीं कशी होतात हें त्यांना पहायचं आहे, एवढंच ध्यानांत ठेव म्हणजे झालं. "

गांवीं जाणें माझ्या जिवावर आलें होतें. पूर्वीप्रमाणें आतां मी पोरसवदा नव्हतें. विद्वत्तेचा विलायती शिक्का माझ्यावर बसला होता. दुसरें मनांत असें येई, कीं गोपाळभटजींच्या घरीं तरी कसें जावें ? मी कांहीं प्रायःश्चित्त घेतलें नव्हतें. माझ्यामुळें उगीच त्यांना तरी त्रास कां ?

दुसऱ्या दिवशीं गोपाळभटजीच स्वतः आले. मी येईन कीं न येईन, याची गांवच्या लोकांना शंका उत्पन्न झाल्यामुळें त्यांनीं भटजींना मुद्दाम पाठविलें होतें.

मी माझ्या अडचणी त्यांना सांगितल्या. त्यावेळीं त्यांनाही विचार पडला असें मला दिसून आलें.

मी म्हटलें, "कुठं तरी धर्मशाळेंत उतरणं मला बरं वाटणार नाहीं. किती झालं तरी गांव माझं आहे. माझ्या गांवांत मी चव्हाट्यावर रहावं, हें कांहीं योग्य दिसायचं नाहीं. तुमच्या घरीं मी आलें तर बाहेर चौसोपींत राहीन. लीलाही माझ्याबरोबर येणार आहे–पण मला वाटतें तिला घरांत रहायला कांहीं प्रत्यवाय होणार नाहीं. त्याबद्दल तुम्हांला मुळींसुद्धां वाईट वाटायला नको. मी आपण होऊनच हा नियम घालतें आहें, हें ध्यानांत राहूं द्या म्हणजे झालं."

माझी योजना गोपाळभटजींना पसंत पडली आणि दुसऱ्या दिवशीं आम्ही आमच्या गांवीं जायला निघालों.

त्या वेळीं बनी सासरीं गेली होती. तिची भेट झाली नाहीं याचें मला वाईट वाटलें. मला आणखी तीन भावंडें झालीं आहेत अशी बातमी कळली–पण मागल्या खेपेप्रमाणें माझ्या मातोश्री मला दर्शन द्यायला गोपाळभटजींच्या घरीं आल्या नाहींत.

बाबांना सर्वत्रांनीं आग्रह केला पण त्यांनी साफ नकार दिला. कांहीं झालें तरी ते माझे वडील आहेत, हें मला विसरतां येईना. मी त्यांना एक काकुळतीचें पत्र लिहिलें आणि नुसतें एक क्षणभर येऊन जाण्याविषयीं विनंति केली. तेवढ्यांतच मी एकदां त्यांना पाहून घेईन असें मला वाटलें होतें.

त्यांनीं माझ्या पत्राचें उत्तर पाठविलें नाहीं. 'कांहीं उत्तर नाहीं' असें चिठ्ठी नेणाऱ्याला त्यांनीं सांगितलें.

माझ्या माहेरीं जाऊन माझ्या वडिलांचा संसार पाहून येण्याची उकळी लीलेला आली होती पण मी तिला प्रत्यवाय केला. मीच तिला मुद्दाम पाठविलें, असें वाटण्याचा संभव होता.

त्या दिवशीं संध्याकाळीं माझें पुराण झालें. श्रोतृसमुदाय किती तरी जमला होता. भाषण चालू असतां माझी नजर सर्वत्र होती. बाबा कुठून ना कुठून तरी येतील, असें उगीचच मला वाटत होतें. किंबहुना मी माझ्या इच्छाशक्तीनें त्यांना खेंचून यायला भाग पाडीत होतें, असें म्हटलें तरी चालेल.

श्रोत्यांच्या मुद्रेवरून त्यांना माझें भाषण आवडत होतें असें दिसून आलें. इतर ठिकाणीं मी प्रवचनें केलीं खरी, पण या ठिकाणीं मला त्याबद्दल विशेष वाटत होतें. प्रत्येक शब्द मी अगदीं तोलून मापून बोलत होतें. कुणाचें मन दुखवायचें नाहीं, असा मी निर्धार केला होता.

पण मला अप्रिय गोष्टी बोलायच्या होत्या. कुणाचेंही मन न दुखवितां बहुजन-समाजाला न पटणाऱ्या गोष्टी बोलणें मोठें बिकट होतें–पण त्या दिव्यांतून मी पार पडतें आहें, अशी माझी मनोदेवता मला सांगत होती.

माझे डोळे प्रत्येक चेहरा न्याहाळीत होते. चटकन माझी नजर गेली आणि गर्दीच्या एका भागांत असलेल्या बाबांना मी ओळखलें.

मी व्यासपीठावर बसून बोलत होतें. बोलत असतां मी विषयाचा ओघ अशा-प्रकारें आणला कीं मी उठून उभें राहिल्यास श्रोत्यांना गैर वाटूं नये. भाषणाच्या अनुरोधानें श्रोत्यांना मी हळूहळू सवाल टाकूं लागलें. कित्येकजण उत्तरें देऊं लागले.

प्रश्नोत्तरें सुरू झालीं. प्रश्न करीत, उत्तर देत, मी एकाद्या हरदासाप्रमाणें पुढें पुढें जाऊं लागलें. बाबांच्या हालचालीवर माझी नजर होती.

मी बोलतां बोलतां संधी साधली आणि चटकन बाबा होते त्या जागीं घुसून त्यांच्या पायावर मस्तक ठेवलें.

त्यांना एकदम भडभडून आलें. ' मथू ! मथू ! ' म्हणून मोठमोठ्यानें ओरडत त्यांनीं माझ्या पाठीवरून हात फिरविण्यास सुरवात केली.

श्रोत्यांची गर्दी बाजूला झाली. बबांनीं मला उठवून वर उभें केलें आणि म्हटलें, " पोरी ! मला क्षमा कर. मी चुकलों. मी असं करायला नको होतं. माझ्या भेटीसाठीं तुझा जीव तुटत असतां मी भेटायचं नाकारलं, त्याचं मला वाईट वाटत होतं. पण खोट्या अभिमानाला मी बळी पडलों होतों. आज तुझं प्रवचन ऐकलं–माझ्या जिवाचं समाधान झालं. माझी मुलगी एवढी असामान्य विद्वान निपजली हें पाह्यलं–पण पाहायला जी असावी ती नाहीं–" त्यांना भडभडून आलें आणि ते स्फुंदस्फुंदून रडूं लागले.

श्रोत्यांतून देखील हुंदके ऐकूं येत होते. सर्वांचे डोळे डबडबले होते. माझा शब्द बाहेर फुटत नव्हता. बोलावें असें वाटे–पण जीभ लुळी पडत होती.

बाबा म्हणाले, " आज माझ्या कुरुव्याचं सार्थक झालं. मी तुझी विद्वत्ता ऐकली. काशीपर्यंत मी फिरून आलों आहें—तिथल्या पंडितांचे वादविवादही मी ऐकले आहेत पण अप्रिय असणाऱ्या गोष्टी आज तूं ज्या अधिकारवाणीनें आम्हांला ऐकवल्यास तें सामर्थ्य त्या शास्त्रीपंडितांत नाहीं. विलायतच्या लोकांना तूं थक्क करून सोडलंस, असं मी ऐकलं होतं. मला त्या गोष्टी तितक्याशा खऱ्या वाटत नव्हत्या—पण आज प्रत्यक्ष माझी खात्री झाली. समाधान वाटलं तें हेंच, कीं अशी विद्वान—अशी तेजस्वी अशी करारी—बाणेदार मुलगी—माझी मुलगी आहे ! ईश्वर तुझं कल्याण करो."

त्यांनीं माझ्या मस्तकावर हात ठेवला. माझ्या अंगावर आनंदानें रोमांच उभे राहिले.

तो प्रसंग अपूर्व होता. जसा मला अपूर्व होता तसाच सर्व प्रेक्षकांनाही अपूर्व होता. प्रवचन अर्धेंच राहिल्याचें कुणाला कांहींच वाटलें नाहीं. बाबानीं हात धरून मला पुन्हां आणून व्यासपीठावर बसविलें आणि आपण जवळ बसले.

पुन्हां प्रवचन सुरू करण्याचा मी प्रयत्न केला पण माझ्या तोंडांतून शब्द निघेना. सर्वत्रांनीं 'आतां पुरे पुरे' म्हणून ओरडून सांगितलें, तेव्हां मीही पोथीला नमस्कार करून सर्वांना साष्टांग नमस्कार घातला.

श्रोते निघून गेले आणि आम्ही घरचीं माणसें तेवढींच त्या जागीं राहिलों. मला मोठी पंचाईत पडली. आतां कुठें जावें ? बाबानीं मला क्षमा केली होती तेव्हां आतां घरीं जाणें अवश्य होतें. गोपाळभटजीही तोच उद्देश मनांत आणून माझ्या तोंडाकडे पहात होते.

मी बाबांना म्हटलें, " मी घरीं येऊं का ? "

बाबा म्हणाले, " नको ! तें घर नको ! तें स्मशान आहे. गृहिणी आहे, मुलं आहेत, घरांत देवधर्म आहे—पण तें आतां स्मशान झालं आहे. तिथं समाधानाचा शब्द नाहीं. सुखाचा निश्वाससुद्धां आतां ऐकूं यायचा नाहीं. अशा जागीं कशाला येतेस ? मीच रात्रीं गोपाळभटजींकडे येईन म्हणजे झालं. " असें म्हणून झटूकन् तोंड फिरवून ते निघून गेले.

माझा आनंद गगनांत मावेना. मी गोपाळभटजींच्या घरीं आलें. मी दाराशीं येतांच भटजींच्या पायावर मस्तक ठेवलें. त्यांनीं तोंड भरून मला आशीर्वाद दिला.

मी म्हटलें, " गोपाळभटजी, तुमच्या ऋणाची उतराई कशी होऊं? तुमच्या कृपेनं आज माझे बाबा मला परत मिळाले. त्यांनीं मला आशीर्वाद दिला. आतां जगानं मला काय वाटेल तें म्हटलं तरी त्याची मी पर्वा करणार नाहीं. "

कबूल केल्याप्रमाणें रात्रीं बाबा आले. आम्ही सर्व मंडळी बसलों आणि गोष्टी सुरू झाल्या. बाबांचा आणि माझा वियोग सुरू झाल्यापासून त्या दिवसापर्यंतची इत्थम्भूत हकिकत मी त्यांना सांगितली.

चंदूची हकिकत ऐकत असतां ते अगदीं अस्वस्थ झाले होते. हकिकत संपतांच ते म्हणाले, " हेंच ! हेंच ! माझं अगदीं असंच झालं आहे. चंदूच्या जागीं मी आहें असं समज म्हणजे झालं. कुठली मला दुर्बुद्धि झाली आणि मी पुन्हां लग्नाच्या भानगडींत पडलों ! काय करायचा आहे मुलगा? तुझ्यासारखी एक मुलगी निपजली तर बेचाळीस पिढ्यांचा उद्धार होईल. अशी रत्नासारखी मुलगी दूर टाकून मी दुराग्रहानं आजपर्यंत तुझ्या सहवासाला अंतरलों. आज तें सारं झुगारून दिलं आहे. तूं मुंबईला गेलीस म्हणजे मी तुझ्याकडे रहायला येईन. तूंच माझा मुलगा ! असा कर्तासवरता मुलगा असतांना अज्ञ असलेलीं टीचभर पोरं मोठीं होऊन पुढं माझं दैन्य दूर करणार—ही अशी खोटी आशा कशाला उराशीं कवटाळूं? प्रायःश्चित्त ! तुला कसलं आलं आहे प्रायःश्चित्त? तुला प्रायःश्चित्त देण्याचा अधिकार आहे कुणाला? संस्कृतचं व्याकरणसुद्धां ज्यांना कळत नाहीं त्यांनीं वेदाचीं अक्षरं तोंडानं विटाळून तुला प्रायःश्चित्त द्यायचं? तूं विलायतेस गेलीस त्यावेळीं मला मोठी भीति पडली होती. तूं बाटून ख्रिश्चन झालीस, असं कुणी कुणी मला सांगत होते. मला तें खरं वाटत होतं. तुझी विलायतेला चाललेली वाहवा मी वर्तमानपत्रांतून वाचित होतों. पण या माझ्या समजामुळं मला त्याबद्दल अभिमान वाटायच्याऐवजीं दुःखच होत होतं—" पण तो पुढला आत्मस्तुतीचा भाग माझ्या लेखणींतून उतरणार नाहीं. जगाला ती हकिगत माहित आहे. स्वतःची स्तुति स्वतःच्या हातानं लिहून कशाला उगीच लेखणी दूषित करूं.

दुसऱ्या दिवशीं आम्ही पुन्हां काकांच्या गांवीं गेलों. मी आनंदानें वेडी झालें होतें. ती हकीगत मला सांगतां सुद्धां येईना-तेव्हां लीला माझ्या सहाय्याला धांवून आली आणि तिनें सर्व हकीगत काकांना संगतवार सांगितली.

ती हकीगत ऐकत असतां चंदू ढळढळ रडत होता. त्याच्या बाबतींतले माझ्या बाबांचे उद्गार ज्यावेळीं त्यानें ऐकले त्यावेळीं तर त्याला भडभडून आलें.

मला वाटलें, आतां दिवस बदलत चालले. दुःखाचा काळ गेला.

मी ताईला म्हटलें, "स्वर्ग तो यापेक्षां आणखी काय असेल ! स्वर्ग मिळाल्या-पेक्षांही मला आज आनंद होतो आहे. या क्षणाला जर मला मरण आलं तर तें स्वर्गातलंच वाटेल."

"चूप चूप," ताई म्हणाली, "आनंदाच्या प्रसंगीं मरणाचा अमंगळ उच्चार कशाला करतेस ?"

त्या आनंदाच्या भरत्यामुळें मला सारी रात्र झोंप लागली नाहीं. मी माझ्या लहानपणापासूनचें सर्व चरित्र नजरेसमोर आणीत होतें. त्या सर्व चरित्रांत आनंदाचा एवढा मोठा प्रसंग कोणताच असल्याचें मला दिसून आलें नाहीं.

## प्रकरण विसावें ............................................ बदल

दोन दिवसांनीं मुंबईला जायचें ठरलें होतें म्हणून बाबाही तोंपर्यंत राहिले. प्रायःश्चित्त न घेतां मी घरीं वावरत होतें हें पाहूनही त्यांनीं विरोध केला नाहीं किंवा आपली नापसंतीही दाखविली नाहीं. वात्सल्याची आंच लागल्यामुळें कांहीं दिवस कठोर झालेलें त्यांचें मन आपोआप वितळूं लागलें होतें.

आम्ही सारीं एका पंक्तीला बसत असूं. पहिल्या दिवशीं बाबांचें ताट बाजूला ठेवलें होतें. काका माझ्या पंक्तीला बसले होते. त्या रात्रीं बाबांना काय वाटलें कुणाला ठाऊक-संध्या पुरी होतांच ते आपला पाट स्वतः उचलून घेऊन आमच्या पंक्तीला येऊन बसले. लीला त्यांना कांहीं विचारणार होती, पण मीं तिला खूण करून गप्प केलें.

चंदूची वृत्ति होती तशीच होती. तो आमच्याबरोबर मुंबईला येणार नव्हता. त्याचा रिझल्ट लागायला अजून अवकाश होता. रिझल्ट लागेपर्यंत मुंबईला यायचें नाहीं, असें त्यानें ठरविलें होतें. तो पास झाला तर दवाखाना कशा रीतीनें थाटतां येईल, याचा विचार काका करीत होते. त्याला लागेल तेवढी रक्कम देण्याची काकांची तयारी पाहून चंदूलाही आनंद झाला.

दोन दिवसांनीं आम्हीं मुंबईला जायला निघालें. सर्व मंडळी दाभोळ बंदरावर आली होती. ताई आली होतीच पण बाबा सुद्धां आले होते, हें विशेष आश्चर्य !! गांवच्या मंडळींतील कांहीं कांहीं ठळक ठळक माणसेंही मला भेटायला आलीं होतीं.

बंदरावर आलेल्या लोकांना तो एक समारंभ वाटला. माझी हकिकत सर्वांना आधींच माहीत झालेली असल्यामुळें त्या थाटाचें कुणाला कांहीं विशेष वाटलें नाहीं. लोकांच्या दृष्टीनें मी एक 'मोठी माणूस' झालें होतें. म्हणून मला निरोप देतांना तेवढाच मोठा समारंभ होणें त्यांच्या दृष्टीनें अवश्य होतें.

कोंकणांत बाहेर गांवचीं मोठीं माणसें फार क्वचित येतात. त्यामुळें असें कुणी एकादें माणूस आलें म्हणजे त्याचें गांवकरी लोकांना चोज वाटतें. बंदरावरील प्रत्येक जण म्हणूनच माझ्याकडे बोट दाखवून आपल्या बरोबरच्या माणसाशीं कुजबुजत होता.

एका गृहस्थाचे उद्गार तर मला स्पष्ट ऐकूं आले. तो म्हणाला, "ती पाहिलीस शास्त्रीबुवांची मथू ? विलायतेला जाऊन पंडिता होऊन आली आहे. तिकडे तिनं ज्या परिक्षा दिल्या त्या अजून कुणी पुरुषांनींदेखील दिलेल्या नाहींत. तरी पहा, तिनं विलायती चोचले उचलले नाहींत. सारं कांहीं जुन्या थाटाचं वळण आहे. हीच कुणी पुण्यामुंबईकडची असती तर लुगडं टाकून झगा घालून आली असती—पण आपल्या कोंकणचं पाणी हें असं आहे. मूळ कधीं सोडायचं नाहीं—"

त्याचें चर्हाट चाललेंच होतें पण त्याच्या अभिमानामधील मध्यवर्ति कल्पना—त्याचा कोंकणचा अभिमान—पाहून मला कौतुक वाटलें. माझा मलाच प्रश्न पडला. कोंकणच्या वळणामुळेंच मी अशी राहिलें का ? मुळचें हें वळण नसतें तर माझ्यांत फरक झाला असता का ? इतर ठिकाणच्या अशा कुणी बायका विलायतेला जाऊन परत आल्यावर त्यांनीं आपल्या वेषभूषेंत फरक केला आहे काय, याची चौकशी करायचें मी ठरविलें.

मुद्दाम होऊन दुराग्रहानें किंवा अभिमानानें मी माझा मुळचा वेष कायम ठेवला होता असें नाहीं. जो वेष होता त्याच्यांत बदल करावा असें मला वाटलें नाहीं, एवढेंच. विलायतेंत असतांना केलेले पोषाखाचे थोडेफार फेरफार मुंबईला आल्यावर आपोआपच बदलले गेले होते. मुंबईच्या हवेंत बूट स्टॉकिंग्जची जरूरी मला केव्हांच भासली नाहीं. विलायतेंत थंडीच्या निवारणासाठीं मी डोक्यावरून पदर घेत असें,

वर ओव्हर कोटही घालीत असें; पण इकडे आल्यावर थंडीच नसल्यामुळें ओव्हर-कोट फेंकून द्यावा लागला आणि पर्यायानें पदर डोक्यावरून घेण्याची जरूरीही राहिली नाहीं.

विलायतेंत गेलेल्या महाराष्ट्रीय स्त्रिया त्यावेळीं बहुधा कुणी नव्हत्याच. एक आनंदीबाई जोशींचें उदाहरण होतें. पण विलायतेहून आल्यावर त्या फार दिवस जगल्या नाहींत त्यामुळें त्यांची माहितीही लोकांना फारशी झालेली नाहीं. त्यांचें एक चरित्र लिहिलें गेलें नसतें तर त्यांचें नांवसुद्धां कुणाच्या आठवणींत राहिलें नसतें. दुसरी पंडिता रमाबाई होती पण ख्रिस्ती झाल्यामुळें तिच्याकडे पाहण्याची लोकांची नजर बदलली होती.

या गृहस्थांनीं विलायतेंतून आल्यावर पोषाख बदलणारांचा जो उल्लेख केला, तो पुरुषांना उद्देशून असावा असें मला वाटलें. विलायतेला जाऊन आलेले पुरुष त्यावेळीं कांहीं कांहीं होते. त्यांनीं आपल्या पोषाखांत अशाप्रकारें बदल केला होता. म्हणूनच मी विलायतेला गेलेली असल्यामुळें माझ्याही पोषाखांत बदल व्हावा अशी सामान्य लोकांची जी अपेक्षा होती ती खोटी ठरल्यामुळें या गृहस्थानीं माझें एवढें कौतुक केलें असावें, असें मला वाटलें.

आम्हां दोघांना सर्वांनींच प्रेमानें निरोप दिला. आम्ही बोटीवर चढल्यावर दृष्टीआड होणाऱ्या बंदराकडे लीला सारखी पहात राहिली होती. ती पहिल्यानेंच कोंकणांत आली होती. बोटीचा प्रवासही यापूर्वीं तिच्या सरावाचा नव्हता. कोंकणांत येतांना ती बहुतेक बिछान्यावर डोकें टेकून झोपीं गेली होती पण या वेळेला तिचा धीर चेपला आणि ती बोट सुरू झाल्यावरही उभी राहून पाहूं लागली.

बोट फारशी लहान नव्हती. मी बिछान्यावर बसून राहिलें होतें. लीला मला म्हणाली, " बसलीस काय काकू ? अशी इकडे येऊन उभी रहा ना ? समुद्राच्या लाटेची काय गंमत दिसते आहे ! "

मी म्हटलें, " तें सारं आतां माझ्या अगदीं ओळखीचं झालं आहे. तूं पहिल्यानेंच पाहते आहेस म्हणून तुला त्याचं विशेष वाटतं आहे. आणखी चार दोन खेपा झाल्या म्हणजे त्याचं कांहींच वाटणार नाहीं. "

लीला म्हणाली, " कुणी सांगावं, पुन्हां माझं इथं येणं होईल कीं नाहीं तें ? "

"असं कां म्हणतेस?" मी म्हटलें, "आतां तूं माझ्याकडेसच रहा. तूं मला सोडून जाणार नाहींस—मी तुला जाऊं देणार नाहीं—हें जर ठरलंच आहे तर मी ज्या ज्यावेळीं येणार त्या त्यावेळीं तुलाही कोंकणांत आलंच पाहिजे कीं नाहीं?"

ती कठड्याकडून उठून येऊन माझ्याकडे बसली आणि म्हणाली, "खरंच काकू, मी अगदीं तुझ्याकडे राहूं ना? केव्हांही मला परत पुण्याला पाठवणार नाहींस ना?"

ती अगदीं काकुळत्या वाणीनें बोलत होती.

मी म्हटलें, "नाहीं बरं! केव्हांहीं नाहीं. या थोड्या दिवसांत मला दोन लाभ झाले. पहिली तूं लाभलीस. अपत्य स्नेह म्हणजे काय याची मला कल्पना नव्हती. त्या दिवशीं—आठवतं ना तुला?—त्या दिवशीं मला वाटलं, मला एक मुलगी लाभली. त्या वेळीं त्याचं विशेष वाटलं होतं—पण तें कां वाटत होतं तें समजलं नव्हतं. परवां बाबांची पुन्हां भेट झाली त्यावेळीं तें कोडं उलगडलं. वात्सल्य म्हणजे कांहीं और आहे, यांत शंका नाहीं. बाबांचा स्वभाव किती निग्रही आहे, तें तुला माहीत नाहीं. इतकीं वर्षं झालीं पण त्यांनीं माझं तोंडसुद्धां पाहिलं नव्हतं. किती जणांनीं किती प्रयत्न केला पण त्यांनीं आपला हट्ट सोडला नाहीं. अपत्य असावं म्हणून त्यांनीं पुन्हां लग्न केलं, मुलंही झालीं; पण तूंच ऐकलंस ना? त्या बायकोचं किंवा मुलांचं कसलंच सुख त्यांना लाभलं नाहीं. आशेनं त्यांनीं पुन्हां संसार थाटला होता पण ती आशा सफळ झाली नाहीं. त्यांचं वार्धक्य होत आलं आहे. या मावळत्या वयांत कुठंतरी आधाराला जागा असावी असं माणसाला वाटूं लागतं. मुलं झालीं आहेत पण तीं लहान आहेत. त्यांचा आसरा मिळणं अशक्य. अपत्त्याच्या आसऱ्यासाठीं तळमळणारा जीव फारा दिवसांनीं मला पाहतांच पुन्हा जागा झाला. तें माझ्या बाळपणांत असलेलें माझ्यावरचं त्यांचं प्रेम पुन्हां तरूण झालं. त्यांनींच मला घडवलं होतं. आज जर माझी कांहीं तारीफ होत असेल तर त्याचं पहिलं श्रेय सर्वस्वी त्यांना आहे. लहानपणापासून उपनिषदं, पुराणं जर त्यांनीं मला पढवलीं नसतीं तर माझ्या पुढल्या आयुष्यांत जी क्रांती झाली ती कधींच झाली नसती. त्या पुराण्या वाङ्मयाच्या अभ्यासाला काकांनीं नवीन वळण दिलं. नवीन दृष्टीनं पाहायला शिकवलं. पण मुळांतच जर बाबांनीं मला कांहीं शिकवलं नसतं तर काका तरी काय करणार होते? मी तर ही अशी जाचणुकींत पडलें होतें. मूळ स्वभावही तितकाच हटवादी—म्हणजे निग्रही. पहिल्यापासून बाबांचं हें शिक्षण मिळालं नसतं तर मी एक दुसरी सरुबाईच

बनलें असतें, असं सिंहावलोकन केलं असतां आज मला वाटूं लागतं. बाबांना आपली मुलगी या नात्यानं जितका माझा जिव्हाळा वाटला, त्यापेक्षां आपली 'शिष्या' या नात्यानं जास्त वाटला. इतक्या वर्षांच्या वियोगानंतर भेट होतांच हें दोन प्रकारचं वात्सल्य एकदम दुणावून फोफावलं. म्हणूनच त्या कर्मठ ब्राह्मणानं त्या दृष्टीनं वाटणारे माझे सर्व गुन्हे पोटांत घातले. कुंकवाचं नांव घेतलं नाहीं, कीं प्रायःश्चिताचंही नांव घेतलं नाहीं. वात्सल्य तें हेंच. तो त्यांचा पूर्वीचा निग्रह आज कां भंगला–कां पडला ? तुला माहीत आहे ? ''

लिला म्हणाली, '' मला थोडीशी कल्पना येते आहे. वृद्धापकाळीं अपत्याचा आश्रय पाहिजे, असं जें तूं म्हटलंस तसंच त्यांना वाटलं असावं–निराधारपणानं वाटलं असावं. ''

'' अगदीं बरोबर '' मी म्हटलें, '' तसंच मला वाटतं आहे. मी जरी वृद्ध झालें नाहीं तरी मला वार्धक्य पुढं दिसतं आहे. त्या अपेक्षित वार्धक्यामुळें माझी स्थिती बाबांसारखी झाली आहे. परवां सरूबाई आली आणि तिनं जो धिंगाणा घातला, त्यावेळीं तूं होतीस म्हणूनच त्या प्रसंगांतून मी निभावलें. त्याचवेळीं मला वात्सल्याची पहिली जाणीव उत्पन्न झाली. आईचं मन काय असतं, हें त्याच वेळीं मला कळलं. अपत्याच्या नजरेनें मी तुझ्याकडे पाहूं लागलें. जाऊं दे–यावेळीं कशाला त्या गोष्टी ? सर्व कांहीं स्थिरस्थावर झालं आहे. आतां पुढं कसला कांहीं त्रास न झाला म्हणजे भाग्य म्हणायचं. ''

बोट जसजशी समुद्रांत शिरूं लागली तसतशी जास्त हलूं लागल्यामुळें लीला पांघरूण घेऊन बिछान्यावर पडली. मीही बिछान्यावर पडलें.

लीलेशीं याचवेळीं माझें जें भाषण झालें त्याच्यावर माझा सारखा विचार चालला होता. मनुष्याच्या आयुष्यांत प्रेमाच्या सहवासाची अपेक्षा असते. लग्न हें त्यासाठींच असावें, अशी मला कल्पना आली. वैषयिक भावना काय असतील त्या असोत–त्यांची मला कल्पनासुद्धां नव्हती–पण प्रेमळ अन्तःकरणाच्या सहवासाची संसारी मनुष्याला अत्यंत आवश्यकता आहे, त्या वांचून संसारांतील सुखदुःखाचा अनुभव पडताळतां येत नाहीं, असंच विचारांतीं मला वाटूं लागलें. रेव्हरंड टिळकांची ती कविता आठवली—'' मज माता भगिनी किंवा भार्या देई—''

त्या कवितेचा विचकट अर्थ करून एका टीकाकारानें त्यांच्यावर केलेली टीका वाचल्याचेंही मला आठवलें. मला वाटलें तो टीकाकार भरगच्च माणसानीं भरलेल्या कुटुंबांतला असावा. माझ्यासारखा एकाकी असता तर तशी अनुदार टीका त्याच्या लेखणींतून उतरली नसती.

बाबांना मुलाची जरूरी वाटत होती. मुलगी म्हणजे परावी—दुसऱ्याच्या घरीं जाणारी—परक्याचें धन—अशी पारमार्थिक कल्पना असल्यामुळें वार्ध-क्याच्या कालांत पुत्राची अपेक्षा त्यांना अत्यंतिक वाटली होती. पुरुष अपत्यांत आणि स्त्री अपत्यांत कांहीं विशिष्ट परिस्थितींत भेद राहूं शकत नाहीं, अशी कल्पना करण्याला त्यांना जागाच नव्हती. पण आज सर्वत्र नांवलौकिक मिळविलेली, एकाद्या मामलेदाराइतका पगार मिळविणारी अशी मुलगी, आपलें अपत्य म्हणून विद्य-मान आहे, असें जेव्हां त्यांना दिसून आलें, त्यावेळीं त्यांचा तो पुत्रमोह नाहींसा झाला. पुत्र आणि पुत्री यांच्यांतील भेद परिस्थितीमुळें आपोआप मावळला. कर्तबगार, द्रव्यार्जन करणारा, नांवलौकिक वाढविणारा—म्हणूनच पुत्र हवा, असें मनुष्याला वाटत असतें. पण इष्ट त्या सर्व गरजा भागविणारी स्वतंत्र परिस्थितीची जर मुलगी असली, तर त्या बापाला पुत्राची आवश्यकता भासण्याचें कारण राहणार नाहीं.

तसेंच बाबांना वाटलें असावें आणि म्हणूनच त्यांनीं मुंबईला माझ्याकडे येऊन राहण्याची कबूली दिली.

आम्ही मुंबईला आलों आणि पुन्हां नित्याचा व्यवसाय सुरू झाला.

चंदूच्या परिक्षेचा रिझल्ट लागला आणि आश्चर्यातलें आश्चर्य हें, कीं तो पास झाला. त्याच्या बुद्धिमत्तेची कसोटी त्यामुळेंच कळून आली. डॉक्टरची परिक्षा म्हणजे कांहीं इतर परिक्षांसारखी नव्हे. शेवटच्या वर्षी कां होईना—पण तो अभ्यास त्यानें सोडून दिला होता. मधेंच अगदीं भिन्न प्रकारचा म्हणजे वकिलीचा व्यवसाय त्यानें चालविला होता. तो व्यवसाय मधेंच सोडून अगदीं थोडे दिवस त्यानें पूर्वीच्या अभ्यासाची उजळणी केली. त्या थोडक्याशा उजळणीनें त्यानें हें यश मिळविलेलें पाहून मलाही फार आश्चर्य वाटलें.

रिझल्ट लागल्यानंतर तीन चार दिवसांनीं चंदू कोंकणांतून मुंबईला आला. आतां भेटण्याची कांहीं चोरी नव्हती म्हणून तो आला तो माझ्याच बिऱ्हाडीं उतरला.

दवाखाना उघडायची सर्व व्यवस्था काकांनीं केली होती पण इतक्यांतच दवाखाना उघडावा अशी चंदूची इच्छा नव्हती. वर्ष सहा महिने दुसऱ्या कुठल्या तरी डॉक्टरजवळ काम करावें आणि नंतर स्वतःचा दवाखाना काढावा, असें त्यानें ठरविलें होतें.

त्याच्याच बरोबर असलेल्या—पण पूर्वींच पास होऊन प्रॅक्टिस करीत असलेल्या त्याच्या एका मित्राच्या दवाखान्यांत त्यानें काम करायचें ठरविलें. डायमंड लॉज-मधें ज्या वेळीं पूर्वी मी एकदां गेलें होतें त्या वेळीं मला प्रश्न विचारण्यांत पुढारी असणारा जो विद्यार्थी तोच हा डॉक्टर होता.

डॉ. मनोहरच्या दवाखान्यांत काम करण्यास सुरवात केल्यापासून चंदू सरदार-गृहांत राहूं लागला. मधून मधून तो मला भेटायला येत असे पण त्याच्या वृत्तींत जो एकदां फरक झाला तो तसाच कायम राहिला. उल्हासाची कळा त्याच्या चेहऱ्यावरून कायमची नाहींशी झाली. लीला त्यावेळीं कॉलेजांत जाऊं लागली होती. तिच्या अभ्यासाच्या बाबतींत मी स्वतः लक्ष पुरवीत असल्यामुळें तिची कॉलेजांतील प्रगतीही फार समाधानकारक होत होती. नाणावलेल्या पुरुष विद्यार्थ्यांतूनही तिनें आघाडी मारली होती. तिला केवळ अभ्यासाचाच ध्यास लागला होता. त्यावांचून तिला दुसरें कांहीं सूचत नसे.

पण मला तें बरें वाटलें नाहीं. अभ्यासाव्यतिरिक्त इतर विषयांत तिनें मन घातलें पाहिजे, असा माझा आग्रह होता. मी तो जुना उपाय सुरू केला आणि वेद आणि उपनिषदें तिच्याकडून वाचून घेऊं लागलें. मॅक्समुल्लर, डायसन यांचे ग्रंथ मुद्दाम आणून मी तिला वाचायला दिले, त्याचबरोबर आधुनिक लेखकांचे ग्रंथही मी तिच्याकडून वाचून घेत होतें. ज्याला ललित वाङ्मय म्हणतात त्या वाङ्मया-कडेही विद्यार्थ्यांनीं दुर्लक्ष करूं नये असें माझ्या विलायतेंतल्या अनुभवावरून मला पटलें होतें. म्हणूनच कॉलेजांत शक्य नसलेला आधुनिक ललित वाङ्मयाचा अभ्यास मी तिच्याकडून घरीं करवून घेत होतें.

आमचा सर्व काल अशा प्रकारें विद्याव्यासंगांत जात होता. दिवसेंदिवस लीलेला जडलेला माझा लळा भयंकर वाढत जात होता. मलाही तिच्याशिवाय करमेनासें होत असे.

हा योगायोग खरोखरच मोठा चमत्कारिक होता. ज्या गृहस्थानें पहिल्या दिवसापासून माझा छळ करण्याव्यतिरिक्त दुसरी कल्पनासुद्धां मनांत आणली नाहीं, त्याच गृहस्थाची मुलगी माझ्या सुखासाठीं प्रत्यहीं जीव सांडते आहे–ही परिस्थिती खरोखरच मोठी विचार करण्याजोगी होती. नानासाहेबांनीं जो माझा छळ केला त्या छळामुळें लीलेचें माझ्याठायीं प्रेम उत्पन्न झालें. मत्सरांतून–द्वेषांतून–प्रेमाचा उद्रेक झाला. मनोभावनेच्या परिशीलनाचें हें एक विचार करण्याजोगें समीकरण होतें.

आम्ही दोघीही एकमेकींत इतक्या गुरफटल्या गेलों होतों, कीं दोघींच्या जीवनांत यत्किंचितही भेद राहिला नव्हता. एकीचें सुख तेंच दुसरीचें सुख. एकीचें दुःख तेंच दुसरीचें दुःख. रक्ताचें नातें नाहीं. मग हा जिव्हाळा उत्पन्न झाला कुठून ?

मागें पाहूं लागलें तर तेंच दिसून आलें. प्रत्यक्ष बाप–त्यानें माझी उपेक्षा केली आणि जिनें माझा द्वेष करावा ती माझी सावत्र मुलगी माझ्या आईची जागा भरून काढण्यास कारणीभूत झाली. माझ्या जीवनांतले आयुष्यांतील घटनेचे हे परस्परविरुद्ध भासले पाहून माझें मलाच आश्चर्य वाटत असे.

एके दिवशीं एक विलक्षण प्रकार घडून आला. पुन्हां नानासाहेब आमच्या घरीं आले. आमचा पत्ता त्यांना कसा मिळाला याचें मला आश्चर्य वाटलें. सदोदित ते आमच्या हालचालीवर बारकाईनें लक्ष ठेवीत असावेत अशी त्यामुळें आमची खात्री झाली.

लीलेच्या लग्नाच्या गोष्टी काढण्यासाठीं ते पुन्हा आले होते. यावेळीं त्यांनीं तें पूर्वीचें उग्र स्वरूप आणलें नाहीं. लीलेसाठीं त्यांनीं यावेळी जो मुलगा पाहिला होता तो एक डॉक्टर होता. मागाहून कळलें, कीं तो चंदूच्या माहितीचा होता. नांव ठेवण्याजोगी कुठेंच जागा नव्हती. त्यांनीं मला अगदीं मोकळेपणानें त्या मुलाबद्दल वाटेल ती चौकशी करायला सांगितलें.

ते म्हणाले "या वेळीं मी इतका काटेकोर राहिलों आहें, कीं शोधूनसुद्धां तुम्हाला सांपडणार नाहीं इतका तो मुलगा शंभर नंबरी उत्तम आहे. लीलेला त्यानं लहानपणापासून पाहिलं आहे. कदाचित् तो तिच्या माहितीचा नसेल. ती इथं शिकते आहे, तुमच्यासारख्या विदुषीच्या सहवासांत आहे, म्हणूनच तो तिला पसंत करायला तयार झाला आहे. अशी संधी शोधून सांपडायची नाहीं. म्हणून मी मुद्दाम सांगायला आलों आहें. एकदां वेळच्या वेळीं गोष्टी झाल्या म्हणजे त्या

ब-या. केव्हां झालं तरी मुलीचं लग्न हें झालंच पाहिजे. मग हाताजवळ उत्तम स्थळ असतां तें घालवून पुढं चांगलं स्थळ मिळेल—तिनं मोठमोठ्या परिक्षा दिल्या म्हणजे यापेक्षां चांगलं स्थळ मिळेल—अशी अपेक्षा करीत बसणं मला तरी योग्य वाटत नाहीं. तुम्हाला तसं वाटत असेल तर माझं कांहीं म्हणणं नाहीं. कोर्टानं मुलीला तुमच्या हवालीं केलं आहे. आतां तिच्यावर माझी सत्ता नाहीं. तिचा विचार तिनंच करावा इतकी तिची योग्यता आहे, असं मला वाटत नाहीं. पण माझी ही योजना तुम्हाला पसंत पडेल अशी माझी खात्री आहे. ”

सर्वच दिवस पालटले आहेत असें मला वाटूं लागलें. नानासाहेबांच्या वृत्तींत देखील एवढा विलक्षण फरक झालेला पाहून मला खरोखरीच धक्का बसला. हा माणूस असा कसा निवळला ? परिस्थितीच्या पेंचामुळें, कीं कायद्याच्या तडाख्यामुळें ?

मुलीच्या लग्नाविषयीं नानासाहेब अगदीं आतुर झाले होते, हें स्पष्ट दिसून येत होतें. पण खुद्द लीलेला विचारल्याशिवाय या बाबतींत आपलें मत कांहींच द्यायचें नाहीं, असें मीही ठरविलें होतें. तिला विचारायचें तेंही असें अचानक विचारणें बरें नव्हे, अशी कल्पना करून मी नानासाहेबांना दोन दिवस माझ्या घरीं राहण्याचा आग्रह केला.

आश्चर्याची गोष्ट ही, कीं त्यांनीं तें कबूल केलें. प्रायःश्चिताचा प्रश्न एकदम कसा निवळला, हें मला सांगतां येइना—पण ते माझ्या घरीं राहिल्यावेळीं पंक्तीला बसण्याच्या बाबतींत संकोच धरीत असल्याचें दिसून आलें नाहीं.

मी तार करून काकांना बोलविलें. स्वतःच्या अंगावर जबाबदारी घेण्यापेक्षां काकांनींच या प्रकरणाचा निकाल केलेला बरा, असें मी नानासाहेबांना सांगितलें आणि त्यांनाही तें पटलें.

दुस-याच दिवशीं काका येऊन पोंहोंचले.

# प्रकरण एकवीसावें ............................संसार

माझें एकदम बोलावणें आल्यामुळें काका थोडेसे घाबरले होते. सरूबाईचें प्रकरण निघालें कीं काय अशी त्यांना शंका उत्पन्न झाली होती. त्यांना नानासाहेबांची सर्व हकिकत तपशीलवार सांगितली. तेव्हां एकपरीनें जरी त्यांना समाधान वाटलें तरी दुसऱ्या दृष्टीनें ही जबाबदारी जास्त महत्त्वाची वाटली.

ते म्हणाले, " मनुष्याच्या आयुष्यांतील हा अगदीं जिवाभावाचा प्रश्न आहे. पूर्वी लग्नं होत होतीं त्या वेळची गोष्ट निराळी होती. बाहेरून बाहेरून वधुपक्ष वरपक्षाबद्दल चौकशी करीत असे आणि वरपक्ष मुलगी कशी आहे हें पहाण्यापूर्वी हुंडा किती मिळेल यावरच लक्ष देत असे. आतां दोघंही समंजस असतात, सुविद्य असतात. अशा वेळीं वडील माणसांनीं लग्नाच्या बाबतींत त्रयस्थ या नात्यानं सल्ला देण्यापेक्षां जास्त जोखमीची जबाबदारी आपल्यावर घेऊं नये, असं माझं मत आहे. मुलं प्रौढ आणि सुविद्य असलीं तरीही त्यांच्याकडून चूक होण्याचा संभव असतो. अनुभवाची उणीव असते. तो अनुभवाचा फायदा फक्त वडील माणसांनीं तरुणांना देत जावा. यापेक्षां जास्त जबाबदारी केव्हांही घेऊं नये असंच मी म्हणेन. तूं पहाते आहेस, कीं लीला ही एक समंजस मुलगी आहे. वेळीं तिचाच सल्ला माझ्या

उपयोगी पडतो, असं असतांना तिच्या लग्नाच्या बाबतींत जर आम्ही ढवळाढवळ करूं लागलों तर तें कसं योग्य होईल? खरं पाहिलं, तर नानासाहेबांनीं या बाबतींत तुला न विचारतां तिलाच विचारायला पाहिजे होतं—"

थोडा वेळ ऐकून ताई म्हणाली, " आतां त्यांनाच घेऊन आपण या गोष्टीचा खल करूं."

नानासाहेब बाहेर गेले होते ते तितक्यांत आले. काका आलेले पाहून नानासाहेब जरा बिचकलेले दिसले, तरीही त्यांनीं आपली मुद्रा बदलूं दिली नव्हती.

विषयाचा प्रस्ताव मी करून दिला त्या वेळीं नानासाहेब म्हणाले, " पूर्वीच्या बाबतींत माझ्या हातून चूक झाली होती, हें मी कबूल करतों. आतां आम्हीं प्रत्यक्ष पहातों आहोंत. आतां आमच्या केसरीचं धोरणही बदललं आहे. सामाजिक सुधारणेच्या बाबतींतदेखील केसरी आतां मागासलेला राहिला नाहीं. जें केसरीचं धोरण तें आमचं धोरण, हें अगदीं ब्रह्मवाक्य आहे. माझं देवदैवत म्हणजे काय तें एक केसरी. केसरीनं म्हटलं, असं करावं–तर आम्ही असं करतों! केसरीनं म्हटलं, तसं करावं–तर आम्ही तसं करतों. दिवस बदलले आहेत, हें आम्हांलाही कळूं लागलं आहे, म्हणून मी मुद्दाम मथू वहिनींना भेटायला आलों. पूर्वीं आमच्याकडून कांहीं चुका झाल्या असतील, आमच्याकडून त्रासही पोंचला असेल, तो विसरून जा आणि हें आपल्या घरचं पहिलं कार्य एकदाचं साजरं करून घ्या, एवढंच माझं मागणं आहे."

काका गालांतल्या गालांत हंसत माझ्याकडे एक दृष्टिक्षेप करून म्हणाले, " जुन्या गोष्टी कांहीं झाल्या असल्या तरी त्याची चर्चा यावेळीं कशाला? झालं गेलं होऊन गेलं. पुढं चांगलं झालं म्हणजे आमच्या वडीलपणाचं सार्थक झालं. त्या बाबतींत माझं स्वतःच मत असं आहे, कीं आपण वडील माणसांनीं या भानगडींत पडूं नये. पाहायचं एवढंच, कीं मुलीला जो मुलगा आपण दाखवून देतों, तो तिला योग्य आहे असं आपल्याला पटलं आहे कीं नाहीं? तेवढं झालं कीं बाकीची जबाबदारी त्या मुला–मुलीवर टाकावी—"

काका लीलेला उद्देशून म्हणाले, " लीले, ये, अशी माझ्या समोर बैस. तूं ही सर्व हकिकत ऐकलीस ना? सांग, तुझं काय म्हणणं आहे तें?"

नानासाहेब एकदम उसळून उठत होते, पण थोडेंसें आत्मसंयमन करून म्हणाले, " तिला पोरीला यांत काय विचारतां, भास्करराव?—"

" चुकतां तुम्ही नानासाहेब, " काका म्हणाले, " आतां तिलाच विचारलं पाहिजे. सध्यांचा माझा अनुभव असा आहे, कीं ज्या ज्या वेळीं आम्ही पेचांत पडलों होतों, त्या त्या वेळीं लीलेची सल्लाच आम्हांला उपयोगी पडली. चालू व्यवहाराच्या दृष्टीनं लीला माझ्यापेक्षां जास्त शहाणी आहे. जुन्या काळांत आम्ही शहाणे होतों. आम्हांला वाटत होतं, कीं आम्हीं शहाणे आहोंत—त्यावेळीं आमचीं वडील माणसं आमच्या शहाणपणाचा फायदा घेत नाहींत, असं आम्हांला वाटत होतं. त्यांचा राग येत होता. ही आठवण विसरून चालायचं नाहीं. आम्हांला आमच्या तरुणपणीं जसं वाटत होतं, तसंच आजच्या तरुणांनाही वाटणार हें आपल्या अनुभवावरून आम्हीं ध्यानीं घेतलं पाहिजे. म्हणूनच म्हणतों, कीं लीला, तुझं काय मत आहे तें सांग. "

काकांच्या त्या भाषणानें नानासाहेब—नाइलाजानें का होईना—स्तब्ध बसले. लीलाही उत्तर देण्यापूर्वी कांहीं वेळ थांबली. काकांनीं पुन्हां विचारलें तेव्हां ती म्हणाली, " सध्यां लग्न करावं असं मला वाटत नाहीं. मी इतर मुलींसारखी नुसत्या उल्लूपणानं असं म्हणत नाहीं. काकूंची परिस्थिती मी लहानपणापासून पाहतें आहें. चंदूकाकांच्या बायकोची स्थिती आज मला प्रत्यक्ष दिसून आली आहे. उघड्या डोळ्यांनीं एवढ्या गोष्टी पाहिल्यावर अविचार करावा, असं मला केव्हांही वाटायचं नाहीं. स्वतःच्या पायावर उभं रहाण्याची शक्ति आल्याशिवाय संसारांत पडायचं नाहीं, असा मी निश्चय केला आहे. "

नानासाहेब थोड्याशा रागावलेल्या आवेशांत म्हणाले, " म्हणजे तुला मुळींच लग्न करायचं नाहीं का ? "

लीला शांतपणानें म्हणाली, " असं मी कुठं म्हटलं ? मला लग्न करायचं आहे—पण तें आज नाहीं. मला माझी स्वतःची खात्री आली पाहिजे. "

नानासाहेब म्हणाले, " मग आतां जें स्थळ पाहिलं आहे त्याचं काय करायचं ? "

लीलेला हें उत्तर देणें अडचणीचें जाईल असें पाहून काका पुढें सरसावले आणि म्हणाले, " हें स्थळ जर चांगलं असेल तर त्या गृहस्थाला एकदां येऊन लीलेला पाहून जाऊं द्यावं. नुसतं पहाण्यानं देखील बऱ्याच गोष्टी होतात. स्वभावधर्म कळण्यापूर्वी नुसत्या दृष्टादृष्टीचं देखील महत्व असतं. आपणही केव्हां केव्हां कांहीं कारण नसतांना सुद्धां एकाद्या माणसाला पाहिल्याबरोबर त्याचा तिटकारा घेतों किंवा उगीच अढी धरतों. तेवढ्यासाठींच आधीं ही 'शुभदृष्टि' झाली पाहिजे. एकमेकांनीं एकमेकांना पाहूं द्या, परिचय होऊं द्या आणि लग्न करायची तयारी होईपर्यंत

तिच्यासाठीं थांबून रहावं, असं जर त्या वराला वाटलं तर आपोआपच हें लग्न होऊन जाईल."

नानासाहेब म्हणाले, "म्हणजे लग्न व्हायच्या पूर्वींच दोघांनीं एकमेकाशीं दळण-वळण ठेवावं, असं का तुमचं म्हणणं आहे?"

"काय हरकत आहे त्यांत?" काका म्हणाले, "आम्ही वडील माणसं आहोंत. ही मथू आहे. आम्हां वडील माणसांची नजर राहणारच त्यांच्यावर. मुलांवर झालं तरी आपण थोडा विश्वास टाकला पाहिजे. संशयानं संशय वाढतो, तसाच विश्वासानं विश्वास वाढतो. आपण आपल्या मुलाबाळांवर विश्वास टाकला तर, मला वाटतं, तीं केव्हांही आपला विश्वासघात करणार नाहींत. आणि विश्वासघात करण्याची प्रवृत्ति जर त्यांच्याठायीं दिसली, तर असं समजावं, कीं तो त्यांचा आनुवंशिक गुण आहे—"

काकांनीं घेतलेला चिमटा नानासाहेबांना चांगलाच लागला. ते एकदम खवळून म्हणाले, "म्हणजे मी विश्वासघातकी आहें असं का तुमचं म्हणणं?"

"केव्हांही नाहीं." काका म्हणाले, "लीला जोपर्यंत विश्वासघात करीत नाहीं तोंपर्यंत तुमच्याबद्दल कुणालाही शंका वाटायचं कारण नाहीं. आपल्या मनावरून आपण आपल्या मुलाबाळांचीं मनं ओळखलीं पाहिजेत. त्यांत चुकत असलं तर तो आपल्या शिक्षणाचा दोष आहे, असं कबूल केलं पाहिजे. मी म्हणतों, कीं माझा मुलांवर पूर्ण विश्वास आहे. तुमचा विश्वास नसेल तर विषय सोडून द्या. काय तें तिचं तिलाच पाहून घेऊं द्या. तिला पटत नसेल तर आपला तरी आग्रह कां म्हणून?"

नानासाहेब निरुत्तर झाले. उत्तर देण्यासाठीं त्यांची जीभ वळवळत होती पण काकांची तर्कपद्धति इतकी अचूक होती, कीं कांहीं तरीच उत्तर देणें त्यांना कठीण गेलें.

या वेळेला त्यांनीं सज्जनपणाचा आव आणला होता. तो आव त्यांना बेमालूमपणें पूर्ण करून दाखवायचा होता. पूर्वींसारखी परिस्थिति असती तर त्यांनीं सडकून अकांडतांडव केलें असतें. पण हें सोंग यथातथ्य तडीला न्यायचें असा त्यांचा निश्चय असल्याचें उघड उघड दिसून आलें.

त्यावेळीं विषय तेवढाच राहिला. थोड्या वेळानें काका बाहेर निघून गेले. चंदूच्या दवाखान्याची व्यवस्था करण्याचें याचवेळीं त्यांनीं ठरविलें होतें.

मलाही वाटलें, कीं आपण बाहेर जावें. नानासाहेबांच्या मनांत कांहींतरी डांचत होतें आणि एकान्तांत लीलेशीं बोलावें असें त्यांना वाटत होतें. आपण होऊनच ही संधी देणें बरें, असें ठरवून मीही बाहेर निघून गेलें.

परत आलें आणि पाहतें तों नानासाहेब आपलें सामानसुमान घेऊन निघून गेले होते.

लीलेला विचारलें त्यावेळीं सर्व हकिकत कळून आली. तिचा आणि त्यांचा सडकून खटका उडाला. आम्ही निघून जातांच त्यांनीं आपलें खरें स्वरूप प्रकट केलें आणि लीलेवर अद्वातद्वा तोंड टाकलें. कायदेशीर रीतीनें व्यवस्था झाली असल्यामुळें लीलेला त्यांच्या नाराजीची भीति वाटली नाहीं आणि म्हणूनच तिनें आपल्या मनच्या चार गोष्टी त्यांना प्रांजलपणें ऐकविल्या.

त्याचाच हा परिणाम झाला. झालें तें एका अर्थीं बरें झालें, असें मला वाटलें.

मी लीलेला विचारलें, " नानासाहेब निघून गेले--आतां कदाचित् यापुढें ते तुझी चौकशीही करणार नाहींत. आपला अपमान झाला असं त्यांना वाटलं आहे. तूं पुढं काय करणार आहेस ?

लीलेच्या डोळ्यांतून आसवें गळत होतीं. तिनें गहिंवरून माझ्या खांद्यावर मान टाकली आणि रडायला सुरवात केली.

एकाएकीं ती अशी काय करते हें मला कळेना. तिचा दुःखावेग थांबेपर्यंत मी तिला जास्त खोदून विचारलें नाहीं. ज्यावेळीं विचारलें त्यावेळीं ती म्हणाली, " काकू, आजपासून मी ठरवलं आहे, कीं तुला काकू न म्हणतां 'आई' म्हणत जाईन. माझी आई होण्याएवढं तुझं वय नाहीं खरं; पण तूं मला आईहून आई झालीस. माझ्या जन्मदात्या आईनं माझ्या सुखदुःखाची चाड बाळगली नाहीं. बापानं तर माझा विक्राच मांडला होता. अशा वेळीं तूं मला आसरा दिलास--नुसता आसराच नव्हे-तर तुझ्यामुळंच मी आज जगून राहिलें, असं मी म्हणेन. मी रडत होतें ती दुःखासाठीं नव्हे. मला आनंद झाला होता. माझं मन ओळखून तूं निघून गेलीस, याचाच मला आनंद वाटला. तो मोह मला एकदां तोडून टाकायचा होता. रक्ताच्या नात्याच्या जोरावर माझ्यावर सत्ता गाजवायचा नानासाहेबांचा जो प्रयत्न होता तो मला दुःसह झाला होता. तें रक्ताचं नातं आज पुसून टाकलं गेलं. यापुढं नानासाहेब केव्हांही माझ्या वाटेला जाणार नाहींत, इतकं मी त्यांना तोडून बोललें आहें. मी तसं टाकून बोललें म्हणून तुला जर वाईट वाटलं असेल, तर मला क्षमा कर. पण माझा नाइलाज झाला. माझ्या

सहनशक्तीच्या पलीकडे गेलं. मला त्यांचा वीट आला. त्यांची शिसारी आली. यापुढं अशा माणसाला बाप म्हणणं म्हणजे देखील भयंकर पाप आहे, असं मला वाटूं लागलं इतक्या वाईट भाषेंत ते मला बोलले. ते काय बोलले तें मला कृपा करून विचारूं नकोस. ”

नानासाहेबांचा स्वभाव मला माहित असल्यामुळें तिच्या या उद्गारांबद्दल मला कांहींसुद्धां वाटलं नाहीं. वाटेल त्या प्रकारच्या घाणेरड्या भाषेंत ते आपल्या मुलीला-सुद्धां बोलतील याची मला खात्री होती.

कांहीं वेळानें काका चंदूला भेटून आले. चंदू कामांत गुंतल्यामुळें त्यांच्याबरोबर आला नव्हता. पण लीलेसाठीं नानासाहेबांनीं योजलेल्या वराची हकिकत चंदूकडून त्यांना कळली, आणि त्याबरोबरच सर्व कोडें उलगडलें. मी पूर्वी त्या व्यक्तीची हकिकत लिहिलेलीच आहे. त्याची माझी डायमंड लॉजमध्यें भेट झाल्याचा उल्लेख मागें आलेलाच आहे. चंदूला त्याची सर्व माहिती होती. त्याची पूर्वीची वृत्ति आतां राहिली नव्हती. तो अट्टल दारुड्या बनला होता. त्याचें एक लग्न झालें होतें आणि दारू पिऊन आल्यावेळीं बेफामपणानें बडवल्यामुळें आजारी पडून त्याची ती बायको मयत झाली होती, असें चंदूकडून कळलें. पुण्यांत कुणीही त्याला आपली मुलगी द्यायला तयार नव्हता म्हणूनच त्यानें नानासाहेबांना गाठलें आणि पैशाचें आमिष दाखविलें, असें चंदूला चौकशीअंती कळलें.

यःकश्चित पैशाच्या लालचीनें बापसुद्धां इतका राक्षस बनूं शकतो का ? मला माझी आठवण झाली. त्यावेळीं पैशाची लालूचसुद्धां नव्हती. नुसत्या एका मंग-ळाच्या भीतीनें माझ्या वडिलांनीं माझें लग्न एका म्हाताऱ्याशीं लावून दिलें होतें. दोन प्रकारचीं हीं दोन उदाहरणें समोर पाहून माझें मन बुचकळ्यांत पडलें. मनुष्य स्वभावाला काय म्हणावें, हेंच सांगतां येईना.

काकांनीं ती हकिकत लीलेसमक्षच सांगितली. ती ऐकतांच तिच्या अंगाचा भडका झाला. त्यावेळीं नानासाहेब समोर असते तर तिनें काय केलें असतें आणि काय केलें नसतें हें सांगतां आलें नसतें, इतकी ती पिसाळून गेली होती.

या सर्व गोष्टींवर मी विचार करूं लागलें त्यावेळीं मला या परिस्थितीचें आवि-ष्करण करतां येईना. रक्ताची ओढ मोठी कठिण असते, असें साधारणतः समजलें जातें. मग पोटच्या गोळ्याच्या कल्याणापेक्षां नानासाहेबांना स्वतःची तुंबडी भरण्याचें महत्व कां वाटलें ? रक्ताचें नातें यावेळीं कुठें गेलें ? माझा आणि

लीलेच्या रक्ताच्या नात्याच्या दृष्टीनें कोणताच संबंध नव्हता. ती पूर्णपणें परकी होती. असें असतां तिच्याबद्दल मला जिव्हाळा कां वाटतो? तीच स्थिति माझ्या स्वतःबद्दलची. ताई माझी सावत्र मुलगी. मुलगी खरी–पण माझ्या आईच्या वयाची. तिच्या पित्यानें वृद्धापकाळीं लग्न केलें–माझ्यासारख्या एका बारा वर्षांच्या मुलीशीं लग्न केलें–म्हणून तिला बापाचा तिटकारा आला. पण माझी भेट होतांच माझ्याबद्दल जिव्हाळा उत्पन्न झाला! खरें पाहिलें तर तिला माझ्याबद्दल द्वेषच वाटला पाहिजे होता. तसें झालें नाहीं. उलट ती माझी मुलगी असून मला आईच्या जागीं झाली. रक्ताचें नातें इथें कुठें आलें? प्रत्यक्ष माझ्या बापानें माझें तोंड पहाण्याचें सोडून दिलें, त्यावेळीं मला सर्वस्वीं आधार माझ्या सावत्र मुलीचा झाला. मग रक्ताच्या नात्याचें महत्त्व तें काय राहिलें? मानसशास्त्राच्या सूक्ष्म विश्लेषणाच्या दृष्टीनें या कोड्याचा कुणी मानसशास्त्रवेत्ता कसा निकाल लावील तो लावो; पण माझी मात्र खात्री झाली, कीं रक्ताच्या नात्याचा बडिवार फोल आहे.

कुणा व्यक्तीचा जिव्हाळा दुसऱ्या कुठल्या व्यक्तीसाठीं कशा रीतीनें आणि कोणत्या कारणानें निर्माण होईल याबद्दलचा सिद्धांतस्वरूप नियम केव्हांही सांगतां यायचा नाहीं, अशी वस्तुस्थिति असल्यामुळें पूर्वजन्मींच्या अस्तित्वाकडे मनुष्याचें साहजिकपणें लक्ष जातें. आपण म्हणतों, पूर्वजन्माचे लागेबांधे. भौतिकशास्त्राच्या अभ्यासामुळें पूर्वजन्मावरचा आपला विश्वास ज्यावेळीं डळमळूं लागतो, त्यावेळीं अशा प्रकारचीं अवास्तव उदाहरणें आपल्या या नव्या दृष्टीला जोराचा धक्का देतात.

लीलेचें त्या दिवशींचें वर्तन खरोखरीच मोठें विलक्षण झालें. तिनें जो निश्चय केला तो चालू ठेवला. त्या दिवसापासून ती मला 'आई' म्हणून हांक मारूं लागली. तें ऐकून काका पोट धरधरून हंसले.

ते हंसले त्याचा तिला राग आला. ती एकदम उसळून उठून म्हणाली, "तुम्हांला कांहीं काळीज आहे का काका? तुम्हाला होती का आई? आईचं प्रेम म्हणजे काय असतं, याची तुम्हांला कांहीं कल्पना आहे का? माझ्या आईसारखीच जर तुमची आई असती तर आईच्या प्रेमाची ओळख तुम्हांला पटणार नाहीं. आईचं प्रेम मला तरी अजून कुठं माहीत होतं? माझ्या आईनं मला जन्म देऊन जेवायला वाढण्यापलीकडे दुसरं कोणतंच काम केलं नाहीं. तिचा जिव्हाळा मला वाटावा, इतका तिचा परिचयसुद्धां मला नाहीं. आम्ही एका घरांत रहात होतों–पण माझीं इतर नात्याचीं माणसं आणि आई यांच्यांत मला कोणत्याही प्रकारचा

फरक कधींच दिसून आला नाहीं. संगतीशिवाय आईचं महत्व कळत नाहीं. जिथं अन्तःकरण उघडून बोलतां येतं–कोणतीही गोष्ट–मग ती कितीही चमत्कारिक असो–चोरून ठेवावी असं वाटत नाहीं, इतकं मन ज्या व्यक्तीकडे उघडं करतां येतं, तीच आपली आई. तसंच मला इथं वाटलं आणि म्हणूनच हिला मी आतां आई म्हणूं लागलें."

लीलेचें तें भाषण ऐकून काका गंभीर झाले. ते म्हणाले, "माफ कर पोरी. तुला हंसलों ही माझी चूक झाली. तूं हिला आई म्हणूं लागलीस, तो मला नुसता तुझा अल्लडपणा वाटला. इतका विचार करून तूं ही नवी आई दत्तक घेतलीस असं मला वाटलं नव्हतं. या मथूचंसुद्धां तसंच झालं कीं नाहीं? तिनं आपल्या मुलीला आपली आई म्हणून दत्तक घेतली. काय एकेक चमत्कार होतात, सांगतां यायचे नाहींत!"

थोड्या वेळानें चंदू आला. झालेली सर्व हकिकत आम्ही त्याला सांगितली. नानासाहेब रागावून निघून गेल्याचें पाहून त्याला फार आनंद झाला. त्या मनुष्याचें तोंड पहावें असेंसुद्धां त्याला वाटत नव्हतें.

नानासोहबांची आणखी एक कारवाई त्याच वेळीं आम्हांला कळली. चंदू अजून-पर्यंत ती गोष्ट माझ्यापाशीं बोलला नव्हता.

कोंकणांत सरुबाई गेल्यावेळीं काकानीं सर्व व्यवस्था करून दिली असतांही नानासाहेबांच्या चिथावणीनें तिच्या बापानें चंदूवर कोर्टांत दावा लावला होता. नानासाहेबानीं सढळ हातानें ठरविलेली रक्कम त्यांना पुरेशी वाटली नाहीं, म्हणून त्यांनीं दावा लावला होता खरा–पण शेवटीं त्या कामीं ते तोंडघशीं पडले. काकांचा लेख पुराव्याला न आणतां त्यांनीं हा दावा मांडला होता. काकांचा लेख पुराव्याला आला असता तर ती रक्कम कदाचित् मंजूरही झाली असती; पण कोर्टानें चंदूची सांपत्तिक स्थिती काय आहे हें पाहून सरुबाईला जी पोटगी देवविली, ती काकांनी ठरवलेल्या रकमेच्या मानानें किती तरी अल्प होती.

हा फायदा झाला खरा पण या अशा प्रकारच्या दाव्यासाठीं कोर्टांत उभें रहावें लागल्याचा चंदूच्या मनाला भयंकर त्रास झाला. काकांना ही हकिकत माहीत होती पण त्यांनींही अजून मला कळविली नव्हती. नानासाहेबांच्या प्रस्तुतच्या उपद्व्यापामुळें ओघाओघानें त्या हकिकतीचा उल्लेख आला.

दुसऱ्या दिवशीं काका पुन्हां कोंकणांत निघून गेले.

## प्रकरण बाविसावें ........................ प्रतिष्ठा

आमचा दोघींचा संसार मोठा सुखाचा झाला होता. कोणत्याही रीतीची उणीव आम्हांला केव्हांही भासली नाहीं. ताईनें येऊन आमच्याकडे रहावें असें आम्हां दोघींनाही वाटत असे; पण काकांना सोडून येणें तिला शक्य नव्हतें. काकांना तरी दुसऱ्या कुणाचा आधार होता? ताईला माझ्याकडे येऊन राहण्याबद्दलची तळमळ लागली होती असें तिच्या पत्रावरून दिसून येत असे; पण या बाबतींत आम्हां दोघींनाही आत्मसंयमन करावें लागत होतें. काका आणि ताई दोघांनींही इथें येऊन राहणें शक्य नव्हतें. ते गांवचे ग्रामाधिकारी होते आणि त्या नात्यानें त्यांना फार दिवस गांव सोडून रहाणें अगदींच अशक्य होतें. मधून मधून यायचें उभयतांनीं कबूल केलें होतें.

आश्चर्य असें कांहीं म्हणावयाचें नाहीं—पण बाबा ज्यावेळीं मुंबईला आले—आणि सरळ माझ्याकडेच रहायला आले, त्यावेळीं मला आनंद झाला.

त्यांची कर्मठवृत्ति मला माहीत होती. माझी मतें त्यांनीं आतां विनबोभाट पत्करलीं होतीं, तेव्हां त्यांच्या मताच्या बाबतींतही तितकाच उदारपणा दाखविणें मला अवश्य होतें.

मी त्यांच्यासाठीं एक खोली अगदीं स्वतंत्र योजून दिली. त्यांत त्यांची स्नान-संध्या, पूजा त्यांच्या मनाप्रमाणें व्हावी, अशा रीतीची व्यवस्था करून दिली.

माझ्या या योजनेनें त्यांना फार आनंद झाला. त्यांनीं जें माझें प्रवचन ऐकलें होतें, त्यावरून मी नास्तिक बनलें नाहीं अशी जरी त्यांची खात्री झाली होती, तरीही कर्मठपणाबद्दलचा आदर माझ्या मनांत असेल असें त्यांना वाटलें नव्हतें.

ते म्हणाले, " एवढ्या बाबतींत मथू, तूं मला चकित केलंस. मुंबईला तुझ्याकडे राहायचं तेवढ्या मुदतींत आपली स्नानसंध्या गुंडाळून ठेवायची, असा विचार करून मी इथं आलों होतों. पण घरच्यापेक्षांही इथं माझी जास्त सोय झाली. आदळ आपट झाल्याशिवाय कधींही माझ्या संध्येपूजेची तयारी झाली नाहीं. त्यांतून तें मुलांचं रडणं, तिनं त्यांना धोपटणें, त्यांनीं मग आकांत करणं, त्या सगळ्या हैदोसापुढें संध्या-जपाकडे माझं लक्षसुद्धां लागत नसे. इथं आज चार दिवस पाहतों आहें, मला कांहीं सांगावंसुद्धां लागत नाहीं. लीला माझी एवढी तयारी करून ठेवते, कीं तिला हें कळलं तरी कसं याचं मला आश्चर्य वाटतं—"

त्यांची ती तारीफ ऐकून लीला म्हणाली, " माझी उगीच तारीफ करताहेत आजोबा. मी नुसती हुकुमाची ताबेदारीण. आई सांगते, त्याबरहुकूम सर्व कांहीं तजवीज ठेवींत असतें. ती कांहीं माझी अक्कल नाहीं. पुण्याला आमच्या घरीं कोण करतो आहे एवढं जपजाप्य ? नानासाहेबांची सारी संध्या, पूजा म्हणजे केसरी ऑफिस. घरीं आल्याबरोबर गोष्टी काय त्या तिकडल्या. वेळीं अवेळीं येणं. तेव्हां मला त्यांतलं कांहीं माहीतच नव्हतं मुळीं—"

" असं आहे का ? " बाबा म्हणाले, " एकूण मथू, तुला लहानपणची सगळी आठवण आहे ? इथं आलों आणि ही सारी व्यवस्था होऊं लागली, तेव्हां पूर्वाश्रमाची आठवण होऊं लागली. ही मथू त्यावेळीं एवढीशी चिमुरडी पोर ! पण आतां हिला समोर पहातों त्यावेळीं, हीच माझी ती मथू, अशी खात्री पटायला मला पुनः पुनः विचार करावा लागतो. "

बाबांच्या त्या उद्गारांचा मला केवढा अभिमान वाटत असे, याची कुणालाही कल्पना करतां येणार नाहीं. मी हट्ट धरला असता तर बाबांनीं मला विरोध केला नसता, किंबहुना मुंबईच्या वातावरणांत त्यांनीं आपल्या कर्मठपणाला मुळीं रजाच दिली असती.

पण मला तें करायचें नव्हतें. ज्याचे त्याचे समज हे ज्याला त्याला जिवापलीकडे वाटत असतात. माझीं मतें मला जितकीं प्रिय आहेत, तितकींच बाबांचीं मतें त्यांनाही प्रिय आहेत. बाबा आपल्या मताच्या बाबतींत माझ्यावर सत्ता चालवूं लागले असते, तर मला चीड आली असती. मग मी जर माझ्या मताच्या बाबतींत त्यांच्यावर सक्ती करूं लागलें, तर त्यांना देखील तितकीच चीड नाहीं का येणार ?

मी हाच विचार केला. एकमेकांनीं एकमेकांच्या मतांच्या बाबतींत जर सहनशीलता धरली तर मतभेदाच्या अढी हळू हळू ढिल्या होऊं लागतात; याचा विचार न करतां दुराग्रहानें ज्यावेळीं कुणी सक्तीनें आपलीं मतें दुसऱ्यावर लादायचा प्रयत्न करतो त्यावेळीं त्या मताचा सुपरिणाम न होतां विरोधांत त्याचा शेवट होतो.

बाबांच्या आचाराविचारांच्या बाबतींत जी सहनशीलता मी दाखविली तीही अस्थानीं नव्हती. कारण, सहनशीलता दाखविण्याचें पहिलें उदाहरण त्यांचें होतें. इतक्या वर्षांचा विरोध विसरून ज्यावेळीं त्यांनीं माझ्याशीं समेट केला—मला आशीर्वाद दिला—त्याचवेळीं त्यांच्या मताच्या बाबतींत सहनशीलता दाखविण्याची जबाबदारी माझ्यावर साहजिकच येऊन पडली. हा पर्याय क्रमप्राप्तच होता. त्यांत माझ्यापेक्षां त्यांचाच मोठेपणा जास्त दिसून आला होता. त्यांनीं दाखविलेल्या त्या मोठेपणाच्या बाबतींत उतराई होण्याइतका मी माझ्या आचारविचारांत बदल केला, यांत कांहीं विशेष केलें नाहीं.

कोणत्याही रीतीनें त्यांचें मन दुखावूं नये, अशा रीतीनें मी वागत होतें. स्मिथबाई मधून मधून मला भेटायला येत असत. त्यावेळीं त्यांचा आदरसत्कार करणें मला अवश्य होतें. गृहस्थधर्माला अनुसरून आल्यावेळीं त्यांना निदान चहा तरी देणें अवश्य होतें. अशा वेळीं गड्यालासुद्धां न सांगतां मी स्वतः त्यांच्या चहाची भांडीं विसळून टाकीत असें. स्वयंपाकीणबाई किंवा गडी यांना बाबांची सर्व कामें करावीं लागत असत, त्यामुळें त्यांच्या नजरेनें तीं अशा निषिद्ध गोष्टीपासून जितकीं अलिप्त राहतील तेवढी खबरदारी मी घेत असें.

या माझ्या योजनेमुळें बाबा सदोदीत आनंदांत मग्न असत. ते जे माझ्याकडे राहायला आले ते पुन्हां गांवीं जायची गोष्टच बोलेनात.

म्हणजे त्यांनीं गांवीं जावें, असें माझें म्हणणें नव्हतें. पण ते गांवीं न गेले तर तिकडे माझी सावत्र आई माझा उद्धार करीत असेल, असें मला वाटत होतें. तिच्या

वर्तनाला विटून ते माझ्याकडे आले होते आणि इथें समाधान वाटत असल्यामुळें तिकडे पुन्हां जाऊं नये असें त्यांना वाटत होतें.

त्यांच्यासाठीं योजलेल्या स्वतंत्र व्यवस्थेमुळें मला कोणत्याही रीतीचा त्रास किंवा उपसर्ग होत नसे. संध्या, पूजा, वैश्वदेव, ब्रह्मयज्ञ वगैरे आन्हिकें गांवीं असतांना ते जशा रीतीनें करीत असत त्याच रीतीनें इथेंही व्हावींत, अशी जी व्यवस्था मी केली होती, त्याचाच त्यांना आनंद झाला होता. त्या त्यांच्या नित्यकर्मासाठीं त्यांची खोली अगदीं स्वतंत्र ठेवली होती. त्या खोलींत जरूरीशिवाय कुणी जायचें नाहीं, अशी माझी सक्त ताकीद होती.

त्यांना पूर्वीपासूनच वाचनाची आवड असे. अर्थात्च त्यांचें वाचन एका विशिष्ट विषयापुरतें असे. इच्छा असूनही वेदांत विषयावरील बरीचशीं पुस्तकें त्यांना अजून वाचायला मिळालीं नव्हतीं, तींही आणून देण्याची मी व्यवस्था केली. वेद आणि उपनिषदें यांच्यावरचीं निरनिराळीं भाष्यें आणि अधिकृत वेदांतवादी लोकांचे ग्रंथ जितके म्हणून मिळणें शक्य होते तेवढे आणून मी त्यांच्या हवालीं केले. निर्णयसागर, आनंदाश्रम आणि पाणिनी ऑफीस या संस्थांनीं प्रसिद्ध केलेले सारे संस्कृत ग्रंथ मी आणून त्यांच्या हवालीं केले, त्यावेळीं त्यांना ती एक मोठी मेजवानी झाली असें वाटलें.

सदोदित ते आपल्या व्यासंगांत गर्क असत. रात्रीच्या वेळीं जेवणखाण आटोपल्यावर आम्ही घटकाभर बोलत बसत असूं. त्या बोलत बसण्यांतही चर्चेचा विषय आध्यात्मिकच असे. लीलेलाही त्यांच्या सहवासाचा फायदा मिळाला. ज्या पुस्तकांचें अध्ययन तिच्याकडून व्हावें अशी माझी इच्छा होती, त्या पुस्तकांचा अभ्यास करण्याची संधी बाबांच्या सहवासानें तिला आयतीच मिळाली. हे प्राचीन ग्रंथ समजावून देण्याची बाबांची पद्धति जरी जुन्या प्रकारची होती, तरी लीलेसारख्या बुद्धिवान् मुलीला ती आकलन करणें कठीण गेलें नाहीं किंवा कंटाळवाणेंही झालें नाहीं.

मधून मधून चंदूही येऊन भेटत असे, पण तो अगदीं क्वचित् येई आणि आला तरी फार वेळ बसत नसे, बसलाच तर बाबांबरोबर बोलत बसत असे. मीही मुद्दाम होऊन त्याच्याशीं बोलण्याचा प्रयत्न केला नाहीं. त्याच्याशीं प्रत्यक्षपणें भाषण करण्याचें जरी मी टाळीत नव्हतें तरीही मुद्दाम होऊन भाषण उकरून काढणें मला आवडलें नाहीं. लीलाही प्रसंगोपात एकादा विषय निघाला तरच चंदूशीं बोलत असे.

काका आणि ताई मधें एक आठवडाभर राहण्यासाठीं आलीं होतीं. माझ्या संसारांत बाबा रमलेले पाहून ताईला अत्यानंद झाला. तिकडे गांवीं माझ्या सावत्र आईनें हलकल्लोळ मांडला असल्याचें मला ताईकडून कळलें; पण बाबांना त्रास होऊं नये म्हणून मी महिन्याकाठीं बरीचशी रक्कम मनिऑर्डरीनें पाठवीत असल्यामुळें, ती बाबांवर चिडली तरी माझी तारीफच करीत असे, असें ताईच्या सांगण्यावरूनच कळलें.

आमच्या शाळेचा पसारा दिवसें दिवस वाढत चालला होता. त्यामुळें शाळेची मुख्याध्यापिका आणि सुपरिंटेन्डेंट या नात्यानें माझ्यावरची जबाबदारी आणि कामगिरीही त्याच प्रमाणांत वाढत चालली होती. माझा साराच वेळ शाळेच्या कामांत जात असे. मधून मधून जेवढी सवड मिळे तेवढ्या काळांत मला लीलेच्या अभ्यासाकडे लक्ष पुरवावें लागे.

सुट्टीच्या दिवसांत काकांकडे जावें अशी इच्छा असे खरी; पण अलिकडे बाहेर गांवाहून प्रचार कार्यासाठीं मला वारंवार बोलावणीं येत असत. एकदां घरांतून बाहेर पडलें, कीं सुट्टी संपेपर्यंत निरनिराळ्या गांवचीं आमंत्रणें आलीं कीं तीं मला टाळतां येत नसत.

हिंदुस्थानांतील भिन्न भिन्न प्रांतांतल्या शिक्षणसंस्था पहाण्याच्या कामासाठींही मला केव्हां केव्हां जावें लागे. अशा शिक्षण संस्थांतून नवीन सुधारणा करण्यासाठीं बहुधा मलाच नव्या नव्या योजना सुचवाव्या लागत. स्त्रियांच्या शिक्षणविषयक चळवळीला त्या वेळीं नुकताच कुठें जोर लागूं लागला होता; म्हणून ज्या ज्या वेळीं अशा प्रकारची संधि येई, त्या त्या वेळीं माघार घेणें मला अशक्य होऊन बसलें होतें.

मलाही कार्यव्याप्तृत्व पाहिजे होतें. सारें हिंदुस्थान माझें घर होऊन बसलें असल्यामुळें गृहिणीपणा गाजविण्याचें माझें क्षेत्र फारच व्यापक झालें होतें. ज्या ज्या अशा क्षेत्रांतून शिक्षण कार्यासाठीं मला बोलावणें येत असे, त्या त्या ठिकाणीं जाण्यांत मला आनंदच वाटत असे. कार्याच्या बाहुल्यामुळें मला आत्मविस्मृति होत चालली होती. माझें घर, माझा संसार, माझीं मुलेंबाळें, असें म्हणणारी गृहिणी आपल्या कार्याचें क्षेत्र संकुचित करून रहात असते. त्या संकोचामुळेंच तिच्या दृष्टींतील व्यापकता नष्ट होत असते. गृहिणीच्या या संकुचितपणाचीच बहुजनसमाजा-

करून तारीफ केली जाते. स्त्रियांचें कार्यक्षेत्र म्हणजे त्यांचें घर, त्या पलीकडे कांहीं नाहीं, असें म्हटल्यामुळें स्त्रीची नजरही साहजिकपणें आटोक्याच्या क्षेत्रांतच वावरत असते. हा संकुचितपणा गेला, दृष्टि व्यापक झाली, क्षेत्राचा पसारा वाढवला तरीही स्त्रियांना कार्य करतां येईल, याचा प्रत्यक्ष अनुभव मला ज्यावेळीं आला, त्यावेळीं 'स्त्रियांचें कार्यक्षेत्र म्हणजे त्यांचें घर' या तत्वावरचा माझा विश्वास अजिबात नाहींसा झाला.

ज्याला संसारिक सौख्य म्हणून म्हटलें जातें त्या प्रापंचिक सौख्याची तृष्णा माझ्या हृदयांत पूर्वी केव्हां केव्हां उसळून उठत असे. कार्याचा भार जसजसा मोठा होऊं लागला तसतशी या तृष्णेची छाया माझ्या हृदयाला शिवेनाशी झाली.

नवा हव्यास माझ्या अन्तःकरणांत जागा झाला. साऱ्या हिंदुस्थानच्या शिक्षणकार्याचा भार आपण एकट्यानें आपल्या हातीं घ्यावा, अशा प्रकारची वेडी पण अजस्र कल्पना माझ्या अंतःकरणांत भडकूं लागली. मी आपलेपणा विसरून गेलें. दुसऱ्यांच्यासाठीं कांहीं तरी केलें पाहिजे, ही तळमळ जेव्हां उत्पन्न झाली त्यावेळीं आपोआपच आपलेपणाची संकुचित भावना विरघळून जाऊं लागली. नव्यानव्या कल्पना मला सुचूं लागल्या. त्या नव्यानव्या कल्पना मांडण्यासासाठीं मला हिंदुस्थानच्या सर्व भागांतून प्रवास करावा लागला. निरनिराळ्या प्रांतांतील निरनिराळ्या दर्जाच्या शिक्षणतज्ज्ञांशीं गांठीभेटी होऊं लागल्या. त्यामुळें नुसत्या माझ्या भावनेनें स्फूर्त होणाऱ्या त्या नूतन कल्पनांना आणखी फांटे फुटूं लागले. या नव्या नात्यांच्या अनुषंगानें कार्यक्षेत्राचा पसारा अधिकाधिक वाढूं लागला आणि त्या वाढीबरोबरच प्रचारकार्याची हौस एकाद्या मादक पदार्थाच्या कैफासारखी माझी वृत्ति उसळविण्यास कारणीभूत होऊं लागली.

या नव्या कैफांत मी सर्व कांहीं विसरून गेलें होतें. ताईची विस्मृती झाली होती. काका आठवणींत येत नव्हते. लीलेकडेही दुर्लक्ष होत होतें आणि जवळ असलेल्या बाबांचेंही अस्तित्व मला जाणवेनासें झालें होतें.

पण या माझ्या सकृद्दर्शनीं दिसणाऱ्या बेफामपणाचा या उपरिनिर्दिष्ट जिव्हाळ्यांच्या जीवांवर यत्किंचितही वाईट परिणाम झाला नाहीं. मी करीत असलेल्या शिक्षणाच्या प्रचारकार्यामुळें माझा जो लौकिक होत होता, त्यामुळेंच त्यांना आनंद वाटत होता— त्यामुळेंच त्यांच्याकडे होत असलेलें माझें दुर्लक्ष त्यांना दुःखदायक न होतां उलट अभिमानास्पद वाटूं लागलें होतें.

अभ्यासाच्या बाबतींत मी विशेष लक्ष द्यावें इतकी आतां लीलेला माझी जरुरीही राहिली नव्हती. विश्वविद्यालयाची पहिली महत्त्वाची परिक्षा देण्याच्या मार्गाला ती लागली होती. बाबांच्या सहवासानें संस्कृत वाङ्मयाचा अभ्यास स्वतंत्र रीतीनें करायला मिळाल्यामुळें तोच विषय तिनें बी. ए. च्या परिक्षेसाठीं ऐच्छिक विषय म्हणून घेतला होता.

मीं माझ्या कामांत चूर होतें, लीला आपल्या अभ्यासांत चूर होती आणि बाबा आपल्या व्यासंगांत आनंदमग्न होते.

या आमच्या सर्वस्वी आनंदमय झालेल्या संसारांत एक जीव काय तो दुःखी होता–आणि तो म्हणजे चंदू !

माझ्याप्रमाणेंच त्यानेंही आपल्या कार्याचें क्षेत्र शक्य तितकें व्यापक करण्याचा अट्टाहास धरला होता. डॉक्टर या नात्यानें त्याची मुंबईत फार प्रख्याती झाली होती. गरीबगुरीब त्याला देवासारखा मानीत असत. पैशाच्या मागें न लागतांही पैसा त्याच्या पायाशीं चालून येत होता. निःस्वार्थ बुद्धीनें परोपकार करीत असल्यानें लौकिकाची हांव न धरतांही त्याच्यावर जनतेकडून लोकप्रियतेची पुष्पवृष्टि होत होती.

तरीही त्याचा जीव दुःखी कष्टी होता.कचित् एकाद्या दिवशीं ज्यावेळीं तो माझ्याकडे येत असे त्यावेळीं तो आपलें दुःख आपल्याबरोबर घेऊन येत असे. रोग्यांना सदा हंसतमुख दिसणारा त्याचा आनंदी चेहरा माझ्या बिन्हाडांत पाऊल टाकतांच दुःखाच्या छायेनें काळवंडून जात असे. लोकांनीं त्याच्या आनंदी वृत्तीची जिकडून तिकडून तारीफ करावी पण माझ्या नजरेला मात्र त्याचा चेहरा उदासवाणा झालेला दिसावा, हा योगायोग तरी काय ?

लीलाही तसेंच म्हणत असे. एके दिवशीं तिनें चंदूला स्पष्टच विचारलें, "हें असं काय होतं चंदूकाका ? लोक म्हणतात, कीं डॉक्टर भालचंद्र आला, कीं औषधाशिवाय रोगी बरा होतो. नुसतं त्याच्या चेहऱ्याकडे पाहिल्याबरोबर रोग्यांना आराम वाटतो; पण तूं इथं आलास आणि तुझ्या चेहऱ्याकडे पाहिलं, कीं माझ्यासारख्या निरोगी माणसालाही आजारी पडल्यासारखं वाटतं. हें असं कां होतं ? लोक म्हणतात तें खरं, कीं मला दिसतं हें खरं ?"

लीलेचें भाषण ऐकून चंदू अगदीं खिन्नपणानें हंसला आणि म्हणाला, " दोन्ही खरीं. अन्तःकरणांत दुःखाचा अग्नि पेटत असतां दुःखी जीवांच्या समाधानासाठीं मला माझा चेहरा निर्मळ हंसरा ठेवावा लागतो. माझ्या पेशासाठीं हा जो सात्विक दांभिकपणा मला करावा लागतो त्याचं प्रायश्चित मी इथं येऊन घेत असतों. सांठवलेला अन्तःकरणांतला सारा दुःखावेग इथं आल्याबरोबर फुटून बाहेर पडतो, म्हणूनच तुला हें असं बोलावं लागलं. "

माझ्या मनोवृत्तीशीं मी चंदूच्या या मनोवृत्तीची ज्यावेळीं तुलना करून पाहिली त्यावेळी मीं भाग्यवान् आहें असें मला वाटलें. माझ्या व्यासंगांत मी जितकी रंगून गेलें होतें तितकाच चंदूही आपल्या व्यासंगांत गढून गेला होता. पण दोघांच्या वृत्तींत एक फरक होता. माझ्या कार्यांत मला कर्तृत्वाचा कैफ चढत होता आणि चंदू सक्तीनें आपल्या कर्तृत्वाचा व्याप वाढवीत होता. हे दोन भेद अगदी ठळकपणानें दिसूं लागल्यामुळें मला माझ्याबद्दल अभिमान वाटला.

या अभिमानाच्या मुळाशीं मला परिस्थितीची अनुकूलता होती हें विसरून चाललें नसतें. चंदूच्या आयुष्यांत त्याच्या स्वतःच्या अविचारामुळें जो एक बाण त्याच्या वर्मी बसला होता, तो विसरतां येणें त्याला शक्य नव्हतें. त्या दृष्टीनें अविचारासाठीं पश्चात्ताप करण्याची पाळी मला मुळींच आली नव्हती. म्हणूनच माझ्या वैधव्याबद्दल मला अभिमान वाटूं लागला. माझ्या वैधव्यामुळें सांसारिकतेला जरी मी सर्वस्वी आंचवलें होतें, तरी ती लोकदृष्ट्या तीव्र भासणारी उणीवच माझ्या आध्यात्मिक गरजा पूर्ण करायला समर्थ झाली होती. मला अभिमानाला जागा होती ती याच गोष्टीमुळें. हें माझें भाग्य होतें—माझें कर्तृत्व नव्हतें.

माझ्या या सर्व आनंदाच्या संसारांत चंदूच्या विषादामुळें तेवढाच एक मिठाचा खडा पडल्यासारखा वाटे. पण त्याला कांहीं इलाज नव्हता. त्या लहानशा दुःखाच्या चुणकीमुळें आमच्या सुखाच्या समृद्धीला जास्त उजाळा आला होता.

बाबा जे एकदां माझ्याकडे रहायला आले ते पुन्हां गांवीं गेले नाहींत. ताई आणि काका मधून मधून येत असत पण माझी भेट सदोदितच होत असे, असें कांहीं नाहीं. बहुधा असें व्हावें, कीं त्यांनीं यावें आणि त्याच वेळीं मला कुठून तरी आमंत्रण यावें. सहवास निकटवर्ति असतांना उत्पन्न होणाऱ्या या अचानक वियोगामुळें ताईबद्दलचें माझें प्रेम सारखें वाढत चाललें होतें. ज्या ज्या वेळीं तिला अशा रीतीनें

टाकून जाणें मला भाग पडे, त्या त्या वेळीं ती मला हृदयाशीं कवटाळून आनंदाचे अश्रू गाळी. त्या स्मृतीच्या आनंदावर मला पुढील कार्य करण्यासाठीं दुप्पट उत्साह येत असे.

त्या माझ्या वियोगाबद्दल ताईला केव्हांच वाईट वाटलें नाहीं. माझ्या हातून जें कार्य होत होतें, त्या कार्याच्या लौकिकाच्या अभिमानावरच वेळींअवेळीं होत असलेला हा माझा वियोग ती आनंददायक मानीत होती.

वारंवार होणाऱ्या माझ्या या गैरहजेरींतून एक विलक्षण प्रसंग उद्भवला आणि त्यानेंच या माझ्या आनंदाच्या संसारांत एक विशिष्ठ प्रकारची खळबळ उडविली.

## प्रकरण तेविसावें ::::::::::::::::::::::::::::::::::::::: विषबिंदु

लीलेचें तें बी. ए. च्या परिक्षेचें शेवटचें वर्ष होतें. पास होण्याचा तिचा निश्चय झाला होता. ती अगदीं कसून अभ्यास करीत होती. अभ्यासाच्या कामीं तिनें जरी पूर्ण लक्ष दिलें होतें, तरीही मी लावून दिलेल्या विषयांतील बाजूचें वाचन तिनें टाकलें नव्हतें. शिवाय बाबांजवळ संस्कृत वाङ्मयाचा अभ्यास सुरूच होता.

प्रचारकार्यासाठीं मला वारंवार बाहेर जावें लागत होतें. शाळेच्या मुख्याध्यापिकेचा किंवा सुपरिन्टेन्डेंटचा कारभार अलिकडे दुसऱ्या एका मास्तरणीकडे देण्यांत आला होता आणि मला बाहेर गांवच्या प्रचारकार्यासाठीं पूर्ण मोकळीक देण्यांत आली होती. माझ्या या प्रवासाचा सर्व खर्च ठिकठिकाणच्या संस्थाच चालवीत असत, त्यामुळें माझ्या या पॉकेटमनीवजा मिळणाऱ्या पगारावरही त्याचा भार येत नव्हता. घरचा सर्व खर्च चालवून थोडाबहुत पैसा मी कोंकणांत माझ्या सावत्र आईला पाठवीत होतें.

शेवटच्या परिक्षेच्या अभ्यासामुळें लीलेचा इतर विद्यार्थी आणि विद्यार्थिनीं यांच्याशीं बराचसा निकट संबंध येऊं लागला होता. नवे नवे मित्र जोडण्याची तिची फारशी प्रवृत्ति नसे. बरोबरच्या विद्यार्थ्यांची आणि तिची ओळख होती, एवढेंच. अभ्यासापुरतें जरूर लागणारें एकादें पुस्तक कुणीही मागून घेणें किंवा कुणाकडून नोट्स् गोळा करणें, या पुरताच सहाध्यायी लोकांचा आणि तिचा जेवढा संबंध यायचा तेवढाच येत असे.

मी वारंवार बाहेर रहात असल्यामुळें लीलेला जिव्हाळ्याच्या एकाद्या मैत्रिणीचें स्थान असण्याची आवश्यकता वाटूं लागली. मनांत वाटणाऱ्या सर्वच गोष्टींबद्दलची चर्चा माझ्या बाबांकडे करणें तिला शक्य नव्हतें. आधीं तिचीं आणि त्यांचीं मतेंच मुळीं जमलीं नसतीं. तिच्या स्वभावाच्या अनुरोधानें बाबांशीं ती जेवढें पटवून घेत असे तेवढेंच पुष्कळ, असें मला वाटत होतें. सब झूट म्हणून जर ती बाबांना झिडकारूं लागली असती तर माझी मोठी पंचाईत झाली असती. मात्र वेदांत विषयाच्या तात्विक विवेचनाच्या बाबतींत आधारभूत ग्रंथ असल्यामुळें त्या चर्चेमध्यें बाबांशीं तिचा विरोध येण्याचा संभव नव्हता.

मी बाहेरगांवीं गेलें असलें म्हणजे चंदू क्वचितच आमच्या घरीं येई. बाबांच्या बाबतींत त्याचें मन निर्मळ नव्हतें. एका विशिष्ट प्रसंगांत त्यानीं माझ्याशीं जो विरोध केला होता तो त्याच्या मनाला लागून राहिला होता. पूर्वीचा सर्व विरोध त्यानीं आतां जरी धुवून टाकला होता तरीही त्या गेल्या गोष्टी विसरण्याइतका मनाचा मोकळेपणा चंदूनें दाखविला नाहीं. त्याच्या मनाप्रमानें तो वागला. त्यांत मलाही त्याला दोष ठेवतां येत नव्हता. ज्याचीं त्याचीं कांहीं तरी ठाम मतें असतात आणि मैत्रींत बिघाड येऊं नये अशी इच्छा असली तर अशा ठाम मतांवर आघात न करणेंच बरें असतें, या धोरणानें मी चालत होतें आणि त्यामुळेंच माझ्या गैरहजेरींत तो फारसा आमच्या घरीं येत नव्हता.

अशामुळें लीला एकटी पडूं लागली. तिला मैत्रीची जरूरी भासूं लागली आणि त्या उणीवेची भरपाई तिनें आपल्या आवडीप्रमाणें केली.

ती फार धोरणी मुलगी होती. पण धोरणी माणसेंही चुकत असतात, नाहीं असें नाहीं. आणि ही तर अननुभवी तरूण विद्यार्थिनी होती. तिच्या बरोबरीच्या मुली तिच्याशी साधारण फटकूनच वागत असत. तिच्या स्वभावामुळें असें होत असे.

तीही कुणाशीं विशेष सलगी ठेवण्याचा प्रयत्न करीत नसे. पण ऐच्छिक विषयाच्या साम्यामुळें एका विद्यार्थ्याचा आणि तिचा एके ठिकाणी अभ्यास करण्याचा संबंध येऊं लागला.

बाबांच्या शिक्षणाखालीं ती वेदांत विषयाचा अभ्यास करीत असल्यामुळें तोही तिच्या बरोबर बाबांकडे येऊं लागला. येण्या जाण्याच्या निकट संघटनामुळें, आणि एका जागीं होणाऱ्या बैठकीच्या कालमानामुळें, दोघांचा स्नेह वाढूं लागला. त्या दोघांनींही येऊन आपल्याजवळ शिकावें हें बाबांना तितकेसें आवडत नसे. या दोघी विद्यार्थिनी असत्या किंवा दोघेही विद्यार्थी असते तर बाबांनीं नाराजी दाखविली नसती. पण एक विद्यार्थी आणि एक विद्यार्थिनी एकाच वेळीं येऊन आपल्याजवळ शिकावें, हें त्यांच्या परंपराप्रिय मनाला रुचलें नाहीं.

दुसरेंही एक कारण होतें. माझ्याप्रमाणें सकृत्दर्शनींच एकाद्या व्यक्तीबद्दल बरा वाईट ग्रह करून घेण्याची बाबांची प्रवृत्ति होती. त्या प्रवृत्तीला अनुसरून त्यांचा या विद्यार्थ्याबद्दल चांगला ग्रह झाला नाहीं. येऊं नको, इतकें सांगण्याइतका कठोरपणाही त्यांच्यानें करवला नाहीं.

मी ज्यावेळीं मुंबईत असें त्यावेळीं हा विद्यार्थी क्वचितच आमच्या घरीं येत असे. पण मधल्या काळांत अखिल हिंदुस्थानाच्या दौऱ्यावर मी ज्यावेळीं निघालें त्यावेळीं माझे जवळ जवळ चार महिने बाहेर गेले. आणि या चार महिन्यांच्या मुदतींतच त्या उभयतांचा स्नेह वृद्धिंगत पावला.

ज्यावेळीं मी मधुकराला पाहिलें होतें—हें त्या विद्यार्थ्याचें नांव—त्यावेळीं त्याच्याबद्दल कांहींतरी मत बनविण्याइतका अवधी मला मिळाला नव्हता. पण बाबाप्रमाणेंच माझाही त्याच्याबद्दल फारसा अनुकूल ग्रह झाला नाहीं. मी बाहेर फिरत असल्यामुळें लीलेचा आणि त्याचा सहवास वाढत आहे, हेंही मला कळलें नाहीं किंवा तिनेंही आपल्या पत्रांत मला कळविलें नाहीं.

ज्यावेळीं मीं परत आलें त्यावेळीं मला हा सर्व प्रकार कळून आला आणि तोही बाबांकडून.

बाबा म्हणाले, "मुलगा बुद्धिवान आहे, अभ्यासू आहे पण त्याच्या डोळ्यांतली ती एक विशिष्ट प्रकारची चमक मला आवडत नाहीं. लीलेकडे पहातांना त्याची दृष्टि ज्या प्रकारची होते, ती पाहिली, कीं मनाला होणारा उद्वेग दाबणं मला

कठीण जातं. लीलेच्या तें ध्यानांत येत नसावं. मी आपला एक जुन्या काळचा माणूस आहें. अविवाहित मुलांमुलींनीं इतक्या खेळीमेळीनं वागलेलं माझ्या पुराण्या नजरेला कांहीं पटत नाहीं. यापुढं तुझं तूंच पहा म्हणजे झालं."

त्या दिवशीं तो लीलेबरोबर आला त्यावेळीं मी त्याचें सूक्ष्म निरीक्षण करण्यास सुरवात केली. बाबांच्या म्हणण्यांत कांहीं तथ्य आहे, असें मलाही वाटूं लागलें. तो फार बुद्धिवान होता, चलाख होता, अत्यंत मधुभाषी होता, लीलेवर त्यानें बरीच छाप टाकली होती आणि तीही त्याला भाळली होती, असें मला उघड उघड दिसून आलें.

मुळींच लग्न करायचें नाहीं, असें कांहीं लीलेनें ठरविलें नव्हतें. पण लग्न करतांना तिच्या हातून अविचार होऊं नये, याबद्दल खबरदारी घेण्याइतकी ती सावध राहिली आहे असें मला वाटलें नाहीं. त्यामुळेंच मी थोडीशी घाबरून गेलें.

तिच्याकडे हा विषय कोणत्या रीतीनें काढावा हेंच मला सुचेना. पण एके दिवशीं आयताच एक प्रसंग आला.

चंदू मला भेटायला आला होता त्यावेळीं मी त्याच्याकडे मधुकराबद्दल विचारपूस करायला सुरवात केली. लीलाही तिथें हजर होती. बाबा देवदर्शनासाठीं बाहेर गेले होते. माझ्या प्रश्नाला उत्तर देतांना तो म्हणाला, "मला त्याची कांहींच माहिती नाहीं. तूं म्हणत असशील तर मी चौकशी करून पाहीन."

मी लीलेकडे पाहून म्हटलें, "कसं काय लीले? मधुकराच्या हकिकतीबद्दल चौकशी केली पाहिजे का?"

"असं कां विचारतेस आई?" आणि आई म्हणण्याचा हट्ट तिनें तसाच चालवला होता.

मी उत्तर दिलें, "तूं मला आई म्हणतेस म्हणूनच मला चौकशी करावीशी वाटते. चंदूसमोर संकोच धरायला नको. अगदीं स्पष्टपणें काय तें सांग, पाहूं?"

लीला खालीं मान घालून स्तब्ध राहिली. त्यावेळीं चंदू म्हणाला, "असं पहा लीले, हीं आयुष्यांतली गंडान्तरं आहेत. माझी हकिकत तुला माहीत आहे. नुसत्या बाह्यस्वरूपावर जाऊं नकोस किंवा तात्पुरत्या परिचयावरही विसंबून राहूं नकोस. मनुष्य केव्हांही दिसतो तसाच असतो, असं म्हणतां यायचं नाहीं. प्रत्येक

मनुष्याला दोन जीवनं असतात. अशी दुजीवी नसलेलीं माणसं फार क्वचित्! म्हणूनच म्हणतों, कीं तसं कांहीं असेल तर सांग. मी चौकशी करीन. ”

लीलेनें मान उचलून वर माझ्याकडे पाहिलें, त्यावेळीं तिचा गौरवर्ण असलेला चेहरा तांबडालाल झाला होता. ती रागावली नव्हती हें खास. ती अनपेक्षित लज्जेची छटा होती.

तिनें पुन्हां मान खालीं घातली आणि तशीच पुटपुटली, “ तर मग चौकशी करच! ”

“ ठीक ! ” मी म्हटलें, “ ठीक ! स्पष्ट सांगितलंस त्याचा मला फार आनंद झाला. ”

त्या दिवशीं तो विषय तेवढाच राहिला. दुसऱ्या दिवशीं मधुकर ज्यावेळीं आमच्या घरीं आला त्यावेळीं मी त्याला उघड उघड प्रश्न केला. तो पुरुष असल्यामुळें सरळ बोलेल अशी माझी अपेक्षा होती. सुदैवानें लीला तिथें नव्हती.

मी म्हटलें, “ मधुकरराव, मी बरेच दिवस इथं नव्हतें. आलें त्यावेळीं माझ्या नजरेनं–आईच्या नजरेनं–मला असं दिसून आलं, कीं तुमची आणि लीलेची मैत्री कांहीं विशिष्ट मर्यादेपलीकडे गेली आहे. म्हणजे तुमच्या हातून कांहीं अपराध झाला आहे असं मी म्हणत नाहीं–पण तुम्हा दोघांच्या मनांत एकमेकांबद्दल जिव्हाळा उत्पन्न झाला आहे, असं मला दिसून आलं. मी म्हणतें हें बरोबर आहे का ? ”

मधुकरानें लीलेसारखी मान खालीं घातली नाहीं किंवा विचार करण्यासाठीं अवधीही घेतला नाहीं. माझ्याकडून अशा प्रकारचा प्रश्न येईल अशा अपेक्षेनें तो तयारींतच होता, असें त्याच्या उत्तरावरून मला दिसून आलें. तो म्हणाला, “तुमचा अंदाज बरोबर आहे. लीलेवर माझं अन्तःकरणापासून प्रेम आहे— ”

त्याच्या उत्तराची भाषा मला आवडली नाहीं. मी विचारलें, “ प्रेम आहे म्हणजे काय ? ”

तो हंसून म्हणाला, “खरंच तें–तुम्हाला माहीत नाहीं–प्रेम ही भावनाच अशी कांहीं अपूर्व आहे, कीं ती शब्दानं सांगून पटणार नाहीं. ती भावना अनुभवावी लागते. त्या भावनेंत विकारवशतेचा लवलेशही नसतो. अन्तःकरणांतल्या सम-भावनांच्या भिन्न भिन्न दिसणाऱ्या लहरींचं तें एकीकरण असतं. तें कां उत्पन्न होतं तें सांगतां येत नाहीं. तसंच झालं आहे ! लीलेशिवाय माझं पुढील आयुष्य निष्प्राण

होईल. माझा सर्व जीव तिच्याठायीं गुंतून राहिला आहे आणि परीक्षा पास होतांच तिच्यासाठीं मी तुमच्याजवळ मागणी घालणार आहें. ”

त्याच्या त्या काव्यमय भाषेची मला शिसारी आली. मी म्हटलें, “ तुमची गृहस्थिती काय आहे ? ”

“ काय हा प्रश्न ? ” मधुकर म्हणाला. “ प्रेमाचा उगम झाल्यावर सहवासानं जें त्याला अमर्याद स्वरूप येतं, त्याच्यापुढें परिस्थितीची मर्यादा रहात नाहीं. तुम्ही विचारलंत, हें तुमच्या दृष्टीनं योग्यच आहे. माझी गृहस्थिती अगदीं निकृष्टावस्थेची असती तरी देखील मी लीलेला अन्तर दिलं नसतं. पण सुदैवानं माझी गृहस्थिती फारच चांगली आहे. माझे वडील एक मोठे कॉन्ट्रॅक्टर आहेत. पुण्यांत त्यांच्या स्वतःच्या अशा सात आठ इमारती आहेत. मी त्यांचा एकुलता एक मुलगा आहें आणि त्यांनीं स्वकष्टानें मिळविलेल्या त्यांच्या तीन चार लाखांच्या इस्टेटीचा मी एकटाच वारस आहें. ”

मी विचारलें, “ लीलेची गृहस्थिती तुम्हांला माहीत आहे का ? ”

“ अगदीं खडान् खडा माहीत आहे ! ” तो अगदीं हुरळलेल्या वाणीनें म्हणाला, “ माझ्या बाबतींत हुंड्याचा प्रश्न येणार नाहीं. माझं लग्न लावण्यास माझा मी मुखत्यार आहें. माझ्या वडिलांनीं त्या बाबतींत मला पूर्ण स्वातंत्र्य दिलं आहे— ”

“ या बाबतींत तुम्ही आपल्या वडिलांना कांहीं कळवलं आहे का ? ” मी शांतपणानें विचारलें.

“ अर्थातच नाहीं. ” तो म्हणाला, “ तुमची संमति घेतल्याशिवाय आधी कसा विचारीन ? खरं पाहिलं तर विचारण्याचा मुळीं प्रश्नच नाहीं. ठरलं म्हणून त्यांना नुसतं सांगायचं–एवढंच ! ”

त्याच्या या आत्यंतिकखोर वृत्तीचा मला तिटकारा आला. त्या थोडक्याशा भाषणावरून, तो मनुष्य लीलेला योग्य नाहीं, असें मला वाटलें. लीला त्याच्या बाबतींत अशी कशी फसली, याचेंही मला आश्चर्य वाटूं लागलें.

मी विचारलें, “ आपण उदाहरणासाठीं गृहीत धरूं, कीं तुमच्या वडिलांनीं तुमच्या या लग्नाला विरोध केला–तर तुम्ही काय कराल ? ”

यत्किंचित्‌ही विचार न करतां तो म्हणाला, “ मी एकदम त्यांचा संबंध तोडून टाकीन. ”

तेंही उत्तर मला आवडलें नाहीं.

इतक्यांत लीला आली. मी तिला बोलावलें आणि म्हटलें, " अशी इथं बैस. मी मधुकररावांना आतांच उघड उघड विचारलं. त्यांनीं सर्व गोष्टी सांगून टाकल्या आहेत. तुझं मत काय आहे ? "

लीलेनें पुन्हां खालीं मान घातली.

मी म्हटलें, " लाजण्याचं कारण नाहीं. माझं मत तुला माहीत आहे. तुझी वृत्ति मला माहीत आहे. कसलाही संकोच न धरतां तुला काय वाटतं तें याच वेळीं मला स्पष्टपणानं सांग. "

ती अगदीं भीत भीत उत्तरली, " आतां आणखी सांगायचं काय ? परीक्षेचा रिझल्ट लागतांच 'आम्ही' तुला सांगणार होतों. "

बोलतांना तिनें आम्ही या शब्दावर जोर दिला. मधुकर आम्ही म्हणाला नव्हता ! मला तो शब्द महत्वाचा वाटला. मी विचारलें, " आम्ही म्हणजे कोण ? तुम्ही दोघं का ? "

माझ्या या प्रश्नानें मधुकर चमकला. लीलेनें त्याच्याकडे पाहिलें आणि नंतर उत्तर दिलें, " होय. आम्ही दोघंही येऊन तुला सांगणार होतों. "

मी विचारलें, " म्हणजे तोंपर्यंत सांगणार नव्हतां ?–असंच ना ? "

लीलेनें होकारार्थी मान हालविली. तो होकार देतांना ती ओशाळल्यासारखी झाली.

मी विचारलें, " आणि तूं नापास झाली असतीस तर ? किंवा हा नापास झाला असता–तर ? "

लीला म्हणाली, " तरीही आम्ही विचारलंच असतं. "

" तरीही विचारलं असतं ना ? " मी म्हटलें, " मग त्यापूर्वींच कां विचारलं नाहीं ? आतां 'मी' हें विचारलं, तेंच जर 'तुम्ही' उभयतांनीं विचारलं असतं, तर जास्त बरं झालं नसतं का ? "

लीला पुन्हां तांबडीलाल झाली. मधुकर आपली खुर्ची पुढें सरसावून घेऊन दोन्हीही गुडघ्यावर कोपरखळी टेकून म्हणाला, "मीच तसं तिला सांगितलं होतं !"

मी विचारलें, " कां ? "

मधुकर म्हणाला, "आम्ही दोघंही पास होऊं, अशी माझी खात्री होती आणि अजूनही आहे."

मी हंसून म्हटलें, "समजा, मी तिला यंदा परिक्षेलाच बसूं दिलं नाहीं—मग?"

"ती कल्पना मला आली नव्हती!" मधुकर म्हणाला, "पण तुम्ही असं कां कराल?"

मी म्हटलें, "तिनं मला आई मानलं आहे. तुम्हांला माहीतच आहे, कीं मी तिची काकू आहें. ती मला आई म्हणते आणि मी तिला माझ्या पोटच्या मुलीइतकी मानतें. परीक्षा पास झाल्याबरोबर तुम्ही लग्न कराल असं वाटलं, तर तिनं मला सोडून जाऊं नये म्हणून मी तिच्या लग्नाला विरोध करीन, असं तुम्हांला कां वाटलं नाहीं? तुम्हांला आपल्या वडिलांची खात्री आहे तितकी खात्री कदाचित् लीलेला माझ्याबद्दलही असेल, पण माझ्या आयुष्यांत आणि माझ्या इतर जिव्हाळ्याच्या माणसांच्या आयुष्यांत जे कांहीं विशिष्ट प्रकारचे प्रसंग आले आहेत, त्यामुळं मी फार संशयी बनलें आहें, हेंही तिला माहीत आहे. लग्नाच्या बाबतींत तर मी तिला केव्हांही अविचार करूं देणार नाहीं—"

"यांत अविचार कसला?" मधुकर म्हणाला, "मी लीलेचा पति व्हायला अयोग्य आहें, असं का तुम्हांला वाटतं?"

"असं मी कुठं म्हटलं?" मी उत्तर दिलें, "तुमची योग्यायोग्यता मला कांहींच माहीत नाहीं. तुमचा परिचयसुद्धां नाहीं. तुमचं नांवही पुरतेपणीं मला माहीत नाहीं. तिला मिळणारा पति सर्वस्वी अनुरूप आहे अशी लीलेच्या हिताच्या दृष्टीनं माझी खात्री झाल्याशिवाय मी माझी संमति तिला केव्हांही देणार नाहीं. या उप्पर तिनं आपण होऊन लग्न केलं तर मी विरोधही करणार नाहीं. तसं पाहिलं, तर तिची ती मुखत्यार आहे. पण जोपर्यंत ती मला मानते आहे, तोपर्यंत माझी स्वतःची खात्री झाल्याशिवाय एवढी महत्वाची गोष्ट मी पूर्ण चौकशी केल्याशिवाय कधींही होऊं देणार नाहीं."

त्यानें हातांतल्या घड्याळाकडे पाहिलें आणि आपल्याला 'अपॉइंटमेंट' असल्याचें सांगून तो निघून गेला.

मी लीलेला विचारलें, "प्रांजलपणानं सांग—अगदीं संकोच बाळगूं नकोस—यावेळीं इथं दुसरं कुणीच नाहीं—अगदीं खरं खरं सांग, या मधुकराशीं लग्न लागल्यानं तुझं आयुष्य सुखाचं होईल, अशी तुझी खात्री आहे का?"

लीला कांहीं न बोलतां स्तब्ध राहिली. मी कांहीं वेळ तिला विचारलें नाहीं—पण ती कांहींच उत्तर देत नाहीं असें पाहून मी पुन्हा म्हटलें, "मी तुला सांगितलं ना—कीं माझ्याजवळ संकोच धरूं नकोस. आयुष्यांतील हा एक अतिशय महत्वाचा प्रसंग आहे. या प्रसंगी मागील पुढील विचार नीट केला पाहिजे. भावनात्मकतेला बळी पडतां नये. तूं काटेकोर स्वभावाची आहेस असा माझा समज होता—पण या बाबतींत तुझ्याकडून कुठं तरी ढिलाई झाली आहे, असं मला वाटूं लागतं."

"असं कां म्हणतेस?" लीला चट्कन् माझ्याकडे वर पाहून म्हणाली, "मी तुला विचारलं नाहीं म्हणून? तुला कळवलं नाहीं म्हणून?" तिचा आवाज गहिंवरल्यासारखा दिसत होता.

मी म्हटलें, "असं वाईट वाटून घेऊं नकोस लीले. तूं मला विचारलं नाहींस किंवा कळवलं नाहींस, याचं मला वाईट वाटलं, हें मीही कबूल करतें. पण तेवढ्या-वरून कांहीं मी तुझ्यावर रागावणार नाहीं. उल्लुपणानं तुझ्याकडून कांहीं घडणार नाहीं, ही माझी खात्री आहे—पण मला कळल्याशिवाय तुमचा हा स्नेह आणाभाका-पर्यंत आला असेल असं मला वाटलं नव्हतं. तसं कांहीं झालं आहे का?"

लीला शांतपणानें म्हणाली, "होय—आम्हीं वचनबद्ध झालों आहोंत. पण तूं माझ्यावर विश्वास ठेव. लाजेनं मान खालीं घालावी लागेल, असं कोणतंही वर्तन माझ्या हातून घडलं नाहीं."

"माझ्या प्रश्नाचं उत्तर तेवढंच राहिलं." मी म्हटलें, "मधुकराशीं लग्न व्हावं असा तुझा निश्चय झाला आहे का?"

ती पुन्हां म्हणाली, "आम्हीं वचनबद्ध झालों आहोंत."

"तें तूं मला सांगितलंसच." मी म्हटलें, "पण मला असं सांग, त्याच्याशीं विवाह झालाच पाहिजे—असं तुला वाटतं का? अविचारानंही वचनं दिलीं जातात. अविचारानं दिलेलीं वचनं चुकीचीं आहेत असं कळलं, तर तीं मोडणं भाग असतं. या बाबतींत कदाचित् तुझा अविचार झाला नसेल—आज तें मला कांहींच सांगतां यायचं नाहीं—पण अविचार झाला असं कळलं, तर तूं काय करशील?"

लीला म्हणाली, "मला तसं वाटलं नाहीं म्हणून मी त्या दृष्टीनं विचारच केला नाहीं."

" तर मग त्या दृष्टीनं विचार कर आणि मला सांग. " मी म्हटलें.

मी तेवढ्यावरच तो विषय सोडून दिला. त्या दिवसापासून लीला फार अस्वस्थ झाली होती. अभ्यासाकडे देखील दुर्लक्ष करूं लागली असा मला संशय आला, त्यावेळीं मी तिला बजावलें.

मी मुद्दाम चंदूच्या दवाखान्यांत गेलें आणि त्याची गांठ घेतली. झालेली हकिकत त्याला सांगितली त्यावेळीं तो म्हणाला, " मी मधुकराच्या बाबतींत तपास चालवला आहे. त्यानं सांगितलेल्या हकिकती खऱ्या आहेत. तो लक्षाधीशाचा मुलगा आहे पण त्याचं खासगी वर्तन कसं आहे. याची आधीं कसून चौकशी केली पाहिजे. त्याला पाहतांच त्याच्याबद्दल माझं मत कांहीं चांगलं झालं नाहीं–तुलाही तसंच वाटत असावं असं दिसतं–आणि लीला तर त्याला भाळली आहे. तिच्या म्हणण्या-वरून असं वाटतं, कीं त्यानं तिच्यावर चांगलीच छाप टाकली आहे. तसंच असेल तर वेळप्रसंगीं मोठी अडचण उत्पन्न होईल. चौकशी करण्याची हमी मी घेतों. तूं निर्धास्त रहा ! "

असेच कांहीं दिवस गेले. पण एक विशेष झालें–कीं मधुकर त्या दिवसापासून माझ्या घरीं यायचा बंद झाला.

तो कां येत नाहीं म्हणून मी लीलेला विचारलें नाहीं. तीं दोघेंही घराच्या दारापर्यंत बरोबर येत असत, हें मी पहात असें. रस्त्यावरूनच तो तिचा निरोप घेऊन जात असे आणि मग ती जिना चढत असे. तिच्या मागून टेहळणी करीत राहणें मला शक्य नव्हतें आणि तसें करणें मला बरेंही वाटलें नसतें.

दोघांच्यांत कांहीं तरी चर्चा झाली आहे आणि त्याचा परिणाम लीलेवर झाला आहे, असें मला वाटूं लागलें. पूर्वीच्या इतक्या मोकळेपणानें ती माझ्याशीं वागत नव्हती. अगदीं कामापुरतें बोलायचें आणि अभ्यासाकडे मात्र सर्व लक्ष द्यायचें असा तिचा क्रम सुरू होता.

कदाचित् परिक्षा पास होण्याच्या उद्देशानें तसें झालें असेल असें मी धरून चाललें. पण मन सांगत होतें, कीं तें तसें नाहीं.

एके दिवशीं मी मनाचा निर्धार केला आणि लीलेला विचारलें, " हल्लीं मधुकर इकडे कां येत नाहीं ? "

लीला म्हणाली, " त्या दिवशींच्या भाषणानंतर त्यांना इकडे येणं बरं वाटत नाहीं. परिक्षा पास होईपर्यंत इकडे यायचं नाहीं असं ठरवलं आहे. "

मी म्हटलें, " तेवढ्यासाठीं घर वर्ज्य करायला कशाला हवं ? बाबांकडे येऊन शिकण्याची यापूर्वी त्याला जरूरी वाटत होती. आतां परिक्षा पास व्हायची उत्कंठा असूनही हें शिक्षण त्यानं कां बंद केलं ? "

लीला स्तब्ध राहिली.

मी म्हटलें, " खरं पाहिलं तर त्यानं असं घर वर्ज्य करायला नको होतं, असं नाहीं तुला वाटत ? "

लीला म्हणाली, " होय. मी तसं म्हटलं देखील. पण त्यांनीं एक प्रकारचा निश्चय केला आहे. प्रत्यक्ष त्या दिवशीं सांगितलं, तसं विचारण्याचा काळ येईपर्यंत इथं यायचं नाहीं असं ठरवलं आहे. "

मी म्हटलें, " जर कांहीं ठरवायचं असेल तर हें असं नव्हे. तसा विशिष्ट काळ—म्हणजे लग्नाची मागणी घालायचा काळ—येईपर्यंत इथं यायचं नाहीं,असं ठरवण्यापेक्षां लग्नाची मागणी घालायचा काळ येईपर्यंत, एकमेकांनीं एकमेकाशीं संबंधही ठेवायचा नाहीं, असं जर त्यानं ठरवलं असतं तर तें मला जास्त सयुक्तिक वाटलं असतं. प्रांजलपणानं वागायचं म्हणजे त्यानं तुझ्यापासून दूरच राह्यलं पाहिजे होतं एक; किंवा पूर्वी जसा येत जात होता तशीच ये जा सुरू ठेवली पाहिजे होती एक. पूर्वीच्या वागणुकींत जर फरक करायचा, तर तो हा असा नव्हे—असं नाहीं तुला वाटत ? "

तरीही लीला स्तब्धच होती. ती बोलत नाहीं असें पाहून मी म्हटलें, " लीले, बाळ, रागावूं नकोस. आयुष्यांतील हा एक मोठा कठीण प्रसंग आहे ! वाटतो तितका सोपा नव्हे. या जुगाराचा फांसा एकदां पडला म्हणजे फिरवतां येत नाहीं. चंदूच्या आयुष्याचं कसं मातेरं झालं आहे तें पाहिलंस ना ? त्याच्यावरून कांहीं धडा घ्यायला नको का ? मधुकर हा वाईट मुलगा आहे असं मी म्हणत नाहीं. पण तो तुला अनुरूप आहे, अशी माझी अजून खात्री होत नाहीं. नुसत्या भावनेवर विसंबून राहून चालत नाहीं. त्याच्याबद्दल तुला काय वाटतं हें मी पाहणार नाहीं—तो कसा आहे याची खात्री मी आधीं करून घेईन. तूंही तशीच खात्री करून घेतली पाहिजे होतीस. माझ्या दृष्टीनं ती तुझी चूक झाली आहे. या माझ्या दृष्टीनं तूं एकदां विचार करून पहा. "

लीला कांहींच बोलली नाहीं. पण माझें बोलणें तिला पटलें असावें असें वाटलें.

## प्रकरण चोविसावें ............ बिघाड

शिक्षणकार्यांच्या प्रसारासाठीं मी जो प्रवास करीत होतें आणि ठिकठिकाणीं व्याख्यानें देणें, मुलाखती घेणें, निरनिराळ्या शिक्षणाच्या साधनांचा उहापोह करणें वगैरे कामें करीत होतें, त्याचा परिणाम माझ्या प्रकृतीवर झाला. कोणतेंही कार्य हातीं घेतल्यावर तें स्वतःच्या मनाला समाधान वाटेल अशा रीतीनें केल्या-शिवाय माझ्यानें राहवत नसे. त्यामुळें मला शारिरिक आणि मानसिक परिश्रम वाजवीपेक्षां जास्त पडत असत. हे परिश्रम सहन करण्याची शक्ती माझ्या देहांत आहे कीं नाहीं, याचा काम करतांना मी विचार केला नव्हता.

गृहसौख्याचा अभाव असल्यामुळें मी या प्रचारकार्यांतच जीव गुंतवून ठेवला होता. तोच माझा संसार होता. त्याच संसाराच्या उठाठेवींत मी माझें सर्व आयुष्य वेचण्याचा संकल्प केला होता. हा संकल्प करतांना हे परिश्रम आपल्या देहाला झेपतील कीं नाहीं याचा विचार आधीं न केल्यामुळें जो व्हायचा तो परिणाम झाला. माझ्या आधींच दुबळ्या असलेल्या देहाला एवढा व्याप उचलण्याचें सामर्थ्य नसल्यामुळें मी क्रमाक्रमानें थकत जात होतें, याचें कार्यांच्या कैफांत मला भान राहिलें नव्हतें. देह एकदम थकला त्यावेळीं झालेली चूक नजरेला आली.

मला बारीक ताप येऊं लागला. कोणत्या डॉक्टरचें औषध घ्यावें याचा मी विचार करीत होतें. चंदूचा दवाखाना होता पण त्याला प्रकृति दाखवावी कीं न दाखवावी, याचा मला विचार पडला होता. मी आजारी पडल्याचें कळल्यामुळें मला भेटण्यासाठीं ज्यावेळीं तो घरीं आला त्यावेळीं त्यानें माझी चांगलीच हजेरी घेतली. घरचा डॉक्टर असतां, उपचाराची सोय हाताशीं असतां, मी प्रकृतीची आबाळ केली याबद्दल त्यानें मला फार दोष दिला.

तो म्हणाला, " देह हिंडताफिरता असेल तर प्रचाराचें कार्य असाध्य नाहीं. तुझ्या करवीं मोठं कार्य झालं यांत शंका नाहीं. पण तें कार्य चालू ठेवण्यासाठीं आपला देहही शाबूत ठेवला पाहिजे, हें विसरलीस. कार्यांत गुंतून गेलं असतां प्रकृतीकडे दुर्लक्ष होणं स्वाभाविक असतं; पण तसं न होऊं देणं यांतच खरा पुरुषार्थ आहे. "

मी नको नको म्हणत असतां त्यानें माझी प्रकृति तपासली आणि औषध पाठवायला सुरवात केली.

कांहीं दिवस मला बिछान्यावर पडून राहणें भाग आलें. या मुदतींत लीलेनें मोठ्या एकनिष्ठेनें माझी सेवा केली. माझी सेवा करणें आणि आपला अभ्यास करणें हीं दोन्ही कामें तिला डोईजड होत होतीं. दोन कामांचा बोजा घेतल्यामुळें माझी प्रकृति कशी बिघडली याचें उदाहरण दाखवून देऊन, मी माझ्या शुश्रुषेसाठीं एकादी नर्स घेऊन येण्यास तिला सांगितलें.

तरीही तिनें ऐकलें नाहीं.

माझ्या आजारीपणाच्या मुदतींत मधुकर आमच्या घरीं कधींच आला नाहीं. लीला त्याला भेटत असे कीं नाहीं हें मला कळण्यास कांहींच साधन नव्हतें. मुद्दाम लीलेला विचारावें असें मला वाटेना. तिनें आपण होऊन सांगितल्याशिवाय ताज्या जखमेला डिवचणें मला योग्य वाटलें नाहीं.

तिच्या निवडीच्या बाबतींत मी विरोध केला होता. एक प्रकारें तिच्या मनोभूमीवर मी ही जखम केली होती. माझ्या भाषणानंतर तिनें त्या विषयासंबंधांत माझ्याकडे केव्हांच उल्लेख केला नाहीं. यावरून ती कोणत्या ना कोणत्या तरी पेंचांत सांपडली होती, असें मला वाटल्यावांचून राहिलें नाहीं.

एके दिवशीं तिच्या हातून गळून पडलेलें एक पत्र मला मिळालें. ती त्यावेळीं शाळेंत गेली होती. पत्र वाचावें कीं नाहीं याचा क्षणभर मला विचार पडला; पण त्याच वेळीं माझ्यावरची जबाबदारी मला आठवली. तिनें होऊन तें पत्र जरी मला वाचावयास दिलें नव्हतें, तरीही त्या पत्रांतील मजकुरावरून चालू परिस्थितीचा मला कांहीं अंदाज करतां येईल, असें मनांत आलें म्हणूनच तें पत्र मी वाचलें.

तें पत्र वाचल्याचा मला पश्चात्ताप झाला नाहीं. इतकेंच नव्हे, तर तें वाचायला मिळालें हें एक प्रकारचें भाग्य वाटलें.

मधुकरानें लीलेला लिहिलेलें तें पत्र होतें. त्यांत त्यानें—उघडपणानें नाहीं तरी—प्रच्छन्न स्वरूपानें माझी निंदा केली होती–चंदूवरही आक्षेप घेतले होते–आणि हा सर्व मजकूर लिहितांना तो इतक्या नाजूक रीतीनें आणि कौशल्यपूर्ण शैलीनें लिहिला होता, कीं प्रसंग आल्यास त्याचा वाटेल तसा अर्थ फिरविणें त्याला शक्य झालें असतें.

या पत्रामुळें मधुकराची वृत्ति मला कळली. हें लग्न होतां कामा नये, असेंच मला वाटूं लागलें. लीलेला या बाबतींत विचारून खुलासा करून घ्यावा, असेंही एकदां मनांत आलें.

पण मला तिचीही परीक्षा पहायची होती. ही परिक्षा पाहणें म्हणजे मोठें बिकट काम होतें यांत शंका नाहीं. परीक्षा पाहण्यासाठीं गेलेल्या कालावधींत कदाचित् परिस्थिती माझ्या हातून निसटून जाईल, असेंही भय मला वाटलें. तरीही मी आत्मसंयमन केलें. काय होईल तें होवो पण लीलेनें आपण होऊन सांगितल्या-खेरीज हा विषय मुद्दाम उकरून काढायचा नाहीं, असा मी मनाचा निर्धार केला.

तितक्यांत एक विलक्षण स्थित्यंतर घडून आलें. चंदूची बायको मृत्यु पावली.

ही हकिकत मला लीलेकडून कळली. मधें कांहीं दिवसांत चंदूची भेटच झाली नसल्यामुळें ती बातमी त्याच्या तोंडानें कळण्याचा प्रसंग आला नाहीं. पण ज्यावेळीं तो भेटला त्यावेळीं त्यानें ती हकिकत इतक्या रुक्षपणानें मला सांगितली, कीं ती ऐकून मला त्याची कींव आली. "सुटलों एकदांचा !" असें तो म्हणाला.

त्यानें आपण होऊन ती हकिकत मला सांगितली नाहींच, पण मी विचारलें, त्यावेळीं तो अगदीं विकारशून्य चेहऱ्यानें, 'असं झालं खरं !' असें तो म्हणाला.

तेवढेच उद्गार काढून तो कितीतरी वेळ स्वस्थ बसला. माझी प्रकृति तपासण्याचें

किंवा विचारपूस करण्याचें त्याला भान राहिलें नाहीं. कांहींतरी बोलून मीही त्याच्या मनोवृत्तीला धक्का दिला नाहीं.

भानावर आल्यासारखें करून त्यानें माझी प्रकृति तपासायला सुरवात केली. नाडी पाहण्यासाठीं त्यानें माझा हात आपल्या हातांत धरला त्यावेळीं तो थरथर कापूं लागला.

एकदम त्यानें माझा हात आपल्या हातांतून फेंकून दिला आणि म्हटलें, " नाहीं, आतां तें शक्य नाहीं. दुसऱ्या कुणा डॉक्टरला किंवा डॉक्टरणीला बोलाव. हें बंधन तुटल्यामुळं माझं मन अगदीं दुबळं झालं आहे. डॉक्टरचं पवित्र कर्तव्य बजावायला मी तुझ्यापुरता तरी नालायक झालों आहें. "

माझ्या उत्तराची अपेक्षा न करतां तो झट्कन् उठून निघून गेला. पुरुषासारखा पुरुष हा–पण भावनात्मकतेनें दुबळा झालेला पाहून मला त्याची कींव येण्यापेक्षां आश्चर्य वाटलें.

त्या विषयाचा एकदां निकाल होऊन गेला होता. त्यानंतर परिस्थितींत फरक झाल्यामुळें पुन्हां त्याच्या तोंडाला पाणी कां सुटावें ? त्याचें मन चळलें होतें यांत शंकाच नव्हती. तो धीराचा पुरुष होता. मनाचा खंबीर होता. पण एका विशिष्ट प्रकारच्या भावनेच्या आंधळ्या कल्पनेनें तो दीनदुबळा झाला होता. एक वेडी आशा हृदयाशीं कवटाळून तो बसला होता. ती कल्पना मी जशी माझ्या मनांतून काढून टाकली होती तशी त्यानें काढून टाकली नव्हती, याचा त्याच्या या वर्तनानें मला प्रत्यय आला.

लग्नच कर्तव्य असतें तर सरुबाई ह्यात असतांनाही तें अशक्य नव्हतें. त्यानें कुणाचेंच नुकसान झालें नसतें. पण ज्यावेळीं कोणतीही एक गोष्ट करायची नाहीं असें ठरवलें, त्यावेळीं एक विशिष्ट परिस्थिती उत्पन्न झाली म्हणून तो केलेला निर्धार खोडून टाकणें मला मूर्खपणाचें वाटलें.

दुसरे डॉक्टर आणणें भाग आलें. त्यांनीं माझी प्रकृति तपासून पूर्वीच्या डॉक्टरचे उपचार बंद कां केले, असा साहजिकच प्रश्न केला. मी ज्यावेळीं त्यांना सांगितलें, कीं त्यांनीं होऊनच दुसरा डॉक्टर पहावयास सांगितलें, त्यावेळीं ते नवे डॉक्टर म्हणाले, " तुमच्या डॉक्टरची ही चूक आहे. सुरू असलेले उपचार

कारण न देतां बंद करणं म्हणजे रोग्याच्या मनावर अनिश्चित परिणाम करण्या-सारखं असतं. त्यामुळं एकादा रोगी अचानक धक्का घ्यायचा ! ”

मी उत्तर दिलें, “ तसं होण्याचा इथं संभव नाहीं. ते आमच्या नात्याचेच आहेत. पण बायकोच्या निधनामुळं त्यांचं मन कदाचित् दुःश्चित झालं असावं. ”

“ अशानं डॉक्टरी कशी होणार ? ” डॉक्टर म्हणाले, “ स्वतःचीं असोत कीं दुसऱ्याचीं असोत–दुःखं पचवण्याची ताकद ज्याच्या अंगीं नाहीं त्यानं हा धंदा पत्करूं नये.”

विषय तेवढाच राहिला. पण डॉक्टरांच्या त्या इषाऱ्यानें मला फार वाईट वाटलें. आधींच चंदूच्या दुबळेपणाबद्दल माझ्या मनावर परिणाम झाला होता. त्यांतच समव्यवसायी व्यक्तीनें मारलेला तो कठोर शेरा ऐकून मला चंदूच्या भवितव्यते-बद्दल काळजी वाटूं लागली.

उपचार सुरू होतेच आणि मला बराचसा आराम पडत चालला होता. लीलेची शुश्रुषा पूर्वीप्रमाणेंच सुरू होती. मधुकराच्या बाबतींत तिनें त्या मुदतींत केव्हांच उल्लेख केला नाहीं.

एके दिवशीं नित्याप्रमाणें आलेला चंदू नित्याप्रमाणेंच चौकशी करून तडक न जातां बसून राहिला. त्याच्या मुद्रेवरून त्याच्या मनांत कांहीं तरी खळबळ चालली होती. लीला समोर असल्यामुळें तो बोलत नसावा, या कल्पनेनें मी कांहीं तरी कारण काढून लीलेला घालवून दिलें.

ती गेली असें पहातांच तो म्हणाला, “तुला कल्पना आली वाटतं ? जा, म्हणून लीलेला सांगणं मला कठीण गेलं. मला तुझ्याशीं एकांतांत कांहीं बोलायचं आहे पण तें ऐकून घ्यायची तुझी तयारी आहे का ? ”

एक क्षणाचाही विचार न करतां मी उत्तर दिलें, “ माझी तयारी असो किंवा नसो, तुला जें कांहीं बोलायचं असेल तें बोलून टाक. त्यामुळं तुझ्या मना-वरचा भार तरी हलका होईल. अशा मनःस्थितींत डॉक्टर या नात्यानं लोकांच्या जिवाशीं खेळत राहणं धोक्याचं आहे, हें तुला कळायला पाहिजे होतं. ”

माझे ते कठोर उद्गार ऐकून त्याला वाईट वाटलेसें दिसलें. तो म्हणाला, “ असं झालं आहे खरं. पण त्याला इलाज नाहीं. महत्त्वाच्या केसीस आल्या तरी हल्लीं मी

घेत नाहीं. जिथं माझीच मनःस्थिती ठिकाणावर नाहीं तिथं दुसऱ्यांना आरोग्य मी कुठून देणार ? " असें म्हणून तो थांबला.

कितीतरी वेळ तो डोळे वर करून विचार करीत बसला होता. नंतर त्यानें बोलायला सुरुवात केली. तो म्हणाला, " मी काय बोलणार आहें याची तुला कल्पना आलीच असेल. आतां मी बंधमुक्त झालों आहें. विलायतेला जायच्यापूर्वी तुला केलेला प्रश्न तुला पुन्हां विचारूं का ? माझ्या मनाचा निर्धार झाला आहे– ईश्वरानं आपली जोडी घडविली आहे असं मला वाटतं–योगायोगानं आपण दूरावलों होतों–पण आतां ती मधली अडचण दूर झाली आहे–"

" थांब ! आधीं माझं ऐक " मी म्हटलें, " तुझ्या दृष्टीनं ती अडचण होती असेल पण माझ्या दृष्टीनं ती अडचण नव्हती. लग्न करावं असं जर माझ्या मनांत आलं असतं तर मी केव्हांच तुला तसं सांगितलं असतं. पहिली पत्नी ह्यात असल्याचा अडथळा हिंदूच्या लग्नाला कांहीं येत नाहीं. तशा परिस्थितींत लग्न होणं हें, माझी इच्छा असती तर, मला कोणत्याही दृष्टीनं कमीपणाचं किंवा अन्यायाचं वाटलं नसतं. जगानं त्यासाठीं माझ्यावर आघात केले असते तरी ते मी सहन केले असते–पण मी तुला स्पष्ट सांगतों, लग्न करून संसार थाटण्याची कल्पना माझ्या मनांतून पार गेली आहे. सार्वजनिक कार्याला आयुष्य वाहिल्यामुळं मर्यादित प्रपंच करून राहणं मला अशक्य झालं आहे. त्यांतूनही अपत्यस्नेहाचा लाभ लीलेच्या सहवासामुळं मला आयताच मिळतो आहे. ती मला आईच म्हणते आणि मीही तिला मुलीप्रमाणंच मानतें. माझ्या आयुष्यांतील योगायोगच विलक्षण आहे. माझी सावत्र मुलगी आईच्या ठिकाणी झाली आणि मला शत्रु होऊं पाहणाऱ्या माझ्या दीराची मुलगी पोटच्या मुली-पेक्षांही जास्त दिसूं लागली. ताईनं दिलेल्या प्रेमाचा मोबदला मी लीलेच्या ठिकाणीं फेडतें आहे. मला स्वतंत्र संसार करून थाटानं रहावं असं मुळींच वाटत नाहीं. मुलांच्यापायीं किती कुटुंबं दुःखी झालीं आहेत हें जेव्हां मला दिसून येतं, तेव्हां मुलं निर्माण करण्यासाठीं प्रपंच थाटण्याची प्रवृत्ति माझ्या मनांत जर कुठं उत्पन्न होत असेल तर ती आपोआप नाहींशीं होते. कुटुंबवात्सल्याचा भरपूर पुरावा मला मिळतो आहे. वैषयिक सुखाची लालसा कार्यव्याप्तृत्वासुळें माझ्या अन्तःकरणांतून अजिबात नाहींशीं झाली आहे. कुठूनही एकादं अपत्य पाहिजे, त्या अपत्यानं

आपल्याला सुख दिलं पाहिजे, वेळप्रसंगीं आपली शुश्रुषा केली पाहिजे, अशी माणसाची अपेक्षा असते, म्हणूनच तो संसारांत पडत असतो. तो माझा अभाव लीलेमुळें पुरा झाला आहे. अपत्यप्रेमाचं सुखदुःख लीलेच्या सहवासानं मला मिळतं आहे. तूं म्हणशील, उद्यां ती लग्न करून निघून जाईल. माझी स्वतःची मुलगी असती तर तीसुद्धां नसती का लग्न करून निघून गेली ? तसंच हें, असंच समजेन. मुलगा असता तर तो माझ्याजवळच राहिला असता कशावरून ? स्वतःचा संसार थाटावा असें मनांत आणून तो जर मला सोडून गेला असता, तर काय झालं असतं ? तूं म्हणशील, आपण उभयतां तरी एकमेकासाठीं आहोंत ना ? खरं आहे. तशींच आजही आहोंत. त्याला लग्नच कशाला पाहिजे ? आपण आतां अगदींच तरूण राहिलों नाहीं. आपल्या ठिकाणीं पोक्तपणा आला आहे. तरुणांचे शृंगारिक चाळे आतां आपल्याला शोभणार नाहींत–निदान मला तरी ते रुचणार नाहींत. मग लग्न कशाला करायला हवं ? संसारी माणसांची परिस्थिती पाहिली म्हणजे असं वाटूं लागतं, कीं वृद्ध जोडप्याचं प्रेम तेंच खरं प्रेम. त्या वार्धक्यांत वैषयिकतेची भावना नसते. दीर्घकालाच्या सहवासामुळं एकमेकासाठीं वाटणारं प्रेम त्यांना संसारांत खेळवीत असतं. तसंच आपलं हें आहे असें समजूं. तेवढ्याच स्नेहाच्या वृत्तीनं आपण राहूं. आपण लग्न केलं पाहिजे, असं तुला कां वाटतं ? लग्न केल्याशिवाय एकमेकांनीं एकमेकाशीं मोकळ्या मनानं राहतां येणार नाहीं, असं का तुला वाटतं ? त्याच्यासाठीं एकमेकांनीं अंगावरच बागडलं पाहिजे का ? अशा रीतीनं बागडण्यांत–तोंडाला तोंड देण्यांत–काय प्रेम असतं ? प्रेमाची पाश्चात्य व्याख्या मला बिलकूल पसंत नाहीं. हा एक सहवासाचा स्नेह आहे. अकृत्रिमतेचं चिन्ह आहे. निर्विषयकतेचें पुरेपूर माप असेल तरच हा सहवास निर्दोषपणानं सुखाचा होतो. तुला नाहीं असं वाटत ? ”

माझें भाषण ऐकून चंदू स्वस्थ बसला. माझे शब्द त्याच्या मनाला फारच लागले असावेत, असा मला संशय आला म्हणून मी म्हटलें, “ बोलत कां नाहींस ? माझं म्हणणं तुला पटलं नाहीं का ? पटलं नसेल तर मी तुला त्याबद्दल दोष देणार नाहीं. पण जिथं एकमेकांचे विचार अशा रीतीनं पटत नाहींत, तिथं त्या दोन व्यक्तींनीं लग्नाच्या बंधनानं बांधून घेण्यांत काय अर्थ ? ”

“ खरं आहे ! ” चंदू म्हणाला, “ तुझं म्हणणं अक्षरशः खरं आहे ! लग्नाचीच कल्पना मी सदोदीत माझ्या नजरेसमोर ठेवली होती. सहवासांत प्रेम

असतं. हें विधान माझ्या दृष्टीनं नवीन आहे. 'प्रेम प्रेम' म्हणून आपण शब्द वापरतों त्यावेळीं प्रेमाचं स्वरूप काय आहे याची आपल्याला कल्पना नसते. नुसती वैषयिकताच जर पहायची, तर होती ती काय वाईट होती ? तिचीं माझीं मतं पटत नसत म्हणूनच ना मला दुःख होत होतं ? समसमान रेषेवर परस्परांच्या हृदयाचे तंतु आवाज देत नसत–म्हणूनच ना मी दुःखी झालों होतों ?—"

असें म्हणून तो मधेंच थांबला.

बराच वेळपर्यंत तो पुन्हां तसाच विचार करीत स्तब्ध बसला. त्या विचारांची साखळी तुटूं नये म्हणून मीही त्याला प्रश्न केला नाहीं. इतक्यांत लीला आली आणि विषय तेवढाच राहिला.

डॉक्टर मला तपासण्यासाठीं त्याचवेळीं येऊन पोंचले. प्रकृतिस्वास्थ्यासाठीं मी मुंबई सोडून मुंबईच्या बाहेर गेलें पाहिजे, असें त्यांचें मत पडलें.

बाहेर जावें कीं न जावें, याचा मी विचार करीत होतें. सांपत्तिकदृष्ट्या ती अडचण नव्हती. पण मी बाहेर गेलें असतें तर माझ्या शुश्रुषेसाठीं अभ्यास सोडून लीलेलाही माझ्याबरोबर यावें लागलें असतें. त्यामुळें कदाचित् तिचें एक वर्ष बुडालें असतें.

लीलेला तसें वाटलें नाहीं. एक महिनाभर तरी बाहेर जाऊन रहावें, असा तिनेंही आग्रह धरला–आणि आम्ही दोघीही माथेरान येथें एका प्रशस्तशा बंगल्यांत घर थाटून राहिलों.

चंदू दर शनिवारीं रविवारीं आम्हांला भेटायला माथेरान येथें येत असे आणि त्याच वेळीं माझी प्रकृति पाहून जात असे. त्या विषयाचा त्यानंतर त्यानें केव्हांच उल्लेख केला नाहीं.

लीलेच्या बाबतींत मी चौकशी करावी असें पुन्हां पुन्हां मनांत येत होतें–पण माझा हट्ट मला दूर सारतां येईना. ती होऊन कांहीं बोलत नव्हती आणि मीही तिला विचारीत नव्हतें.

पण असा एक प्रसंग आला, कीं त्यामुळें त्याही बावतींचें अचानक निराकरण झालें.

## प्रकरण पंचविसावें ........................................ स्वास्थ्य

जसजशी मला हिंडण्याफिरण्याची ताकद येऊं लागली तसतसा मी फिरण्याचा टप्पा वाढवूं लागलें.

माथेरानचें नैसर्गिक सौंदर्य अद्वितीय आहे. कोणत्याही भागांत कुठेंही गेलें तरी सौंदर्यदृष्टी असलेल्या कोणत्याही व्यक्तीला आनंद झाल्यावांचून रहाणार नाहीं, अशीच माथेरानची नैसर्गिक रचना आहे. ती बिघडूं न देण्याची खबरदारी घेण्यांत आली आहे. माथेरानांत चांगले रस्ते नाहींत. गाड्या किंवा मोटारी जाण्याची त्यासाठींच तिथें बंदी करण्यांत आली आहे. वहान आहे काय तें रिक्षा. पण माणसांनीं ओढायच्या वाहनांत बसणें मला प्रशस्त वाटत नसल्यानें पायीं चालणेंच मी पसंत करीत होतें. पायींपायीं जितकें फिरतां येईल तितकाच व्यायाम मी घेत असें.

दररोज संध्याकाळीं कुठल्या ना कुठल्या तरी पॉईंट्वर जाऊन बसायचें असा आमचा दोघींचा नित्यक्रम असे. चंदू आला म्हणजे तोही आमच्याबरोबर येत असे. माथेरान येथें असें पॉईंट्स बरेच आहेत. त्यांतील कांहीं आमच्या राहण्याच्या बंगल्यापासून जवळ होते तर कांहीं दोन ते सात मैलाच्या अंतरावर होते.

एके दिवशीं आम्ही ल्युइसा पॉईंटवर बसलों असतांना एक अत्यंत क्षीण झालेली

लीलेच्या वयाची महाराष्ट्रीय मुलगी येऊन दाखल झाली. तिच्याबरोबर कुणीच नव्हतें. इतकी थकलेली—अगदीं ॲनिमिक झालेली मुलगी एकटीच फिरायला कशी आली, याचें मला आश्चर्य वाटलें. लीलेच्या जिज्ञासु स्वभावामुळें तिला विचारल्या-वांचून राहवेना. माथेरानांत येणारीं महाराष्ट्रीय माणसेंच आधीं फार थोडीं. खुद्द महाराष्ट्रांतील, अतिशय जवळ असलेलें, हें आरोग्यस्थान असतां आणि येथील राहणेंही फार खर्चाचें नसतां, त्याचा फायदा गुजराती आणि पारशी लोकांनीं घ्यावा आणि महाराष्ट्रीयांनीं तिकडे ढुंकूनसुद्धां पाहूं नये, याचें मला आश्चर्य वाटत असे. त्यामुळें ही अशी एक महाराष्ट्रीय मुलगी तिथें आलेली पहातांच—त्यांतूनही ती एकटी आलेली पाहतांच-आमचें कुतूहल अर्थातच वाढलें.

आपण होऊन आम्ही तिची ओळख करून घेतली. तिनें आपलें नांव गांव सांगितलें, पण पुढल्या हकिकतीकडे लक्ष देतां तें या ठिकाणीं सांगणें मला बरें वाटत नाहीं. ओळखीसाठीं ' ताई ' या नांवानें तिचा उल्लेख करणें बरें.

ताईनें सांगितलेली हकिकत मोठी हृदयद्रावक होती. ती कॉलेजांत जाणारी एक मुलगी होती. कॉलेजांत जाणाऱ्या मुली त्यावेळीं फारच थोड्या असल्यामुळें, आणि विशेषतः ती असाधारण हुषार असल्यामुळें तशीच स्वरूपानेंही सुंदर असल्यामुळें, कॉलेजच्या विद्यार्थ्यांच्या नजरेंत भरून येत असे. पुष्कळ विद्यार्थी तिचा परिचय होण्यासाठीं तिच्या सभोंवार पिंगा घालीत असत. लीला ज्या कॉलेजांत जात होती त्या कॉलेजांत ती जात नव्हती, त्यामुळें लीलेला तिची माहिती नव्हती. जी ऐकींव माहिती होती ती त्या मुलीबद्दल चांगलें मत होण्यास मुळींच लायक नव्हती. त्या मुलीच्या बाबतींत कॉलेजच्या प्रपंचांत मोठाच गवगवा होता.

पण तिनें आपली जी हकिकत सांगितली त्यावरून तिच्या बाबतींत लोकदृष्ट्या केवढा अन्याय होत होता, याची कल्पना मला आली.

ती उनाड मुलगी नव्हती. पण तिच्या भोंवतीं घिरट्या घालणाऱ्या उनाड कॉलेजियनांना शक्य तेवढें चुकविण्याचा प्रयत्न ती करीत असल्यामुळें त्याच लोकांनीं तिच्याबद्दलचा हा बभ्रा केला होता.

कॉलेजांतील विद्यार्थ्यांबद्दल जरी तिचें मत असें होतें, तरीही त्यापैकीं एक दोन असामी आपले अकृत्रिम स्नेही आहेत असें तिला वाटूं लागलें होतें. त्यांतूनच एका विद्यार्थ्याचा आणि तिचा स्नेह वाजवीपेक्षां जास्त वाढूं लागला. प्रेमविषयक वाङ्मयाची पुस्तकें आणि काव्यें वाचीत गेल्यामुळें तिनें प्रेमाबद्दल असामान्य मनोरे

मनांत उभारले होते. त्या मनोऱ्यांच्या शिखरावर घेऊन जाण्यास पात्र असलेली व्यक्ति म्हणजेच तो आपला मित्र, असें तिला वाटलें आणि बिचारी फशी पडली !

दोघें एकमेकाशीं वचनबद्ध झालीं होतीं आणि लौकरच आपलें लग्न होणार अशी तिची खात्री होती.

पण तें लग्न होण्यापूर्वीच तिला मातृपद प्राप्त झालें.

तिनें पुनः पुनः त्याला आग्रह करून सांगितलें—पण त्यानें कांहीं तरी कारणें सांगून लग्नविधी घडवून आणण्याचा प्रसंग टाळला.

आणि कांहीं दिवसांनीं तो अजिबातच भेटायचा बंद झाला.

आपली परिस्थिती आपल्या आईसमोर उघडी करून सांगण्याखेरीज तिला गत्यंतर राहिलें नाहीं. तिचे आईबाप मनाचे उदार होते. झाली गोष्ट होऊन गेल्यानंतर मुलीला निष्कारण त्रास देण्यांत अर्थ नाहीं, असा विचार करून तिच्या सुप्रसुतीसाठीं त्यांनीं तिला बनारस येथें नेऊन ठेवलें.

जें व्हायचें तें झालें आणि तें विचारें मूलही मरून गेलें.

झालेल्या एकंदर प्रकाराचा मनावर झालेला परिणाम प्रकृतीवर दिसूं लागला. ती पुन्हां मुंबईला आली, पण डॉक्टरनां खरी हकिकत सांगून तिच्या उपचाराची योजना करण्याचा तिच्या आईबापांना धीर झाला नाहीं. त्यांनीं तिला आणून माथेरान येथें ठेवलें आणि खासगी उपचारांना सुरवात केली. तिची आई तिच्याबरोबरच आली होती आणि सुटीच्या दिवशीं बाप येऊन भेटून जात असे.

तिला फशी पाडणाऱ्या व्यक्तीचें नांव मी ज्यावेळीं विचारलें त्यावेळीं तिनें तें सांगण्याचें नाकारलें. तो तिच्या कॉलेजांतील विद्यार्थी नव्हता, एवढेंच तिनें सांगितलें.

मी तिला आश्वासन दिलें—वचन दिलें—इतर मुलींच्या दृष्टीनें अशा माणसाचें नांव निदान तेवढ्या कॉलेजांतील विद्यार्थिनींना तरी त्यांच्या हिताच्या दृष्टीनें कळलें पाहिजे, असा आग्रह करकरून सांगितलें—त्यावेळीं ती त्याचें नांव सांगण्यास तयार झाली.

तिच्या तोंडचें तें नांव ऐकतांच मात्र आम्हांला धक्का बसला. तो मधुकर होता.

लीला त्या दिवशीं आजाऱ्याप्रमाणें बिछान्यावर पडून राहिली होती. तिच्या मनाला स्वस्थता येईपर्यंत त्या बाबतींत कांहींच बोलायचं नाहीं असा मींही निश्चय केला.

दोन तीन दिवसानंतर ज्यावेळीं या विषयाच्या बाबतींत आमचें बोलणें झालें त्यावेळीं लीला म्हणाली, " ताईसारखीच मींही फशी पडलें असतें—पण कशी सावध राहिलें तें एक देवालाच माहीत. तूं एके दिवशीं माझ्याशीं जें भाषण केलंस त्याचा माझ्या मनावर परिणाम झाला. तुझ्या नजरेनं मी त्याच्याकडे पाहूं लागलें

आणि त्यामुळं माझ्या मनांत शंका उत्पन्न होऊं लागली. तो अकारण संशय होता—prejudice होता—असं मला वारंवार वाटत असे—पण आतां सर्व गोष्टींचं निराकरण झालं. माझे डोळे उघडले ! यापुढं प्राण गेला तरी लग्न करणार नाहीं, अशी ईश्वरसाक्ष प्रतिज्ञा करण्याची स्फूर्ति आज माझ्या हृदयांत उत्पन्न झाली." असें म्हणून तिनें माझ्या पायांवर डोकें ठेवलें.

मी उचलून तिला हृदयाशीं कवटाळलें. ती ओक्साबोक्शी रडत होती. मी म्हटलें, "यापुढं जगांत तुला मी आणि मला तूं याखेरीज दुसरं कोणी नाहीं, असंच समजायचं. आज ना उद्यां मी निघून जाईन—कुणी सांगावं कदाचित् हें माझं दुखणं पुन्हा उलटलं तर त्यांतच मी मरूनसुद्धां जाईन—त्यावेळीं तुझं कसं होईल, याचीच मला शंका वाटते. एकदां नातेवाइकांशीं संबंध तोडून टाकल्यावर पुन्हां त्यांच्याकडे जाणं होणार नाहीं. योगायोगानं तुझं शिक्षण झालं आहे. कदाचित् यंदा तूं पासही होशील आणि स्वतःचा चरितार्थ स्वतः मिळवायला समर्थ होशील. मी मरून गेल्यानंतर लग्न करावं असं तुला वाटलं, तर खुशाल कर—पण तोंपर्यंत मात्र मला अंतर देऊं नकोस !"

डोळ्यांतील आसवें पुशीत लीला म्हणाली " हें तूं म्हणायचं नाहींस आई. हें मी म्हणायचं आहे. तूं मला अंतर देऊं नकोस. मी थकलें आहे, खचलें आहे, मेल्याहून मेली झालें आहें—अशावेळीं तुझ्या सहाय्याखेरीज मी कुणाच्या जिवावर जगूं ? तूं मला वेळीं सावध केलं नसतंस तर खात्रीनं मी ताईसारखी फसलें असतें. तसं कांहीं झालं असतं, तर मी खरोखरच जीव दिला असता. आईबापांना सांगण्याचं जें धैर्य ताईनं केलं तें मला साधलं नसतं. योगायोगानंच ही हकिकत कळली म्हणून बरं—नाहींतर मला ती कदाचित् बनावटसुद्धां वाटली असती—माझं मन वळवण्यासाठीं तूंच हा बनाव घडवून आणलास, असं वाटण्याइतकी मी दुबळी झालें होतें. पण माझं नशीब कुठंतरी शिकंदर होतं म्हणून असा हा योग घडून आला आणि मी बचावली गेलें !"

चंदूला ही हकिकत आम्ही सांगितली नाहीं. लीलेनें मात्र मधुकराला पत्र लिहून सर्व हकिकत कळविली आणि यापुढें आपल्याशीं भाषणसुद्धां न करण्याची ताकिद दिली.

मुंबईला गेल्यावर आमच्या आयुष्याचा क्रम सर्वच पालटून गेला. आम्हां दोघांचीं अन्तरंगें इतकीं एक झालीं होतीं, कीं त्यापुढें आम्हांला जगाची कसलीच क्षिती राहिली नाहीं.

× × ×

दिवसेंदिवस मी चंदूशीं फटकून वागूं लागलें असें पाहून त्याचेंही येणें जाणें कमी झालें. मी माथेरानहून परत आल्यावर ताई आणि काका मला भेटण्यासाठीं आलीं होतीं. त्यांना झालेली सर्व हकिकत आम्ही दोघींनींही मोकळ्या मनानें सांगितली. आमचा निश्चय त्या उभयतांना आवडला.

माझ्या आयुष्यांतील एका विशेष प्रसंगाची—माझ्या सावत्रसुलीच्या—ताईच्या मातृप्रेमाची-तिच्या वात्सल्याची फेड होणें अवश्य होतें. तो धागा खरोखरच 'ऋणा'नुबंधाचा होता. लीलेच्या जिव्हाळ्याच्या प्रेमासाठीं मी जें ताईचें 'अनुकरण' केलें, तें एकप्रकारचें कौटुंबिक 'दे वाण घे वाण'चें पारणें फिटलें, असें मला वाटलें. माझ्यासारखी विधवाकुमारी यापेक्षां दुसरी कोणती भेट परत करणार ?

कुणीच विरोध न केल्यामुळें आम्हां मायलेकींचा संसार सुखाचा झाला.

× × ×

पुन्हां मी माझ्या उद्योगाला लागलें पण पुन्हां माझ्या प्रकृतीनें उलट खाल्ली. बाबा पूर्वीप्रमाणेंच येऊन जाऊन रहात आहेत. यावेळीं ताई आणि काकाही माझ्या शुश्रुषेसाठीं येऊन राहिलीं आहेत. जिवाला विरंगुळा म्हणून मी माझें हें आत्मचरित्र लिहायला घेतलें होतें, तें आज पुरें होत आहे.

एकच गोष्ट लिहायची शिल्लक राहणार—ती म्हणजे माझ्या मृत्यूची !

× × ×

आयुष्यांत पुष्कळ गोष्टी घडाव्या अशी इच्छा होती. आपल्या हातून मोठमोठीं कार्यें व्हावींत, स्त्रीजातीच्या उन्नतीसाठीं आपण हजारों महाराष्ट्रीय स्त्रियांना बरोबर घेऊन चळवळी कराव्या, अशी महत्वाकांक्षा होती. ती पुरी होणें आतां साध्य दिसत नाहीं.

मृत्यु जवळ आला आहे, हें मला उघड उघड दिसत आहे.

बाबा जवळ आहेत. काका आणि ताईही आहेतच. लीला माझ्यापलीकडे कांहीं पहातच नाहीं. चंदू निर्विषयक अशा मित्रत्वाच्यां नात्यानें माझ्याशीं वागत आहे.

माझ्या दृष्टीनें सुखाचें सर्व साम्राज्य माझ्या हातीं आलें आहे.

अपुऱ्या राहिलेल्या इच्छा पूर्ण होण्यासाठीं पुनर्जन्म येणार, तो महाराष्ट्रांतच येवो, एवढीच परमेश्वराजवळ माझी शेवटची प्रार्थना आहे.

ॐतत्सत्